॥ श्रीगुरु प्रसन्न ॥

# सत्संगसरिता

तीरवासी

व्यंकटेश माधव दातार बी. ए.

[ डेप्युटी फिनान्षियल सेक्रटरी.

एच्. ई एच्. दी नैझाम्स गव्हर्नमेंट ]

हैद्राबाद (दक्षिण)

---

फेब्रुवारी १९३६ इ. माघ शके १८५७

॥ श्रीगुरु प्रसन्न ॥

# निवेदन

श्रीसद्गुरु श्रीमत्परमहंस परिव्राजकाचार्य श्री १०८ अच्युताश्रमस्वामी महाराजांनीं निजदयेनें दिव्य श्रीचरण दाखविले तेव्हां हें लेकरूं जन्मलें, तें श्रीस्वामी महाराजांचे आणि श्रीसद्गुरुमूर्ति अण्णासाहेबांचे बोधामृतावर जगलें. पुढें या उभयतां मायबापांनीं परिपालनाकरितां हें लेकरूं श्रीसद्गुरु ब्रम्हानन्द माउलीचे ओटींत घातलें. या माउलीनें अंजन घालून बोलण्यास शिकविलें. भगवन्नामगुण श्रवणांत पेरिले. सत्संगाचा अगाध महिमा दाखविला. अध्यात्मग्रंथांचे पाठापेक्षां त्यांचें श्रवण व दीर्घकाल अभ्यासापेक्षां लवभर सत्संग, अधिक आहे, असें प्रत्ययास आणून उपजीविकेकरितां सद्गुरु माउलीचेच उंबरठ्यापासून वाहात असलेल्या सत्संगसरिता तीरीं बसविलें. ही सत्संगसरिता श्रीसद्गुरु माउलीच्या मंगल सान्निध्यांत बसणाऱ्या निर्मळ, प्रेमळ, भाविक संताचे निर्हेतुक भजन पूजन कीर्तन आत्मचर्चा आणि सुखसंवादांत वाहणारी चिद्गंगा होय. ॥ अर्थ बोलाची वाट पाहे। अभिप्राय अभिप्रायातें विये। भावाचा फुलौरा होत जाये। मतिवरी ॥ दयाळू सद्गुरु माउलीनें शिकविल्याप्रमाणें प्रसंगविशेषीं यथाशक्ति यथामति लहान लहान गिड्यात भरुन टेविलेले त्या चिद्गंगेचे बिंदू, त्यांचेच आज्ञेनें कृपाळू संताचे चरणीं सप्रेम व सादर निवेदन करून हें तीरवासी लेकरूं समर्थ तुकारामाचे उक्तींत वरदान मागत आहे.

॥ कृपाळू सज्जन तुम्ही संतजन। येवढें कृपादान तुमचें मज ॥
॥ आठवण तुम्ही द्यावी पांडुरंगा। कींव माझी सांगा काकुळती ॥
॥ अनाथ अपराधी पतित आगळा। परि पायावेगळा नका करूं ॥
॥ तुका म्हणे तुम्ही निरविल्यावरी। मग मज हरी उपेक्षीना ॥

# सत्संगसरिता अवतार

सेवितों हा रस। वाटितों आणिकां। घ्यारे होऊं नका। रानभरी ॥

तुकाराम—

ग्रंथकार आणि मुद्रक, ग्रंथकार आणि प्रकाशक यांच्या प्रमाणेंच ग्रंथकार आणि प्रस्तावक यांचा संबंधही अलीकडे नित्य आणि अयुतसिद्ध झाला आहे. ह्यामुळें ग्रंथकारांचा जसा एक वर्ग आहे तसाच प्रस्तावकांचा ही एक विशिष्ट वर्ग आहे. पण ह्या दोन्हीं वर्गांतही मी मोडत नसतां भगीरथासारखे प्रथित असे प्रस्तुत सत्संगसरिता निर्माते, विद्वद्वर्य व संतश्रेष्ठ रा. बाबासाहेब दातार यांनीं मला आपल्या सरितेच्या अवतारार्थ प्रस्तावकाची भूमिका घेण्याची कां आज्ञा करावी हें निदान मला तरी समजत नाहीं. कारण ते स्वतः स्वयंप्रकाश कवि आहेत. पुन्हां आजन्म परमार्थप्रेमी असल्यामुळें लोकेषणाही त्यांच्या ठिकाणीं संभवत नाहीं. आणि ती असती तर तदर्थ आनगांवास गेले असते. तेव्हां केवळ "मदनुग्रहाय"च माझ्यासारख्या आळशावर ही गंगा आली आहे असें मानून नरहरि प्रमाणें मी पुढील प्रार्थना करीत आहे.

भागीरथी त्रिपथगे पदवंदनातें। मी दीनगे करितसे मतिमंद मातें।
हेतू मनांत भरला तव पूर्ण गाया। आम्ही न मागत असें इतुकेंचि वायां

श्री. बाबासाहेबांचा विद्याव्यासंग अतिशय दांडगा आहे. इंग्रजी, संस्कृत, पर्शियन, उर्दू, मराठी, या भाषा त्यांस उत्तम अवगत आहेत.

श्रुति, स्मृति, रामायण, भारत, भागवत, गीता, उपनिषदें वगैरे ग्रंथांचें लक्ष्यपूर्वक अध्ययन त्यांस घडलें आहे. ज्ञानेश्वरी तर त्यांस मुखोद्गत आहे. एकीकडे फडणिशी खात्यांतील आंकडेबाजीची किचकट नोकरी तीन तपें उत्कृष्ट तऱ्हेनें बजावीत असतां दुसरीकडे बाकीच्या आयुष्याचा त्यांचा प्रत्येक क्षण गीतेंत सांगितल्याप्रमाणें "सततं कीर्तयंतो मां यतंतश्चदृढव्रताः । नमस्यंतश्च मां भक्त्या नित्य युक्ता उपासते" ॥९।१४॥ अशा तऱ्हेनें जात आहे. जगप्रसिद्ध महाकवि उमर खय्याम हा मद्य व मदिराक्षी यांच्या पायीं बुडाला असेंच पाश्चात्यांचे अनुकरण करणारे सर्वजण आजपर्यंत मानीत होते, परंतु ह्या दोन प्रकारांच्या बुडाशीं असलेलें भक्तिज्ञानवैराग्य कसें पहावें ही दृष्टि देण्याचें श्रेय बाबासाहेबांच्या **"श्रीगुरुकरुणामृत"** ग्रंथासच आहे. परमार्थाचा दृढव्यासंग व संतसंग यांचा "थेंबें थेंबें तळें साचें" या म्हणीप्रमाणें जो आजन्म संचय बाबासाहेबांनीं करून ठेविला होता त्यांतूनच " जल तुंबतां तडागीं फोडावा लागतो जसा पाट " या न्यायानें प्रस्तुतची **सत्संगसरिता** उद्भवली आहे व ती ह्या ग्रंथरूपी पात्रांतून संसरण करीत असलेली दिसत आहे. तेव्हां तिच्यांत मी स्वतः अभिषेक करून वाचकांस ही तिच्या पवित्र तोयांचें आचमन करविण्याचा प्रयत्न करीत आहे.

मराठी वाङ्मयाचा उगमच धार्मिक व पारमार्थिक काव्यांतून झाला आहे. ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ या संतकवींपासून मोरोपंता-पर्यंत या संतकाव्यांचा ओघ चालू होता. इंग्रजी नंतर त्यास निराळे वळण लागलें. व हल्लींतर त्याचें सर्वच रंगरूप पालटलें आहे. नंदि-ग्रामींच्या एकाद्या संतगणूचा पारमार्थिक सूर मधून मधून निघतो खरा, पण तो ऐकण्यास श्रोत्यांचीच वाण झाली आहे. परिस्थिति जरी

अशी बदललेली असली तरी भागवतधर्मानुयायी जुने मतवादी अगदीं नाहींत असे नाहीं. आषाढी कार्तिकीला प्रतिवर्षी हजारों लाखों यात्रिक पढरीस जात आहेत. अशा परमार्थप्रवण जनतेसाठींच प्रस्तुत **सत्संगसरितेचा** अवतार आहे. जोपर्यंत मृत्यु बरोबर हिंडत आहे, व जों पर्यंत पुनर्जन्म आणि परलोक यांवर लोकांचा विश्वास आहे तोंपर्यंत कितीही नवमतवाद उत्पन्न झाले तरी अशा परमार्थपर ग्रंथांचें महत्त्व कमी होणार नाहीं. असो.

**नामकरण**–ग्रंथकारानें या ग्रंथाचें **सत्संगसरिता** हें नामकरण फारच चतुराईनें केलेलें दिसते. कारण गंगाही शुचित्वें मोठी शुचि. पापतापही तिच्यामुळें जातो. पण तींत बुडण्याची भीति आणि "काश्यां मरणान् मुक्तिः" असें आहे. परंतु प्रस्तुत सरिता अगाध खोलीची असली तरी, तींत बुडण्याची तर भीति नाहींच, उलट न मरतां रोक-डाच मोक्ष भक्तांस मिळवितां येतो. गंगेला तरी पावनत्व साधूनींच साधून दिलें आहे. ( साधुनीं– । शुचिपण दिलें तीर्थी गंगादिकासहि साधुनी. मोरोपंत) मग ह्या प्रत्यक्ष सत्संगसरितेचें शुचित्व काय वर्णावें ?

**परिचय**–या सत्संगसरितेचे चार प्रवाह कल्पिले आहेत.

**प्रथम प्रवाहांत** भक्तिज्ञान, गुरुमहिमा, उपासना, पुरुषार्थ वगैरे विषयांचें स्पष्टीकरण प्रश्नोत्तर रूपानें केलेलें आहे. त्यांत मधून मधून "जातें काय जातें" (१३) "बानी मर्दोची" (१५) वगैरे सारखी गंभीर गूढ अर्थाची ही रचना आहे. यांत आर्या, पदें व भुजंगप्रयात उपजाति, शार्दूलविक्रीडित, वियोगिनी वगैरे सारखीं अक्षरगणवृत्तें ही आहेत. "कमला कमला धरी करीं । सुमनाला सुखवी परोपरी" ॥ अशी साधी कर्णमधुर शब्दरचना वामनपंडिती थाटाची झालेली आढळते. क्वचित् हिंदी भाषेंतील पदें ही यात आढळतात. या भागा-

तील तात्त्विक विचारांची मांडणी विविधस्वरुपाची व चमत्कृतिजनक झाली असल्यामुळें वेदांताची रुक्षता त्यांत नाहीं खरी, तरी पण त्यांतील खरें रहस्य त्यांत मुरलेल्या माणसांसच उकलावयाचें !

प्रवाह २ राः—यांत अनेक देव देवतांवर स्तोत्रें, अनेक छंदांत रचलीं आहेत. त्यांतल्या त्यांत गुरुमहिम्यावर ८ आहेत. यांतील प्रेमळपणा व भक्तिरस प्रत्यक्षच आस्वादण्याजोगा आहे. "कां मशि. बोलत नाहीं ॥ आई० ॥ हें पद जितकें साधें तितकेंच सहजसुंदर व करुणरसपूर्ण झालें आहे. (१७) लागुनी आजि ळळा; (१९) सदा राही वो समोरी ॥ हीं पदेंही ह्याच्याच तोडीचीं आहेत. प्रेमळपणा हा ह्या काव्याचा ठळक गुण आहे. व तो सर्वत्र दिसून येतो.

प्रवाह ३ राः— पहिल्या दोन प्रवाहांत वाचकाची पूर्वतयारी झाल्यावर तो तृतीय प्रवाहांत दाखल होतो. हाच सत्संगसरितेचा मध्यबिंदु होय. येथें प्रवाहास एकदम निराळेंच वळण लागलेलें दिसतें. हा आख्यानमय आहे. महाभारत, रामायण, स्कंदपुराण, ऋग्वेद सूक्तें, संतचरित्रें वगैरे अनेक ग्रंथांतून या आख्यानांची कथा-आधारास घेऊन कवीनें त्यावर स्वतंत्र रचना केली आहे. तीवरून त्याचें कल्पनाचातुर्य, भाषाप्रभुत्व व वृत्तनैपुण्य चांगलेंच दिसून येतें. संविधानकाची मांडणी साधी पण परिणामकारक झालेली आहे. ह्या सर्व गुणांमुळें या सरितेस नुसत्या कीर्तनतरंगिणीपेक्षां किती तरी मनोरमता आली आहे. एवढेंच नव्हें तर भजनसंग्रह मनोरंजक करण्याचा हा प्रकार पारमार्थिक मराठी वाङ्मयांत अपूर्वच म्हटला पाहिजे. महा-भारतांपैकीं ६।७ आख्यानांत "सुलभा जनक संवाद" फारच उत्कृष्ट वठला आहे. वेदांत विषयक संवादांतील जनकासारख्या जीवन्मुक्ता-सही निरुत्तर करणारा कोटीक्रम पाहून वाचक स्तिमित होतो, व

त्याच्याच प्रमाणें सोही " माय अविनाशी, सद्गुरु माउले ! । या हृदयीं संतत तूंचि होय सुखवासी " असें सुलभेस विनविते. " म्हणे जनक तिला तूं अशी कशी संन्यासी ? " हें त्याचें पालुपद तर वाचकाच्या नेहमीं जिभेवर नाचतें व कानांत गुणगुणत राहातें, ऋग्वेद सूक्तांतील " अंभृणी व सरमा " ह्या आख्यानांचा परिचय मराठी वाचकांस नव्यानेंच घडत आहे असें वाटतें. आणि मुकुंदराजाचें कुतूहलजनक पूर्वचरित्र व चमत्कृतिपूर्ण निजामुद्दीन यद्याख्यान यांची भर मराठी संतवाङ्मयांत मोठी महत्त्वाची समजली जाईल.

प्रवाह ४ था:–यास कल्पकदंब असें सार्थ नांव दिलें आहे. ह्या प्रवाहतीरावर ८६ कल्पतरू लाविले आहेत. त्यांपैकीं कोणत्याही एकानें इष्टलाभ होण्यासारखा आहे. मग सर्वांची गोष्ट काय विचारावी? संवादात्मक कथांनीं अध्यात्मज्ञान देण्याचा केलेला हा उपक्रम खरोखर अभिनव आहे. पंचतंत्र हितोपदेशांतील कथांप्रमाणें पहिली कहाणी दुसरीस विते, आणि वाचकांचें लक्ष पुढें पुढेंच खेंचीत नेते. त्यामुळें हा भाग एकदां वाचावयास घेतला कीं शेवटपर्यंत तो खालीं ठेववत नाहीं. अलीकडे लघुकथात्मक वाङ्मयाची आवड फार पसरली आहे; म्हणून लघुकथांचें पीकही बेसुमार वाढत आहे. त्यापैकीं कांहीं हृद्य आहेत, व रम्यही आहेत. परंतु त्या सर्व एकांगी म्हणजे केवळ प्रापंचिक आहेत. पण प्रस्तुत कहाण्या प्रपंचपरमार्थांची उभयविध जोड करून देणाऱ्या आहेत. तेव्हां त्यांचा आस्वाद वाचकांनीं अवश्य घेऊन पहावा. यांत ८६ तरु आहेत. आणि ते कल्पतरू असले तरी प्रत्येकाच्या फळाची रुचि नवी नवी आहे. ह्याकरितां त्यांचे वानगीसाठीं तरी कोठलें म्हणून फळ तोडून येथें दाखवावें ? वाचकांनींच त्यांचा रसास्वाद स्वतः घ्यावा हेंच उचित. यांतील दुर्वास नारदाचे

संवाद वाचून वाचक दुर्वासाप्रमाणेंच म्हणेल कीं " मी या संवादांनीं धन्य झालों. अंधारांत भटकत होतों. आज मला उजाडलें." मनुष्यामध्यें स्वाभाविक असणारे दुर्गुण म्हणजे आशा, तृष्णा, महत्त्वाकांक्षा, अहंकार, गर्व, लोभ, मोह, मद, मत्सर, यांचें प्रतीक दुर्वासात कल्पून प्रत्येक काहाणीनें त्याची आत्मोन्नति स्वधर्माचरण, घटशुद्धि, वासनात्याग, तप, उपासना, श्रीहरीची दया, सत्समागम, संतसेवा व शेवटीं गुरूची दया अशी पायरी पायरीनें कशी होत गेली आहे हें मोठ्या चित्ताकर्षक व उद्बोधक रीतीनें दाखविलें आहे. एकंदरींत दुर्वासाचें स्वभाव–चित्रण फारच हृदयंगम वठलें आहे. तें चित्र म्हणजे एक त्रिकालदर्शी आरशासारखेंच झालें आहे. त्यांत प्रत्येकानें आपापलें नुसतें बाह्य मुख नव्हे तर अंतर्मुखही पहावें आणि आजूबाजूला कोणी पाहात नाहीं अशी खात्री करून घेऊन, त्याला लागलेलें मालिन्य सत्संगसरिता–जलानें झटकन धुवून टाकावें. यांत लोककल्याणाच्या संयुक्त संस्था स्वावलंबन तत्त्वावर कशा चालविल्या जातात, शिष्यस्य अपराधे गुरोर्दंडः या न्यायानें गुरूच अन्नत्यागरूप प्रायश्चित्त कसें घेतात, लोभी खंडोजी झटाळ होनाचा घट घेऊं पाहातो, तों त्याचे मानगुटीस त्याचेंच भूत कसें बसतें, कंसाच्या कुशल मंत्रिमंडळानें नूतन कलायंत्राचे धर्मध्वंसक, भक्तिभंजक, श्रद्धाखंडक, कारखाने कसे काढले होते. त्यांतील माल खपविण्यास अनेक बुद्धिभेदशास्त्री वेतनें देऊन कसे ठेविले होते; व वृत्तिनियम, देवधर्म, यज्ञयाग, उपनयनविवाह सब झूट आहे, साधुसंत भक्त धूर्त आहेत, स्वैरवर्तन हाच पुरुषार्थ आहे असा उपदेश ते कसा करीत होते, नाना मतांचा गलबला कोणी पुसेना कोणाला, किंवा गाढवांचा गोंधळ आणि लाथांचा सुकाळ अशी स्थिति कशी झाली आहे, वगैरे गोष्टी इतक्या कुशलतेनें वर्णिल्या आहेत कीं आपण हल्लींची एखादी अद्भुतरम्य सामाजिक

व राजकीय कादंबरीच वाचीत आहों असें वाटतें. सर्व वासनांचा अहंकार जिरला तेव्हां दुर्वासमुनीवर श्रीहरीची दया झाली व त्याचा उद्धार झाला, तसा वाचकांचाही व्हावा हीच फलश्रुति ग्रंथाची आहे.

प्रस्तावकानें केवल स्तुतिपाठच गावयाचे नसतात. ग्रंथांतील गुणां प्रमाणें दोषांचेंही दिग्दर्शन त्यानें करावयास पाहिजे म्हणून पुढें कांहीं दोष दाखविले आहेत. प्रथमतः यांत मुद्रण दोष पुष्कळ झाले आहेत. पण वाचकास ते सहज सुधारून घेतां येण्यासारखे आहेत. श्रीगुरुआज्ञा श्रीअच्युतजी, कामधेनूपय वगैरे ठिकाणीं संधि नियमाकडे लक्ष दिलेलें दिसत नाहीं. भाववाचक प्रत्ययाची द्विरुक्ति ॥ दास्यत्व सारख्या शद्बांत आढळते. मुद्दत, वायदा, रुकले, बिस्तर, खजाना सारखे परकीय शद्ब योजलेले दिसतात. मनाचे नाचणें बद्दल नाचणी (नर्तकी), दांड बनुनी माझे उरा भोंकीसी (भोंकपाडतोस) प्रवाही (प्रवाहाबरोबर वाहात जाणारा). असे अप्रयुक्त शद्ब योजलेले आहेत. "चिमणा हा बटु बाळ ब्रह्मचारी" अशी पुनरुक्तिही घडली आहे. कान्हा याचें संबोधनाचें रूप कान्हो; नंद यशोदा बसले; स्मरें, विसरें बद्दल स्मरी, विसरी; असे व्याकरण दोषही क्वचित् सांपडतात.

संत–सांप्रदायांतील कवि बहुधा कवितेच्या या बाह्यांगांकडे फारसें लक्ष पुरवीत नसतात, हें सर्वांस ठाऊक असल्यामुळें वाचकांनींही अशा दोषांकडे ढळत्या नजरेनेंच पाहावें आणि "कार्यसिद्धिते सर्वही। अर्थाच पाशीं" ह्या कव्युक्तीकडे लक्ष देऊन, सत्संगसरितेंतील भक्तिरस कवि स्वतः सेवून आणिकांस वाटीत आहे, त्याचें त्यांनीं यथेष्ट सेवन करावें अशी त्यांस नम्र विनंति आहे. इतिशम्.

ता. २१।२।३६
२३६५ खुदबीगुडा
हैद्राबाद दक्षिण.

आपला नम्र सेवक,
**चिंतामण नीळकंठ जोशी एम्. ए.**
मराठी प्रोफेसर उस्मानिया युनिव्हर्सिटी.

# अनुक्रम.

**तृतीय प्रवाहः-आख्यानें**



**चतुर्थ प्रवाहः-कल्प कदंब**

—:—

## शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | मुद्रित | शुद्ध |
|---|---|---|---|
| २ | १९ | गाईचे | गाइचे |
| ३४ | १७ | पाहिलात | पाहिलीत |
| ३४ | २३ | ।स्मत | स्मित |
| ३५ | १९ | राहात | राहत |
| ५४ | ८ | अघटित | अघटीत |
| ५५ | २ | तूशी | तूझी |
| ५५ | ७ | मुदेंदु | मुखेंदु |
| ७० | १८ | आगमागमहि | गमागमहि |
| ७५ | १३ | दावूं | दावुं |
| ८७ | १३ | फर | फेर |
| ९३ | ११ | दामव | दानव |
| ९७ | ११ | नामदेव | ज्ञानदेव |
| १०२ | १९ | वागंम्रणी | वागंभ्रणी |
| १०६ | २३ | समरेच्या | सरमेच्या |
| ११० | २० | खिरला | शिरला |
| १३७ | २६ | सोडवील | सोडवीले |
| १५२ | १३ | बोधा | बोधी |
| १६६ | २३ | संतृप्त | संतप्त |
| १६८ | १४ | सताचा | संतांचा |
| १८० | १२ | बालमुकुद | बालमुकुंद |
| १८१ | २ | आहत | आहेत |
| १८१ | ६ | पळ | पळे |
| १८१ | ७ | बस | बसे |
| १८१ | १३ | दिगंतरी | दिगंतरीं |
| १८३ | ३ | भदुनी | भेदुनी |
| १८३ | ७ | वेखरी | वैखरी |
| १८४ | ५ | काटी | काठी |
| १९४ | १८ | कुटुंब | कुटुंब |

| पृष्ठ | ओळ | मुद्रित | शुद्ध |
|---|---|---|---|
| १९६ | ५ | दैवेचि | दैवचि |
| २०१ | २३ | अश्वल | अस्वल |
| २०५ | ४ | शास्त्रा | शास्त्री |
| २०६ | १५ | खारें | खारे |
| २०७ | ८ | कधीं | कशी |
| २०९ | २२ | निर्षाहित | निर्वाहित |
| २११ | १६ | करुणाणर्वा | करुणार्णवा |
| २१२ | १८ | सुमंतु | सुमंत |
| २१३ | ५ | अविचिता | अवचिता |
| २१३ | १८ | खाशीं | खाशी |
| २१७ | ११ | म्हणता | म्हणतो |
| २२८ | २३ | वाच | वाचे |
| २३० | १६ | द्रोणा-चार्यांनीं | द्रोणा-चार्यांनीं |
| २३२ | २ | आणुमात्त | अणुमात्र |
| २३७ | १५ | ।न्य | मान्य |
| ३४७ | २ | सीतळा | शीतळा |
| २४९ | १२ | राज | राजें |
| २५० | ६ | माया | मायी |
| २५३ | | ३२५ | २५३ |
| २५४ | १ | घनी | घनि |
| २५५ | २१ | दशन | दर्शन |
| २६० | २२ | भजना | भजनीं |
| २६७ | ८ | रूचे | रूचें |
| २६७ | २२ | सरलां | सरला |

॥ श्रीगुरु प्रसन्न ॥

# सत्संगसरिता.

## प्रथम प्रवाह प्रश्नोत्तरें.

### १ स्मरण म्हणजे कसें ?

चाल–हरिभजनावीण काल०

पद–हालवी न स्मरणाविण माय नेत्रपाती ॥ध्रु०॥
तुझी तूंचि स्मरणरूप। स्मरण वृत्तिची तु भूप ॥
स्मरणिं तुझें चित्स्वरूप। पावशील हातीं ॥१॥
सांडुनिया पंच-विषय। कल्पनेसि दावि विलय ॥
गुरु-वचनीं धरूनि सोय। लावि ज्ञानज्योती ॥२॥
स्मरणाचा ओढि मणी। अर्थ मात्र घेइ ध्यानिं ॥
जा मग तूं हृदय-गगनिं। पाव आत्म-शांती ॥३॥
ऐसि स्मरण शुद्धि घडे। तरिच रूप हातिं पडे ॥
फाकत मग चोंहिकडे। एक तुझी दीप्ती ॥४॥
तदनंतर विसर, स्मरण। आत्मभानुचेंचि किरण॥
'किरण भानु नव्हति आन'। बोलति श्रुति-पंक्ती ॥५॥
अनुभव हा घेउनिया। खेळवि अच्युत तनया ॥
माय माझि होय दया। हीच तुज विनंती ॥६॥

---

### २ महाकारण देह म्हणजे काय ?

आर्या–चित्स्वरुपाचा ज्यावरि आध्यास तयासि बोलिजे देह; ॥
न स्थूल, सूक्ष्म, कारण, न महाकारण स्वता असंदेह. ॥१॥

स्थूलासि सूक्ष्म कारण, स्थूलासूक्ष्मासि मूळ अज्ञान. ॥
अज्ञान जया भासें वदति तया सूज्ञ 'कारण-ज्ञान' ॥२॥
ज्ञाना ठिकाण नाहीं स्वरुपा वाचूनि अन्य कोठेंही ॥
स्वरुपा निहाळिता क्षणिं, लोपति हे चारि देह मोठे ही ॥३॥
वृत्तीचा लय होता, दावि लया तेंचि कारण-ज्ञान ॥
हा भासवीत तीन्ही देहांना धरुनि तेथ अभिमान ॥४॥
अभ्यासिता सदोदित हेंही निरसें गुरूपदीं माय ॥
अबला अच्युत तनया या उपरीं तुज अतां कथी काय॥५॥

---

## ३ पतिताची चिंता प्रभूस कां ?

( चाल—वाघिणी ग मज बाळाते )

पद—"वांकड्या सांज ही झाली । कां बाळी गाय न आली ? ॥ध्रु॥
आयकोनि माझा वेणू । हंबरती साऱ्या धेनू ॥
कोठें ती बाळी नेणू । तिज काय दुर्गती झाली ? " ॥१।
वांकडा वदे "दुर जाई । ती खास पडेल अपायीं " ॥
हरि वदे "सौबला पाही । वाघाची हुडकी जाळी " ॥२।
म्हणे सौबल "सांडुनि पंथा । जी चरेल स्वैर अहंता ॥
तिज वाघचि खाईल ताता." । जाहला खिन्न वनमाळी ॥३।
हें पाहुनि पेंदा बोले । "मुख खिन्न तुझें कां झालें ? ॥
नव लक्ष गाईचे मेळे । वाटवी एक ओढाळी " ॥४।
गोविंद म्हणे गोपाळा । "चपला कीं बहु ओढाळा ॥
परि चुकता माझा मेळा । मग तिला कोण सांभाळी ?" ॥५।
प्रभु दयाळ सद्गुरु माता । पतिताची वाहे चिंता ॥
श्री-पद कमलावरि माथा । ठेविते गाय ही बाळी ॥६।

---

## ४ ज्ञानी कोण आहे ?

पद–ज्ञान ज्ञान सब कोइ कहे बढत जाय अभिमान ॥
बिना प्रेमके ज्ञान नहीं, यह गुरु घरकी पइछान ॥१॥
हरि सांयी तुमपर वारी । गुरु मायी मैं बल हारी ॥ध्रु०॥
धोती पोती आसन मुद्रा, कीन्ही कुंभक जोग ॥
गुरु चरणन पर प्रेम नही है, बडा भयो है रोग ॥२॥
धूप दीप अरु भोग लगावे मालपुरी भर थाला ॥
प्रेमरस तो चाखा नाही, सब झूटा जंजाला ॥३॥
घट घट आतमराम है, घटघट कृष्ण कन्हाई ॥
या बचन की सत्यता बिना प्रेम नहि पाई ॥४॥
योग याग पूजन ना जानू, मै दुर्बल माति हीन ॥
श्री हरे प्राणनाथ सांयी ! व्यंकट जल-बिन-मीन ॥५॥

---

## ५ जग कसें आहे ?

पद–जग कैसे भासतें ? । जैशा–तैसेंच तें. ॥ ध्रु० ॥
जग हें भिंग, बघे जो जैसा । त्या तैसें दीसतें. ॥१॥
वासुदेव-मय सकला पाहतां । काय तुझें नासतें? ॥२॥
सच्चित्सुख गुरु नयनीं वसता । नसती त्रास ते ॥३॥
सोहं अंजन लेवावि बाळा । गुरु मायी हासते. ॥४॥

---

## ६ आनंदाचें अधिष्ठान काय आहे ?

माझा आनंद तूझें पायीं । तुझा आनंद माझे डोयीं ॥१॥
तूज मज ठाव सुख डोहीं । ऐसा आनंद तूं मी पाही ॥२॥
मी तूं हरपे तूझे पायीं । "तू"सी ठावाचि 'मी'विण नाहीं ॥३॥
मी आहे परि करु गति काई । तुजवीण असूनियां नाहीं ॥४॥
सुत म्हणे अहो गुरुमायी । थोडी जागा तव पदिं देई ॥५॥

## ७ त्रिकालज्ञता म्हणजे काय ?

भुजंग०— जयाची स्मृती टाळिते अंतकाला।
भयाची न शंका उरे साधकाला. ॥
समाकार सर्वत्र जो सर्व काला।
नमस्कार माझा तया अच्युताला ॥१॥
कधी जन्मली नाहि, ना नासली जी।
सुधी जी पुढें जोडिती हात जी-जी ॥
त्रिकालज्ञ कालागमाची हि आजी।
"त्रिकालज्ञता काय ते?" पूसते जी ॥२॥

उपजाति—मुग्धा शिशूला नकळेचि कांहीं।
स्निग्धा दयाळू शिकवीत मायी ॥
स्वताचि जी सर्व जगा चितारी।
सुता कळावें म्हणुनी विचारी ॥३॥

शार्दूल०—बाला अच्युतनाथजी! मज तुम्ही सांगा दयाळा हरे,।
काला कालविता तुम्हीच प्रभु जो घासा न एका पुरे ॥
झाला काल कधीं? कसा त्रिविध तो? सांगा शिशूला मला।
बोलावेत तुम्हीच, कीं मज सहेना साहिचा गल्बला. ॥४॥

उपजाति—संतोषुनी अच्युतनाथ स्वामी.।
सुतासि जें दाविति आत्मधामीं, ॥
पदें नमूनी तुमचीच आतां।
वदे तुम्हा श्रीगुरुरूप संता. ॥५॥

बाल मुकुंद स्वरूप

शार्दूल०—कल्पांतीं निजला मुकुंद सकला सृष्टीसि ग्रासूनि हा.।
तल्पा कल्पित पत्र-मात्र. प्रलयीं एकार्णवीं हाचि हा. ॥

शक्ती सुप्त तया सवे. नफुरले 'मी' वृत्तिनें मीपणीं, ॥
मुक्तीचेंचि स्वरूप अच्युत असा कैवल्यदाता धणी.॥६॥

भुजंग०--- सृजावें असें वाटलें नाहिं त्याला ।
मजा काय सांगू तयाचीच लीला ॥
निजानंदिं तो अंगुठा चोखिताहे ।
निजीं जो निजे तो निजीं जागताहे ॥७॥

शक्तिस्वरूप

वियोगिनी- कमला विमला सुलोचना ।
शमरूपा भवजाल मोचना ॥
जननी जगताचि ही खरी ।
मुनि-मानस विश्रामिका बरी ॥८॥
पिवळें पातळ नेसली कसें! ।
भिवया संकुचिना मनी हंसे. ॥
सुचिरा रुचिरा जसी परी ।
शुचिसाधक उद्धारका खरी. ॥९॥
सुखवी हरिला परोपरी, ।
सकला भारति हीच वैखरी ॥
सखि-वेष्टित शक्ति गोजिरी ।
सगुणीं ही गुरुमूर्ति साजरी. ॥१०॥
सुखें-सतें-चितें विभुकाल रूपें नामीं ।
विविधा शक्तिं दिशा निजात्म धामीं ॥
सजली ही बहु अष्टधा भुजानीं ।
भजकांची हरिणी अजा भवानी॥११॥

आयुध वर्णन

कमल=सुख

वियोगिनी- कमला कमला धरी करी ।
सुमनाला सुखवी परोपरी ॥

शंख=सत्

प्रणवारावक शंख तो असा।
खुणवी शाश्वतिच्या सुधारसा ॥१२॥

चित्=सुदर्शन चक्र

फिरतें स्थिरतें हवें तसें।
किरणीं लोपति सूर्य चंद्रसे ॥
तमही आवाडि घेत दर्शनाची।
महिमा कोण गणी सुदर्शनाची ॥१३॥

काल=त्रिशूल

भुजंग०-- जया तीन काटे धरी एक दांडा।
तिहीं टोचती सान थोरा प्रचंडा ॥
हवें तेथ जोडी, नव्हे तेथ तोडी।
त्रिशूला गुणें काल सर्वासि मोडी ॥१४॥

नाम-रूप=चाप-बाण.

उपजाति-- जें नाम तें चाप करांत भासें।
जें रूप तो बाण गुणीं विलासें ॥
रूपासि ध्याता मुखिं नाम गावें।
लक्षासि भेदूनि सुखें असावें ॥१५॥

विविधशक्ति=पाश.

क्रिया कलापीं, मन विप्रलापीं।
द्रव्यासि मापी सकलासि तापी ॥
ही पाशगुंती विविधा परीची।
सोडीवते मूर्ति खरी हरीची ॥१६॥

दिशा=अंकुश.

दूरांतरीं सांनिध दावितାहे।
अंतःपुरी बाहिर वाहताहे ॥

दिशे परी अंकुश भासतो हा ।
निरंकुशीं भासवि भास 'तो' 'हा' ॥१७॥

अनुष्टुप-- सुंदरा सुंदराहातीं सुंदरायुध घेतसे ॥
आयुधाचेचि ध्यानानें चिरायु करिते सुता ॥१८॥

पाही बाल मुकुंद आत्म मातें ।
मायेते निरखीत सायुधातें ॥
साहा चार थकूनि मूक होती ।
ती हातीं ये केवल प्रेमरीती ॥१९॥

उपजाति-- काल त्रिशूला निरखीत लेकरू ।
बालासि हा हेतु, तया करीं धरू ॥
हें काय? ऐसें मनिं आणितां हरी ।
बोले तयातें सगुणा परात्परी ॥२०॥

आत्मशक्ति कालाचें स्वरूप सांगते.

"हा काल हातीं धरिला सख्या मी ।
येतो मला हा बहुताहि कामीं ॥
मोडूनि मांडीन जगा स्वधामीं ।
वेळा न ठेवीन कधीं रिकामीं ॥२१॥
अखंड दांडा मम हातिं आहे ।
उपाधि भेदें तिहिं भेदलाहे ॥
अतीत जो काल निघूनि गेला ।
येईल त्या देख अनागताला ॥२२॥
पदार्थ मी टोचुनिया त्रिशूला ।
ठेवीतसे कल्पित ठायिं लीला ॥
या मांडणीला म्हणतात्ति सृष्टी ।
या मोडणीला गणिती विनष्टी ॥२३॥

वर्ते अतां सांप्रत वर्तमान।
अर्धार्ध तो भूत-भविष्य जाण ॥
अर्धार्ध सोडूनि मधेंचि लक्षी।
काल स्वरूपस्थित काल-साक्षी ॥२४॥
झाले अर्धी तेंवि पुढेंहि होई।
श्रुती ' यथापूर्वमकल्पयत् ' ही ॥
भविष्यकाळीं वसवी भुताला।
भूतामधें आणित आगमाला ॥२५॥
भविष्य तो वर्तुनि भूत होई।
मागूनि ते भूत भविष्य खायी ॥
येणे परी तीनहि भिन्न काला।
एक क्षणीं मी निरखीत बाळा ॥२६॥
मी कालिका कल्पित ज्या परीनें।
काळा पडे तेंवि तसेंचि होणें ॥
युगा परी काल पळांत सारी।
क्षणैक मी दावि युगासि भारी ॥२७॥
" हें पूर्व, हें सांप्रत, हें उदेजें "।
या कल्पना काल-फलासि बीजें ॥
जया असी क्रांति नुठ कदा ही।
काळा गिळाया न गणी पळाही ॥२८॥

अभंग- एक दोनी तिनी। गिळूं पाहे विश्व-योनि ॥
चंद्र सूर्य हे अमूप। सर्व तेथें झाले गप ॥
सर्वकाल ही गार्भिण। सर्वकाल बाळांतिण ॥
प्रसवे ही काळा। गिळूं पाहे माधव-बाळा ॥२९॥

उपजाति— योगी द्विधा राहाति या जगांत।
युंजान जे जोडाति मत्पदांत ॥

ते जाणती सर्व क्रिया कलापा।
माझें स्वरूपीं मिसळूनि बापा ॥३०॥
ब्रह्मा हरी सांबचि युक्त योगी।
मी या तिघा एकलि नित्य भोगी॥
माझें सर्व युक्त म्हणूनिया तयां।
सर्वज्ञता सिद्ध, न जातसे लया॥ ॥३१॥
जें दूर देशी घडिजेल कर्म।
तें जाणण्या सांप्रत-काल वर्म॥
दिशा गिळूनी स्वरूपींच होता।
योगी बने सांप्रत-सृष्टि यंता ॥३२॥
वांछे विना केवल आत्मरूपीं।
'होईल' या वृत्ति मनासि थोपी॥
तो पाहतो सर्व भविष्यकाला।
जी जी क्रिया निर्मित मी स्वलीला ॥३३॥
'कल्पूं तशा सृष्टि करूत आम्ही'।
भक्तासि ही हिम्मत आत्म-धामीं॥
न काळ झाला, नाचि सृष्टि झाल्या।
वांछा तयांच्याचि फळासि आल्या ॥३४॥
भविष्य-कालज्ञ म्हणू नये तया।
माझे सर्व प्राण, जयासि मी प्रिया॥
ज्यांना उमासे नाचि काळ देतो।
त्यांचा आशिर्वाद फळासि येतो" ॥३५॥

* * * * *

ही काहणी लांबलि फार वेळा।
म्हणूनि बाळें अधरोष्ट काढिला.॥
रडेल आता जणुं. माय भ्याली.।
तो आगुधं सर्व गिळूनी गेली ॥३६॥

पाजावया ती सरसावली जसी ।
　　भुजाहि गेल्या शिशु येतसे कुसीं ॥
प्रेमामध्यें एकचि एक राही ।
　　बाळासवें बाळाचि हात मायी　॥३७॥

*　　*　　*　　*　　*

जो का प्रेमीं रंगला अच्युताचें ।
　　तो काळाचा काळ होऊनि नाचे ॥
पावो त्याला विश्वधात्री निजाई ।
　　पाजो त्याला ब्रह्मणी आत्ममायी　॥३८॥

---

## ८ श्रीगुरु चरणांतच काय ?

पद

चरणानें जाहलो धन्य । म्हणुनिया थोर हे चरण ॥ध्रु०॥

गजल––"देवास्ति परम असे हरी" हें बोलते श्रुति वैखरी ।
　　लक्ष्मी पुसे त्यां सुंदरीः–"झालात थोर कशापरी ?" ॥
लावणी–　हरि बोले " घेतलि स्थानें वांटून ।
　　ब्रम्ह्यानें प्रजजन, सांबें रुद्रगन ॥
　　अग्निनें उदर, इंद्रानें भुज जाण ।
　　वसु कंठा रुद्र ललाटा संहरण　॥
चाल०　मज रुचलें हे श्रीचरण, धरुनिया स्थान,
　　झाली अधिष्ठान, जगज्जीवन ॥
चरणानें जाहलों धन्य । म्हणुनिया थोर हे चरण " ध्रु० ॥१॥
गजल––देवांत थोर सदाशिवा अति नम्रते पुसते शिवाः–।
　　"मज कां तुम्ही ठिविलें दुरी, गंगेसि का वाहता शिरीं ?"॥
लावणी–　कैवल्यनाथ तो हर्ष गद्गद झाला ।
　　या प्रश्नें चुंबुनि पार्वतिचे अधराला ॥

---

१ अग्निर्वै देवानामवमो विष्णुःपरमः

बोलिला सतीः-"अजि आत्मा माझा धाला ।
अर्धांग तुला हें देतो घे बसण्याला ॥
चाल० श्रीहरि चरण रजा धुवून, झालि पावन,
माझें भूषण, शांतिचें ठाण ॥
गंगेसि शिरा वाहीन । अहंकार जाळीन । क्रोध नाशीन
चरणानें जाहलो धन्य । म्हणुनिया थोर हे चरण " ध्रु०॥२॥

गजल--जाये अहल्ये गौतुमें पुसिले-" शिले हृदयंगमे ॥
जडता कशी आली तमें, कां दिव्य होसि मनोरमे?"॥
लावणी- बोलिली अहल्या नमुनी पदकमलालाः-।
"इंद्रासि देखुनी मोह मनीं मज आला ॥
मी मनेंचि शिवलें चरणेतर अंगाला ।
त्यागुणें जडत्वीं पावुनि मी पतनाला ॥
चाल० जातिचीं जरि मि ब्राह्मण, क्षत्रिय कोण,
लावि मज चरण, देइ ढकलून ॥
पर-पुरुष लाथ साहून, जाहलें आजि चैतन्य, धन्य ते चरण" ध्रु ३

गजल--भक्तांत थोर महाबळी, पुसते तया विंध्यावळीः-॥
"विष्णूहुनी तुम्हि कां बळी? राखीत तो द्वारावळी?" ॥
लावणी-- बळि म्हणेः- "प्रिये तो कैवारी देवाचा ।
छळि मला परोपरी होउनि याचक साचा ॥
परि तयासि दिधली त्रिपद भूमिची वाचा ।
अव्यक्त व्यक्त तो व्यापी दोन पदांचा ॥
चाल० मग पुन्हां म्हणेः- "मज तीन, पाय देशी न,
भ्रष्ट तव वचन, नरकिं पचवीन " ॥
शत्रुचें पाय वंदून, तृतिय पदा दिधलें स्थान, केले त्या दीन" ध्रु.४

गजल--चेला पुसेः-"श्रीसद्गुरू ' कैसे तुम्हीच परात्परू? ॥
झालात कां जी सुरतरू? विश्रामिता सचराचरू " ॥

लावणी- गुरु म्हणेः-"सख्या मी चिंतितसे तव चरणा।
तुज देखुनि मजला आठवतो गुरु-राणा ॥
तव सेवा करितां पावन मी उत्तीर्णा ।
म्हणुनी तुजला मी क्षणभरि ही विसरेना ॥
चाल० निर्विकल्प तें सांडून, दोहिं येऊन,
होउनी दोन, करिन भव हरण, ॥
या तुझे पाय सेवून, सकलासि थोर मी जाण, तूंचि मम प्राण" ध्रु.५

गजल—कल्पांति बाल मुकुंद हा, चोखीत निज अंगुष्ठ कां!
आली तिथें जगदंबिका, मौनेचि निरखी बालका ॥
लावणी- शिशु विचार करि "ही सुंदर कां मज पाहे?।
अष्ट-भुजा सुस्मित विस्मित वदना आहे ॥
मी कोण ? कशाला चोखित अंगुष्ठा हें ? ।
ही इथें येउनी मजला सांगेल कां हें?" ॥
चाल० बोलिली त्रिपुर सूजाणः-"अहो मम रमण,
विश्व-पोषण, प्रेम-संस्थान, ॥
विप्राचि लाथ खाऊन, कल्पांति राहिला जाण, चोखिता चरण, ॥
चरणानें जाहला धन्य ध्रु० ॥६॥

गजल—मारूनिया जोडा शिरीं, फिरवूनिया निज भोंवरी ।
प्रगटूनिया मग सामुरीं, श्रीस्वामि अच्युतजी हरी ॥
लावणी- चिंतिताचि दाविति मज निज श्रीचरणाला ।
सार जे चुकविण्या जननाला मरणाला. ॥
विज्ञान विरागा विवेक उपकरणाला ।
ठविती अनंताचे पायीं तरणाला. ॥
चाल०- व्यंकटा बोलती खूणः-"काय तुज वाण !
देईनचि जाण, नलगतां क्षण" ॥
मौनेचि देखुनी खूण, सूत मागे कांहिं न आन, लक्षितो चरण ॥
चरणानें जाहलां धन्य ध्रु० ॥७॥

अभंग-- विष्णु, महादेव, अहल्या ती सती ।
भक्ति बळी देती साक्ष गुरु ॥१॥
तीचि प्रचीति हो आली माधवसुता ।
नमन जी संता तुम्हा पायीं ॥२॥
मुक्त ते न येती माझिये सामोरी ।
प्रेमानें मोहरी म्हणुनी भीती ॥३॥
परी काशी क्षेत्रीं मृत झालीं प्रेतें ।
डोंबाचिया लातें मुक्त झालें ॥४॥
प्रिय-प्राणेश्वरी गुरु-शिष्य बोली ।
रहस्याची खोली अनुभविया ॥५॥
धन्य धन्य प्रश्न धन्य हा संवाद ।
लाधला आनंद श्रवण मात्रें ॥६॥
पांगुळते वाचा बरळतें मन ।
चरण महिमा न वर्णू जाय ॥७॥
दास्यत्व न साधे सुत कैसा होई ।
रज होउनि पायीं लागू कैसा? ॥८॥

---

## ९ तप म्हणजे काय? गोपीचा अनुभव.

गजल--सुतपा[1] हरीसि म्हणती, तप काय आचरावें? ।
नित जाचि सासु मातें, सखि कायसे करावें? ॥१॥
यमुने न जाउं देती, मी बंदिवान कैदी. ।
सुमनस्क संत भक्ता मज सासु पाहुं नेदी. ॥२॥
हरिनाम ही मुखानें वदण्याचि भीति बाई ।
वरि चावटी जनांचीं जणु का भुताड खाई ॥३॥
घडिही नसे विसावा, ऐसा प्रपंच धंदा ।
घडलें अशा प्रसंगीं, कशि तोडु या मि फंदा? ॥४॥

---

१ " हिरण्यनाभः सुतपा " विष्णु सहस्रनाम.

उपवास की व्रतानें कशि पाजु लेंकराला ? ।
तप योग केवि साधू सुकुमार गोपबाला? ॥५॥
यावा हरी म्हणूनी घर स्वच्छ सारवीलें ।
नवनीत दहिदुधानें शिंकें उभारवीलें ॥६॥
हरि चिंतिला मनानें. हरिवीण मी उपासी ।
परि तप्त चिंतनानें लंकेत जानकीसी ॥७॥
धाऊनि कृष्ण आला, सुकुमार बाल-केली ।
पाहूनि त्यासि तेव्हां सासू पळोनी गेली ॥८॥
धाला दही दुधानें, नवनीत माखि अंगा ।
भाळासि भाळ लावी, मी जाहलें निरंगा ॥९॥
दोही करें गळ्यासी 'सुतपे!' म्हणूनि कवळी ।
पाहूनि सावळ्यासी नयनाचि शांति झाली ॥१०॥
चित्तींच चिंतणें, हें तप थोर, आन नाहीं ।
तनयाहि माधवाची सांगे नमूनि पायीं ॥११॥

---

## १० चतुर्विध पुरुषार्थ काय ?

पद– पुरुषार्थ काय ते चारी? कुणि तरी मला सांगावें?॥ध्रु०॥
पुरुष तो एक कंसारी, प्रिय पतीच की गिरधारी ।
त्यावीण येथ संसारीं, मज दिसती अवघ्या नारी ॥
त्यावीण कुणा मी गावें? कुणितरी मला सांगावें. ॥१॥
कुणि म्हणती धर्म क्रियेला, पुरुषार्थ एक तो पहिला ।
हरि म्हणः–"सर्व धर्माला त्याग लाग मज एकाला" ॥
कशि हुडकुं दुज्यांची गात्रें? कुणितरी मला सांगावें ॥२॥
कामिनी दुजी मज सांगे:–" भोगिजे काम अनुरागें ।
सार्थता तरिच देहा गे" संशयो मनीं हा वागे ॥
पतिवीण कुणा भोगावें? कुणितरी मला सांगावें ॥३॥
संपदा नटुनिया आली, दागिने शवासी घाली ।

परि द्यूत कलह मद केली, ऐशिया अनर्था व्याली ॥
अर्थ काय तिज मानावे ? कुणितरी मला सांगावें ॥४॥
मोकाट जोगडी कुठली, येऊनी मला विलगटली ।
काथिः- "अर्थ मीच शेवटली मज सवें होय तूं सुटली" ॥
मोकाट कसें हिंडावें ? कुणितरी मला सांगावें ॥५॥
धार्मिका क्रिया, संपत्ती, कामना तशी कीं मुक्ती ।
मज लागिं नारि त्या दिसती, त्यागुणें नव्हें निज-शांती ॥
काय यांत उजवे डावें ? कुणितरी मला सांगावें ॥६॥
धर्मार्थकाम देहासी प्राक्तनें येति उदयासी ।
मानिली मुक्ती आभासी, मी तया वेगळी खासी ॥
पुरुषार्थ काय मानावे ? कुणितरी मला सांगावें ॥७॥
धर्माची श्रीहरि मूर्ती, पापपुण्य त्याचें हातीं ।
तोचि अर्थ सकला अर्थी, करितसे कामना पूर्ती ॥
बद्ध मुक्त लटकीं नांवें. कुणितरी मला सांगावें ॥८॥
श्रीहरीशी मीं भुलवावें, मज संगे त्या झुलवावें ।
प्रेमांबुमधें बुडवावें गहिवरें तया रडवावें ॥
पुरुषार्थ हेचि शिकवावें, कुणितरी मला सांगावें ॥९॥
लक्ष्मीसि दूर हरि सारी, मज सदा घेइ शेजारी ।
सावील तीच मज प्यारी, जाईन तिला बलहारी ॥
बाळुताई विनवी भावें, कुणितरी मला सांगावें ॥१०॥

---

## ११ प्रमाण तें काय ?

गजल- कशाला तूं मला भीसी ? तुझ्यासी द्वैत मज नाहीं ।
कशाचा हेतु ही धरिजे? तुझें मातें नको कांहीं ॥१॥
तुवा मज एकदां दिधलें बसाया स्थान हृदया पैं ।
अतां जें लपविलें कांहीं इथूनी सर्व मी पाहीं ॥२॥

तुवा माझेंचि गाऱ्हाणें सहाचारासि सांगितलें ।
चिरंजीवाचि ही खोडी न मेला हीं तरी जायी ॥३॥
इथें प्रत्यक्ष ही खोटे जरी तें बाधिजे तर्कें ।
पहा प्रत्यक्ष नयनांनीं दिलीसे मृगजळा ग्वाही ॥४॥
जरी आभास हा मोठा, तरी तर्कासहित खोटा ।
मधुरसा शब्द श्रीमुखिचा करी सर्वांचि भरपायी ॥५॥
कधींचा श्रीहरी लडिवाळ या बाळासि बोलावी ।
तरी यावें इथें त्यानेंच होउनि सद्गुरू मायी ॥६॥

---

## ११ श्री हंस स्वामीस

आर्या–हीच विनंति हरि-गुरु भेटावा प्रणव-हंस या दासा ।
अच्युत चिन्मय सुंदर कल्याणाचा निधीच जो खासा॥१॥
प्रणवार्थ-कामधेनू-पय लाभो गुरुपदाब्ज-मधु मजला ।
सच्चित्सुखाचि पायस सेवुनि सारीन संसृती मजला ॥२॥
निज पादुका शिरीं मम स्थापाव्या स्वामि आपुले हातें ।
स्वाराज्य हेचि मजला कां न तुम्ही देतसा स्वदासातें॥३॥
नयनापुढें सुकोमल स्पष्ट दिसावेत नाथ! श्रीचरण ।
भवसागरांत तारक, सारांजन चुकविण्यासि ही मरण ॥४॥
कंस पळोनी जावो, हातीं सुंदर मला मिळो हंस ।
खेळो अंतर बाहिर त्रिकालाचा करूनि विध्वंस ॥५॥
माता पिता सुहृत् सुत भगिनी बंधूहि हंस मज व्हावा ।
जाग्रत् स्वप्न सुषुप्ती तुर्ये माझारिं हंस मी गावा ॥६॥
ठेवी निज हृदयीं मज राहे गा तूं अखंड मम हृदयीं ।
श्रीहंस माउले! या बाळाला पाळिजे तुवा सदयीं ॥७॥

---

श्रीक्षेत्र नाशिक येथील श्रीमत्परहंस परिव्राजकाचार्य **हंस स्वामीच्या**
आशिर्वाद–पत्रास उत्तर.

**पद–दिक्काल गमागम नसती श्रीहंस–अच्युता पायीं ॥**
**हंसासि स्वप्न जें गमलें साच तें मला गे बायी ॥ध्रु०॥**

**हंसराज स्वामी बसला निज ब्रह्मगिरीच्या शिखरीं ॥**
**चघळितो कसा स्वानंदें मुक्ताफळमाळा मुखरीं ॥**
**स्वाराज्य आपलें बघण्या दृष्टिसी दिगंतीं विखरी ॥**
**चाल०**
**निज सिंहासनिं हा बसला ।**
**दुजिया स्थळिं नाहीं फसला ।**
**कुंजांत नाहिं हा घुसला ।**
**उबगला देखुनी कायीं ! ॥१॥**

**पंचरंगि गोजिरवाणें पाखरूं हंस हा राजा ॥**
**चहुंकडे अधोर्ध्व प्रदेशीं वावरती याच्या फौजा ॥**
**याचीच एकली सत्ता नेमस्त याचिया काजा ॥**
**चाल०**
**एकला आंत बाहेरी ।**
**एकला मठीं कीं सेरीं ।**
**बसलाच भरारी मारी ।**
**हंस हा दावि गुरु–मायी ॥२॥**

**चिंतितो आपुली सत्ता; ध्यान यासि केंवि म्हणावें ? ॥**
**प्रत्यक्ष देखतो म्हणुनी जाग्रतीस कोणि गणावें ? ॥**
**उबगला द्वैत भावानें; स्वप्न कीं कपाळ हणावें ? ॥**
**चाल०**
**त्रिपुटीच जन्मली नसतां ।**
**निद्रिस्थ म्हणूं कां आतां ? ।**
**हंसाचि माझिया नाथा ।**
**काहींच अवस्था नाहीं ॥३॥**

देखतां जनस्थानासी खर-दूषण-त्रिशिरा फिरती ॥
घालिती सदा धिंगाणा म्हणुनि तो दृष्टिला परती ॥
हंसाची छाया सोहं, माउली चालली वरतीं ॥
चाल० अहि मही रावणा मांगा ।
सोमेश गौतमी गंगा ।
साउलीनेंचि निज-अंगा ।
गिळिलिया नवल ना कांहीं ॥४॥

दरवडेखोर वाटाडी पांथस्था येउनि भेटे ॥
पांथस्थ मनीं घाबरला, "धन माझें कोठें आटें" ॥
लोभ होय बहु चोरांनां जव पांथस्था भय वाटें ॥
चाल० पांथस्थ आणि वाटाडी, ।
धन आणि दरवडेवाडी ।
साउलिची सासुरवाडी. ।
हंसा न स्वामिया कांही ॥५॥

कपिल कृष्ण पिंगट धूम्रा श्वेत पीत रक्त प्रवाला ॥
चंद्रार्का, विद्युल्लेखा, मरकतश्शाम, घन--नीला ॥
अच्युतानंद हंसाच्या नखमणि-प्रभेच्या ज्वाळा. ॥
चाल० प्रगटल्या कुणाच्या भाळीं ।
त्या होय सौख्य दिपवाळी, ॥
मावळता कवणेकाळीं ।
अच्युतासि रात्र न पाही ॥६॥

ब्रह्मांडीं अथवा पिंडीं, तो अणू, विभू हा, आहे ॥
व्यापकता व्याप्यपणाची हंसाविण अन्य न साहे ॥
"हा" बसूनिया ब्रह्मांडीं, आधार-चक्रिं ही राहे॥
चाल० लिंपिला पृथ्वि गंधानें ।
याजिला वायु धूपानें, ॥

रंगला तेज दीपानें ।
विविधाहि अमृता खायी ॥७॥

अक्षर हें एकचि क्षरतां "हं"-"स"या विसर्गा व्यालें ॥
व्यंजनीं दावि सह-कारा निर्व्याज्य हाचि हा खेळे ॥
सहकारि हंस सोहंता सर्गता विसर्गीं लोळे ॥
चाल० हंस हा विसर्ग-स्वरूपीं ।
सोहं विसर्ग मात्रा पी ॥
हाचि सर्व सहसा व्यापी ।
साहाचि हाचि हा भायी ॥८॥

"हंस" तोचि "सोहं" झाला, सन्मूख आपल्या बसला ॥
नयनासि नयन वेधूनी आपणीं आप हा घुसला ॥
बिंदुल्या बिंदुलें ओढी. बिंदूंत सिंधु समरसला ॥
चाल० बिंदूसि बिंदू जें भेटे ।
अक्षरीं विसर्ग हि आटे ॥
सच्चिदानंद घन दाटे ।
अच्युता अनंतापायीं ॥९॥

अच्युतानंद मातेनें निज हातीं धरिलें मजला ॥
पद ठेउनि मेरू दंडीं घंटारव आधीं केला ॥
उघडुनिया ब्रह्म-कपाटा त्र्यंबकेश दाखवि डोळा ॥
चाल० मग ब्रह्मगिरीवरि नेलें, ।
गौतमी द्वार दाखविलें ॥
वरि प्रदक्षिणा फिरवीले, ।
शिखरासि ठेविलें पायीं ॥१०॥

## १३ जातें काय जातें ?

पद–जातें जातें येतें येतें । स्थीर घरट्ट राहातें ॥ध्रु०॥
जाणें जाई येणें राहूं । तेंचि रूपा आम्ही पाहूं ॥१॥
ऐसें जातें मी दळीन । गुरुपायींच राहीन ॥२॥
जातें दळितां चूर झालें । पीठ ब्रह्मांडीं भरीलें ॥३॥
विनवीते बाळू तायी । करी भाकर सद्गुरु–मायी ॥४॥

---

## १४ संतांचें प्रत्यक्षांतच काय अधिक आहे ?

दोहा– जल बसे कमोदा, चंदा बसे आकाश ॥
जो जाके मन बसे सो ताही के पास ॥१॥
प्रश्नः– चंदा कहे कमोदा! "मैतो तेरे पास ॥
काहेको कुमुलात हो कांको होत उदास ? " ॥२॥

चंद्राच्या या प्रश्नावर कुमुदाचें उत्तरः—

दोहा– कहे कमोदा बिनय से "जगमोहन प्रिय–नाथ ! ॥
जो दुख या हिये[१] बसे नव्हे तुम्हारे साथ ॥३॥
नच्छत्तर परिवारसों नूतन नित्य सुरंग ॥
रमते राम फिरे हों, नाव्हे विरह–उमंग ॥४॥
जानू मैं भी सोमराज ! लता-पत्र-फल-बेल ॥
मनमोहन जगज्जीवन ! सर्व तुम्हारा खेल ॥५॥
घटघट आतमराम है ताही का सब राज ॥
जोग, जाग, जुगत सब प्रगट करन के काज ॥६॥
मैं अति हीन लघुतम, हिय मे तैरी आस ॥
ज्या निशि मो को दिखियो वा निशि करूं विकास ७
जब लौं दया न करि हो, मनही मन मो आस ॥
माधवसुत व्यंकट कहे, पिया बिन बुझे प्यास ॥८॥

---

१ टीप–हृदय.

## १५ बानि मर्दाची–श्रीसमर्थ रामदास स्वामींचें पद

"बानि मर्दाची! मोडीन खोड तट्टाची!॥ ध्रु० ॥
दाणा कानांत चारीन। चारा दुरून दावीन ॥
पाणि ढवळून पाजीन। बानि मर्दाची ॥१॥
खोगीर गळ्यांत घालीन। मेख डोयीवर मारीन ॥
घोडें वाळूंत पुरीन। बानि मर्दाची ॥२॥
रामदासाचें बोलणें। मन–तट्टासी मारणें ॥
सदा स्वरूपीं रंगणें। बानि मर्दाची" ॥३॥

टीका–धन्य गुरु रामदास। प्रचीतीनें वदले खास ॥
शर्त करुनी बोलती। जड मूढा उद्धरिती ॥
याची शर्त ती मर्दाची। खोड मोडिती तट्टाची ॥
अल्प मती अच्युताचा। सुत बोले त्यांची वाचा ॥१॥
सदा वाचाळ हें मन। विकल्पी घे आडरान ॥
ऐसा शब्द या देईन। ज्याचा उच्चार गहन ॥
परी तोंडासी येई न। ऐकूं जाता मूर्च्छित कान ॥
येणे परी होई लीन। " दाणा कानांत चारीन!" ॥२॥
मन चरें इंद्रिय मेळीं। जया देखें त्या कवटाळी ॥
यासी घालूनि होटाळी। दाविन तत्स्वरूप पोळी ॥
मन नेत्र टवकारून। पाहिल तें लाउनि ध्यान ॥
राहिल झुरून झुरून। " चारा दावीन दुरून !" ॥३॥
मन सर्व रस चाखें। रसास्वादानें हरिखें ॥
लोळवीन या विवेकें। यासी पोळवीन दुःखें ॥
माती "नेती"ची घालीन। पवनानें ढवळीन ॥
यासी नित्य रडवीन। " पाणी ढवळून पाजीन! " ॥४॥
दाणा, चारा, पाणी, यासी। बळें चारिता उपवासी ॥
परी सोडीना हें खोडी। कधीं चावें, लाथ झाडी ॥

नरडी लंबिका चंपीन। सदा सेवेसी लावीन ॥
प्रेमपाशानें बांधीन। " खोगीर गळ्यांत घालीन!" ।५॥
जरी उपासी उदास। वासनेचा येता वास ॥
तरी देतसें हें त्रास। क्षणीं लंघितें आकाश ॥
खुंटीं सद्गुरु-चरण। सूक्ष्म रंध्रांत ठोकीन ॥
मना ठायींच ठेवीन। " मेख डोईवर मारीन! " ॥६॥
ऐशा परी मन मेलें। शव वाळुनि कोळ झालें ॥
परी शवाचिये भेटी। नेणों येईल हें पाठीं ॥
शवा शांभवीं लोपीन। नोळखें हें दिशा स्थान ॥
धर नाहिसा करीन। " घोडें वाळूत पुरीन! " ॥७॥

उपजाति—
गंभीर गूढाहुनि अर्थ साचा ॥
मूढा मला केवि स्फुरेल वाचा ॥
श्रीरामदासें कथिला पदीं जो ॥
दावोत श्रीअच्युतजी पदीं तो ॥८॥
मनाचिया नाचणि मोडण्याला ॥
तनाचिही जाचणि तोडण्याला ॥
नाशावया मृत्युचिया अपाया ॥
अभ्यास योगें कथिलें उपाया ॥९॥
श्रीरुद्ररूपें अवतार झाला ॥
घालावया साहि रिपूसि घाला ॥
समर्थ संतामधि हाचि खास ॥
बोधी असा सद्गुरु रामदास ॥१०॥

भुजंग०—
नसें मंत्र तंत्रादिकीं बोलणें हें ॥
नसें कार्य कल्पादिकीं हालणें हें ॥
नसें दृश्यमात्रा सवें मारवणें हें ॥
नसें हर्ष शोकादिका चाखणें हें ॥११॥

न कांहीं करी आपले प्रेरणेनं ॥
पर-प्रेरणा होत तीतंहि नेणं ॥
असं भाग्य ज्या सुप्रभातीं उदेलं ॥
तदा भासतं घोडमं आजि मेलं ॥१२॥
उपजाति— मेलं असा होय कदापि भास ॥
शवीं तदा तें मन येत खास ॥
साम्यस्थिती शांभवि माजिं लोपतां ॥
भेटेल श्रीअच्युतनाथजी सुता ॥१३॥

———

## १७ वैष्णवानीं शिव-उपासना करावी कां?

अभंग— एके दिसीं विठो उगीच बैसला ॥
नेणो तो रुसला माझेवरी ॥१॥
म्हणे "तुवा मज वचन दिधलें ॥
आतां कां वरिलें महादेवा ? ॥२॥
व्यभिचारी ऐसी जाहलीस आतां ॥
आमुचं हें चित्ता मानवेना" ॥३॥
हळूच मी तेव्हां जोडुनिया कर ॥
पायीं ठेवुनि शीर विनविलें ॥४॥
"उघड जो तुम्ही मिरविता शिरीं ॥
तया घेता करीं बाटलें कां ?" ॥५॥
तव शिव म्हणे " फिरे परनारी ! ॥
शिवू नको दूरी होय कसी " ॥६॥
बोलिले म्हणाल "शिव शिव" जरी ॥
शिवणार तरी नाहीं तुम्हां ॥७॥
जटे माजीं तुम्ही कोणा लपवीलें ॥
ऐसा वा आले सहजची " ॥८॥

आलिंगाया मज उभयता धावले ॥
मी तव निष्ठले अकस्मात ॥९॥
हरीहर एकमेका आलिंगीत ॥
पाहते गम्मत बाळूतायी ॥१०॥

---

## १८ हरींची दया कशी आहे.

पद—श्रीहरि दीनदयाळू । भक्तांचा कनवाळू ॥ ध्रु० ॥
स्थिर चरि व्यापक राहुनिया, करि सर्वांचा प्रतिपाळू ॥१॥
सुखवी भक्ता, पाळी अभक्ता ऐसा हा स्नेहाळू ॥२॥
दीन होउनि यासी बाहतां, नाहि कृपेसी वेळू ॥३॥
उद्धट वर्तन करितां, सत्वर स्नेहें बडवी टाळू ॥४॥
ऐसि कृपा ही अखंड वर्षे, अंजलि पात्रि न्यहाळू ॥५॥
लाभ हानिनें सुखि ना दुःखी, तीच कृपा थोराळू ॥६॥
माधव-सुत म्हणे अभय कृपेनें अच्युत मज सांभाळू ॥७॥

---

## १९ मन कसें अर्पावें ?

ओव्या—पहा तुझी केवढी कृपा । तुवां संकोचुनी स्वरूपा ॥
मज घेतलेंसि अनुकंपा । निजासनीं ॥१॥
एकचि तूं एकली । निजासनीं अससी बैसली ॥
परी तुज दया आली । रडातियाची ॥२॥
आपणासि आकुंचिलें । सर्वेचि द्वैत कल्पिलें ॥
लेकरूं हें घेतलें । अंकावरी ॥३॥
जरी हें रडतेना । येतां केवि तुज पान्हा ॥
जे विसरूनिया निजभाना । झालीसि द्विधा ॥४॥
आतां अभेद्यस्थिती बोलसी । तें सांग कीं कोणासी ? ॥
आणि किल्बिष होतें कवणासी । ते कवणासी स्पर्शे ? ॥५॥

प्रसवतां धेनू पाडसा । स्नेहें चाटीत सौरसा ॥
तिज भान नाहीं मळ ऐसा । तिचे आंगीचा म्हणूनी ॥६॥

वत्स अथवा मळ । तीच गाउली केवळ ॥
करितसे स्नेहें निर्मळ । निज-वत्सा ॥७॥

म्हणूनि मळाचें सांकडें । कांहीं नसें वत्साकडे ॥
आपलेपणचि रोकडें । मूळ दयेला ॥८॥

वत्साची देखूनि दीनता । पातला द्रव तुझें चित्ता ॥
आणीक मी या परता । काय बोलूं ॥९॥

मी तरि अज्ञान लेकरूं । न कळे मातें निर्धारू ॥
हें मन माझें, हें परू । माय गंगे ॥१०॥

एक हें येवढें कळें । जें मन हें ऐसें चळवळें ॥
परी कदापी न निवळें । कोणाचें म्हणूनि ॥११॥

कैसें यासि जिंकूनि घेऊं ?। अथवा यासि टाकूनि देऊं ? ॥
का खळबळ पहात राहूं । निस्पृटपणें ॥१२॥

दिसलें मन म्हणूं माझें । त्यावरी कोण चिन्ह साजें ? ॥
रामा स्फुरतां कां देईजे । कृष्णें वस्तू आणुनी ? ॥१३॥

अथवा गोविंद जें बोलें । तें गोपाळासि आधींच कळें ? ॥
ऐसें कां मांडावें कुटाळें । दुवाड मनें ? ॥१४॥

म्हणूनि मना ऐसें कुटाळ । धुंडितां न मिळें भूमंडळ ॥
यासि सोडूं कैसें ? माय स्नेहाळ ! सांगे मज ॥१५॥

श्लोक- मन कौटिल्य तया कसें करू ? ।
म्हणसीः-सोड, मुला ! नको धरू ॥
विनती ही पुढतीः- वसो सदा ।
मन कौटिल्य-सहीत त्वत्पदा ॥१६॥

## २० माय लेंकराचें प्रश्नोत्तर

मूलः– "तुजवरती हो माते ! भक्ति नसे कां मजला?"।
माताः– "मजविषयीं रे नीचा! स्नेह नसें तिळ तुजला" ॥१॥
मूलः– "तरि मग तूं मजवरती करिसी कां लोभाला?"।
माताः– 'हें पुसण्यातें कीटा! हक्क नसे कोणाला" ॥२॥
मूलः– "ज्या पात्रीं जेविसि तूं त्यांतचि दे मज काला"।
माताः– "अमृत हें सेवित मी, ठेवियलें विष तुजला" ॥३॥
मूलः– "चल माझा न्याय तूं दे"।
माताः– "न्याय तुझा मी केला" ॥
मूलः– "तरि तो तूं कळवि मला"।
माताः– "पूर्णपणें मज कळला" ॥४॥

## २१ दृष्टि मोठी कीं सृष्टि मोठी ?

पद–दृष्टि मोठी कीं सृष्टी मोठी?।
सृष्टि तितुकी ती एकचि दृष्टी ॥१॥
ऐशा सृष्टिच्या अगणित कोटी।
होती जाती या दृष्टिच्या पोटीं ॥२॥
ऐसी दृष्टि ती माझीच सृष्टी।
कोटी सृष्टीची एक विनष्टी ॥३॥
नांद विनाष्टि माजी तुष्टी।
कोटी तुष्टिची एक ती पुष्टी ॥४॥
माधव कन्येसि नको तुष्टि पुष्टि।
वाटे राहावें संतत कष्टीं ॥५॥

## २२ प्रश्नः–माया साधक किंवा बाधक ?

आर्या–'माया साधक अथवा बाधक ?" कोणीं विचारिलें कवणा?।
मग सांगेल तुम्हा तीः-"सिंधूं कैसा बचेल ती लवणा" ॥१॥

मायेनं कोणातें साधावें ? सांगिजें तुम्ही आधी ॥
सांगेल मग तुम्हा तीः-कोणा कोणा कशी कशी बाधी ॥२॥
आधीं सांगाः-माया कोठें, कोणा, कशापरी दिसली ? ।
सांगेल मग तुम्हा, ती फसवी कीं तीच बापुडी फसली ३
सोडा ईच्या गोष्टी, ब्रह्मायीच्या पदा उरीं ठेवा ।
सेवा अखंड. सेवा केल्यावाचुन मिळेल कां मेवा ? ॥४॥
घुसळूनि रिता डेरा आंबट ताकासि देत मी घ्या या ।
वारि माधव-कन्या ही विनवी "माझेवरी करा माया" ॥५॥

## २३ फिकीर कशाची ?

पद–लाख फिकिर कुई खाक की कीजे, खाकभि हात न आई रे ध्रु०

साख हरी की, गुरु–गुण गावत शांती ऊर सुहायी रे ।
भाख गुरुकी हरिरुप ध्यावत प्रीतमे प्रीत समायी रे ॥ ॥
पृथ्वीकी जो फिकिर करूं, तो मेरू-शीर चढाई रे ।
जलकी फिकिर करूं, तो यहमन सागर-तल डुब जाई रे ॥२॥
फिकिर अगन के बीच मगन हो, चिंता चिता चिताई रे ।
वायू के तो जिकिर जिकिर में फिकिराहि फूकर जाई रे ॥३॥
आकाश कु अवकाश कहीं, लव धूंडी तो नाहि पाई रे ।
बीत गये सो भूत कहावत. भूत अभी जो नाही रे ॥४॥
डगमगती नाहि मेरी सखिया सद्गुरु-अच्युत-मायी रे ।
और फिकिर की जिकिर मकर मों लेखत बाळू तायी रे ॥५॥

## २४ कारण काय रुसाया ?

पद–इतुकें ! कारण काय रुसाया ? माझें नयना आड बसाया ध्रु०
स्थिरच्चर व्यापुनि, माझें हृदयीं कारण काय नसाया ? ॥१॥
संसारामधिं मजला फांसुनि, तुज तेथें न फसाया ॥२॥
परता पाहसी, बोलसि न मसी, येत भि नाहि हसाया ॥३॥

म्हणसीः-"जवळचि सदा असे मी," कारण कां न दिसाया? ॥४॥
शामसुंदरा! हें तव लपणें वाटे प्रेम ठसाया ॥५॥
माधव-सुत म्हणेः-दर्शन देई, वाढवि प्रेम रसा या ॥६॥

---

## २५ अघमर्पण म्हणजे काय?

आर्या–परि श्रीहरे तुझी ही मूर्ती माझे पुढें जशी आली।
तेव्हांपासुनि कुलजन-मर्यादा पार नाहिसी झाली ॥१॥
म्हणुनी सलगी केली, करितो, आणीक ही करीन खरा।
जरि लाजलों तुझ्यासि,काय तुला मानवेल तो नखरा? २
अधिकचि गोडी वाढे, अधिकाधिक सख्य हें मनीं दाटे।
पूर्ण-ब्रह्म-परात्पर! तुजला कांहीं न शीण तो वाटे ॥३॥
जन्मापासुनि झालें सारें तें कर्म तुजपुढें मांडूं।
ऐशा निवेदनाची चिळसी येतां, मला नको सांडू ॥४॥
प्राण निरोधें, बुद्बुद वृत्तीचा[1] जणुं जळा-तळीं तुंबी।
उसळेल, मागुती जरि सामुग्री येउनी तिला चुंबी ॥५॥
हा दोर वासनेचा नेणों कैं पासुनी कसा वळला?।
पूर्वानुसार पुढतीं पीळ पडे तो नव्हे कुणा कळला ॥६॥
उकलावा पीळ कसा? म्हणुनी इतिहास पाहिला अपुला।
इतिहास सांगता तुज, पीळ तुझे पायिं सर्व तो खपला ७
"उफराट्या दृष्टीनें देखावें–" सांगती मुनी संत।
बुबुळें पुढेंचि बघती दृष्टीचा घेइजे कसा अंत? ॥८॥
अथवा मुरडुनि डोळे, मिचकाउनि पाहिलें कला कुसरी।
रंगांत रंगला, परि श्रीरंगा देखिलें न एकसरी ॥९॥
जें जें देखूं गेलों, तें तें होउनिया पुढें ठेलें।
उफराटेंहि सवासें. उफराटें तें नव्हे कुणीं केलें ॥१०॥

---

१ वृत्तीला.

पिंडारंभापासुनि जें जें पिंडा-मनासही घडलें ।
देखों जातां, वाटें मजला हें काय स्वप्नसें पडलें ! ॥११॥
स्मृतिमात्र स्वप्न जैसें वस्तुविना. तेवि जीव-लीलाही ।
त्यावीण काय माझें अडलें? तें सांगिजेल लवलाही ॥१२॥
फेडूनि शब्द कवचा, ऐसें चित्सागरामधें नाहू ।
आजि वरी जें झालें, सर्वचि सौख्यामृतामधें वाहू! ॥१३॥
ऐसें आत्मनिवेदन, अघमर्षण गोड तें, मला लाधो ।
पुनरागमन भयप्रद इतरा, परि तें मला न भय बाधो ॥१४॥
फोडुनि मृण्मय कवचा, प्राण मनोमय गमागमीं सोडूं ।
विज्ञानाशिहि ग्रासुनि, आनंदीं आपुलें पदा जोडूं ॥१५॥

---

## २६ शिवशक्तींचें स्वरूप कसें आहे ?

" श्रीकृष्ण-किंकरी=" श्रीगुलाबराव महराज प्रत्यक्ष शिवशक्तिचें एकरससम स्वरूप आहे.

पद- श्रीकृष्ण-किंकरी, माझी प्रिय शंकरी ।
माधवी अच्युती ब्रम्हणि विश्वंभरी ॥ध्रु०॥

शिवशक्ति आटणी एकांगीं साजिरी ।
धवळलें हृदय, किति शोभतसे गोजिरी ॥
कवळिते मुकुंदा सखि ही अभ्यंतरीं ।
जवळि येउनी, अवलोकित मी, तव मज भासे हरी ॥
कवण ही नटण्याची चातुरी ! ॥१॥

भुललिसे आपणा कान्हायी सावळी ।
गुलजार प्रेम हें, गुलहौसी बावळी ॥
खुलविली उन्मनी, फुलली चांफेकळी ।
गुलाब गोकुळीं बुलबुल झाला, डुलके ठुमके परी ॥
भुले कीं भुलवी कोणातरी ॥२॥

सजलि ही परोपरी भुलवाया श्रीपती ।
कज्जली हरीची नयनीं ल्याली सती ॥
गजगती न गाणिते निंदक जरि भुंकती ।
तुज मज टाकुनी, भजली अनुदिनीं, व्रज–नायक श्रीहरी॥
निजांना निजगुज दे निजकरीं ॥३॥

अंगणीं नाचते, छुम छुम पद टाकिते ।
रंगली साजणी चंद्रकला फाकते ॥
संगीत गडे ! हें हृदयांबरिं व्यापितें ।
लगबग टाकुनि, निज पाया तळिं जन-तन-मन कुस्करी ॥
जगासी करिते ही मस्करी ॥४॥

डावियें करीं जणु हिनें घेतली पुरी ।
दाविते भुक्ति-मुक्तींतें एकेसरी ॥
लावुनी लळा, जणुं देइल हातीं तुरी ।
पाहु नको, हा खाउचि आमिष, खाउ नको ही पुरी ॥
पावतां तृप्ती, पडसी दुरी ॥५॥

कासया लपविशी उजवे हातीं सुरी ? ॥
हाससी आतुनीं, वर म्हणसीः "सर दुरी" ।
त्रासवीन तुज, पद कवळुनि दोनी करीं ॥
नास होउ सर्वस्वी सखये! कान्हायी सुंदरी ।
सुरीं सह राहे व्यंकट उरीं ॥६॥

## २७ प्रश्न—उपासनेस अशौच प्रतिबंधक आहे काय ?

उत्तर—नित्य उपासनेस नाहीं, व भक्तीस नाहींच नाही.

श्रीहरि–यशोदा संवाद. पद ( राग–काफी, ताल–दीपचंदी )

श्रीहरिः—

"कां सरसी अति दूरी ? अमये !" ॥ध्रु०॥

यशोदाः—

" काऊ शिवला म्हणुनी बसले बाहिर मी दिन चारी ।
तुजला, श्रीपति ! शिवतां मजला निंदिति हे संसारी" ॥१॥

श्रीहरिः—

"येरे गरुडा ! लवकर येउनि सगळे काऊ मारी ।
अमये ! भूकचि लागलि भारी. नलगे शीरापूरी " ॥२॥

यशोदाः—

"थोर अतां तू बाल मुकुंदा ! सावळिया गिरधारी ।
हट्ट नको करू, घेउनि खायी तेथिल गोड शिदोरी" ॥३॥

श्रीहरिः—

" दहि तें आंबट, दूधहि पांचट, लोणी ओषट भारी ।
वडा तिखट, पापडही खारट, घेवर देत सिसारी ॥४॥

*    *    *    *

गडबड धरणीं लोळण घेई लाघवि हा कंसारी ।
साहत नाही तिळभर अंतर नेणे कांहिच थोरी ॥५॥

शंका संशय शोक मोह मद सर्वहि गुप्तचि चोरी ।
निर्मल स्नेहें पाजि यशोदा अच्युत-बाळ विचारी " ॥७॥

# प्रवाह दुसरा.

## १ श्री सद्गुरु अच्युतानंद स्तोत्र.

वंदे श्री अच्युतं देवं सच्चिदानंद-विग्रहं ॥
विन्यस्त-माया-व्यामोहमादिनाथं चिदंबरं ॥१॥
गुरुरित्याख्यया साक्षात् स्वयंभुर्योगविद्वरः ॥
चरणांगुष्ठमात्रेण सर्व-विद्या-प्रबोधकः ॥२॥
यत्पादुके स्वदासाय हस्तेन शिरसि व्यधात् ॥
घनानंद-स्वरूपेण हृदये प्राविशद्विभुः ॥३॥
किमेतद्दीनवात्सल्यं ! किमेतत्करुणामृतं ! ॥
आविर्बभूव नयने दिव्यचिन्मात्ररूपधृक् ॥४॥
नाहं कांक्षे परं किंचित् विना त्वत्पादचिंतनात् ॥
त्वत्पादकमलं मन्ये वरं वैकुंठदर्शनात् ॥५॥

---

## २ विठ्ठल विठ्ठल बोल !

पदः- विठ्ठल विठ्ठल बोल । वाचे विठ्ठल विठ्ठल बोल ॥ध्रु०॥
सागर खवळत लाटा उसळत भवरा गिरकत गोल रे
नाव तुझी ही बुडूं लागली, सांभाळ तिचा तोल रे ॥१॥
शीड उभारी खऱ्या दिशेनें, रोउनि बळकट डोल रे ॥
डोल काठि ही जरि कां कुचकी, नौका खाइल झोल रे ॥२॥
फेस मासुळ्या दर्यांतिल या, नसती कवडी मोल रे ॥
नको इथें तू थांबू, दर्या अधोगामिनी खोल रे ॥३॥
आप तरुनिया दुज्यासि तारी, हृदयीं धरावी ओल रे ॥
मार मार तूं व्हलें मुक्यानें, बोल बापुडे फोल रे ॥४॥
भूक लागली म्हणुनी मंदा ! कां करिसी कोल्हाळ रे ॥
सोनकेळ हे तुझ्याचि हातीं साल तेव्हढी सोल रे ॥५॥

### ३ मीनाक्षी स्तोत्र.

पद- स्वस्वरूपें मीन एक शांत सागरी ॥
फिरत लेश काळजिचा ना मनीं धरी ॥
पाश-हस्त कामिनि एक त्रिपुर-सुंदरी ॥
प्रेमामिष फेकुनिया, मीन-मन हरी ॥१॥
मीन बंध चित्कलांसि, आमिषा न तो ॥
शांति सरीं बिंब बघुनि हर्षि दाटतो ॥
जाणुनिया आमिषासि सहज ग्रासितो ॥
आरूढाचि ऊर्मि शीघ्र सकल नासितो ॥२॥
एक ठायिं बस्रुनि कला टाकित गळा ॥
गळ उरांत आडकला, नवहत वेगळा ॥
देहभान गळुनि जाय कंठ दाटला ॥
काय उरें गळण्याला? नचि कळे मला ॥३॥
मीन ओढण्यासि हिचा यत्न तो रुला ॥
सागरांत आंत आंत मीन चालला ॥
मीन प्रेम मीनाक्षी लागि दाटला ॥
मीनाक्षी सहित मीन तळपटीं अला ॥४॥
त्रिपुरांतक विश्वजननि त्रिपुर-सुंदरी ॥
बिंदु त्रिकोणात्मक ही प्रेम-ओवरी ॥
त्र्यंकट मीना प्रेमें घेत निजकरीं ॥
नयनिं मीन, मीनाक्षी म्हणुनि साजिरी ॥५॥

---

### ४ गुरुचा धावा

घनाक्षरी-ये माते! मन मानस हंसे। कान्हाची चैतन्य विलासे ॥
चिद्रुप रुचिर सगुण सुरसे। श्री सद्गुरु मायी ॥१॥
मी तव पडलें तुझिये शरणीं। तुझिये गुणरूपाचें स्मरणीं ॥
कनवाळे! मज आठिये चरणीं। ठाव कधीं देसी? ॥२॥

नावडतो मज प्रपंच धंदा । अखंड मन घे तुझिया छंदा ॥
पाडिलेस मज तूं निजफंदा । न कळे तव लीला ॥३॥
निधान तूं मम हातीं आलें। परि मीं नेणुनि टाकुनि दिधलें
अभिमानें निज-हित अंतरलें । सान्निध तूं असतां ॥४॥
हितगुज तुजला पुसिलें नाहीं । सेवा ही मज घडलि न कांहीं
समरांगणिचा सरता घाई । शौर्य नये कामा ॥५॥
आतां तुजला हीच विनंति । दास्यत्वीं मज ठेवी पुढती ॥
द्यावी आत्मस्थिति कीं मुक्ती । अधिकारी लोकां ॥६॥

---

## ५ हरि पांडुरंग कृपा खरी

गजल–हरि पांडुरंग कृपा खरी, वरि माधवाचि दया बरी ॥
मज आजि अच्युत सागरीं, निज माय लाधलि गाजिरी १
जगदुःख दावि अनेकधा, गगनापरी न ढळूं कदा ॥
बघुनी तला जडलों पदा, सगुणींच तूं बहु साजिरी ॥२॥
वदनीं तुझ्या अघ आटतें, रुदनीं मला सुख वाटतें ॥
हृदयाभ्र जें घडिं फाटतें, स्वदयेसि येसि तिथें खरी ॥३॥
मम पामरत्वचि देखतां, सुमनें कशी द्रवते स्वता ॥
मनिची अशी विमलामृता कुणि पाहिलात कधीं तरी ?॥४॥
जरि दोष मी तिज लादितां, वरि रोष व्यर्थहि दावितां ॥
करुणाप्रसादचि पावतां, हरिला इची न बरोबरी ॥५॥
शिव देत वांछित सेवका, जिव घेत आधि परी निका
मज वस्तु देत अयाचका, निज माय शंभुहुनी बरी ॥६॥
उतराइ होउं कसा कधीं ? सुत म गतोः मज दे सुधी ॥
स्मत ये तुरा सुख-दे! जधीं, शत कोटि यज्ञ फलापरी ॥७॥

---

## ६ जरी रागावली आई

गजल–जरी रागावली आइ अम्ही चुपचापसे राहूं ॥
लपूनी आड दाराच्या तिचें तोंडाकडे पाहूं ॥१॥

अम्हाला भूक त्रास देते, तरी चोरूं नये कांहीं ॥
हळू साधूनिया संधी, तिचे ताटामधें जेवूं ॥२॥
जरी ती दूर जा म्हणते, सभोंती घालिजे घिरट्या ॥
न घेई ती कडेवरती, उगे पायापसीं राहूं ॥३॥
न पाहे ती जरी इकडे तरी आकांत मांडावा ॥
तिला येईल कीं करुणा तधीं निज शांतितें लाहूं ॥४॥
न ठेवूं मानसीं आम्ही कधांही द्वेष भावासी ॥
अम्हांला सारखी देखे, कशाला मत्सरा वाहूं? ॥५॥
इचें कारुण्य आटेना, अशी ही माधवी माता ॥
अरे या लेकरांनो! या इला थोडें तरी चाहूं ॥६॥

---

## ७ कां मशि बोलत नाहीं?

पद कां मशि बोलत नाहीं। आई ॥ध्रु०॥

अन्याय माझे अगणित कोटी पोटीं घेइ विठाई ॥१॥
कोठें लपली कांहिं कळेना, नाचि प्रत्युत्तर देई ॥२॥
तुझा अबोला जड हा भारी, चारी प्रेम मिठाई ॥३॥
नाठवितां तुज होय विकल तनु, मनिंची जाय धिटाई ॥४॥
आठवितां तुज ऊरचि तडके, भडके आग सवाई ॥५॥
आठव नाठव स्वाधिन नाहित, माहित होत न कांहीं ॥६॥
माय! दया करि ना तरि आतां, हा सुत राहात नाहीं ॥७॥

---

## ८ जगदंबा-स्तोत्र

गजल- तूं माय माझी हो खरी, पाशी मला तु परोपरी ॥ध्रु०॥
मी देह होतां प्राण तूं, वागीवशी मज जाण तूं ॥
जगण्याशि एक निपाण तूं, तुजवीण ही तनु खापरी ॥१॥
मी प्राण होता खळबळीं, मम मानसे! तुज डळमळी ॥
माझि तुझी ही सांखळी, जखडूनि यतिवीरा धरी ॥२॥

मन होय मी सौदामिनी, तूं होसि तेव्हां उन्मनी ॥
उगमास्त दोहींची धनी, तूं एकली सकलेश्वरी ॥३॥
घेऊन मज अंकीं झणीं, मज देसि निजपय पाजणी ॥
मज टेविसी एकासनीं, कैवल्यनाथे सुंदरी ॥४॥
करुनी पुन्हा "नंदी" मसी, वृत्तींत व्रात्यपणें अशी ॥
आरूढ तूं रुचते तशी नेतेशि मज देशांतरी ॥५॥
जें होतसे निशब्द मी, स्फुरसी स्वतां तूं संभ्रमीं ॥
तूं येशि आधीं मध्यमीं, तेव्हां वदे मी वैखरी ॥६॥
येतेसि जैं दृष्टीमधीं, मी होतसे सृष्टी तधीं ॥
आतां सृजी कीं तूं वधी प्रभुता तुझीच खरोखरी ॥७॥
संबंध अपुला हा सये! प्राचीन अति विबुधप्रिये ॥
दिक्काल जें उदया नये, आतां कसें होशी दुरी ॥८॥
माझी तुझी ऐसी गडी, खेळूत आतां फू-गडी ॥
लावूं भवा देशोधडी, ही नाचण्याची चातुरी ॥९॥
सगुणागुणीं सचराचरीं शयनासनीं निशिं वासरीं ॥
अच्छी बुरी कुटिला खरी, मसि गोड तूं सकला परी १०
पाहूनि माधव-कन्यका, तद्रूप झाली अंबिका ॥
तूं मीच मी तूं अन्य कां? निवडी कसें कोणी तरी? ॥११॥

---

## ९ हरि येवो धावत

( होरी–दीपचंदी )

हरि येवो धावत, हृदयिं समावत, माझा चित्त विसावा ॥ध्रु०॥

त्याविण सखये बहु तगमगलें ॥
जनवन हुडकित फिरफिरु दमलें ॥
कोठें गुप्त असावा? हरि येवो धावत० ॥१॥

श्रमतां विषतरु आश्रियला परि ॥
भडभडते मज अधिकाधिक उरिं ।
वाटे देह नसावा. ॥ हरि येवो० ॥२॥
मुनिवर श्रुतिधर हरि हरि स्मरती ।
झुरती मुरती परि " न न " करिती ॥
कोणा कोठे पुसावा?॥ हरि येवो० ॥३॥
लपला निपजति जणुं कमलांतरिं ।
कमला पलपल दल दल विवरी ॥
तीतें हि न गवसावा ॥ हरि येवो० ॥४॥
दामोदर चालक चित्तमणी ।
वाटे चरणीं बळकट धरुनी ॥
स्निग्धा दोरें कसावा ॥ हरि येवो० ॥५॥
अबला विनवी अच्युत-तनया:-।
मजला तरि न्या, त्या घेउनिया ॥
नयनीं तोचि वसावा ॥ हरि येवो० ॥६॥

---

## १० जाग्रति स्वप्न सुषुप्ती मावळली

पद- जाग्रति स्वप्न सुषुप्ती मावळली ।
तूर्या उन्मनी देखतां बावळली ॥
तुझी अखंड ज्योती पाजळली ॥१॥
अंबाबाई सावळे विठाबाई । कृष्णाबाई वेल्हाळे शामाबाई ॥ध्रु०॥
प्रकृती पुरुष हीं तुझीं रूपें दोनी ।
कां गे! व्यापिलीस ऐसी सांदीं कोनीं?॥
ऐशा प्रगटा तुज हुडकावें कोणी? ॥२॥
कैसी जागलीस गिळुनी जाग्रती ।
कैसी निजलीस निजउनी सुषुप्ती ॥
ध्येय ध्याता झालीस ध्यान-वृत्ती ॥३॥

तुज देखो जातां स्वप्नीचें देखणें ।
तुज स्तवूं जातां झोंपीचें घोरणें ॥
तुज नमितां तूर्ये गेल ठाणें ॥ अंबाबाई० ॥४॥
माधव-कन्या तुज वेगळी कोठें ? ।
काय मागिजे कृपा-दान मोठें ? ॥
तूंचि सर्व सबाह्य उफराटें ॥५॥

## ११ हरिचा रोग

पद-हरि रे! रोग तुझा मज लागो ॥ध्रु०॥
रात्रं दिन कधिं झोप न येतां, जीव सदाचा जागो ॥१॥
तव-नाम-रसा प्राशन करितां, भूक तहान न भागो ॥२॥
कान न ऐको, नेत्र न देखो, जगता मन वैतागो ॥३॥
रग रग पसरो रोग तुझा बा ! अंतर बाहिर वागो ॥४॥
माधव-कन्या तुझिया ध्यासीं आणिक कांहिं न मागो ॥५॥

## १२ वाकडयाचें दशावतार-स्तोत्र

आर्या-प्रलयार्णवीं स्वशृंगीं नौकेला बहुत काल वागविलें ।
भव-मृगजलांत मजला सांग सख्या ! त्वांचि कवि नागविलें ? १
कंडू-शमनासाठीं मंदर पाठीवरी तुवां धरिला; ।
मज हें खरें न वाटे, मत्पातक भार त्वां न आवरिला ॥२॥
क्रोडेश्वरा ! समुद्रामधुनी त्वां काढिली धरा देवी ।
ती तव जाया. तुज या दीनाच्या कासया उठाठेवी ? ॥३॥
प्रल्हादास्तव खांबीं चेपुन बसतां तुला बरें वाटे ।
मम हृदयांत न येसी, काय तुला टोंचताति हे कांटे ? ॥४॥
कपटें छळूनि बळिला, तोषसि तूं द्वारपाल होतां ही ! ।
कां न छळिसि तूं मजला ? हीं द्वारें घे तुला दिलीं दाहीं ॥५॥
रे भार्गवा ! सहस्त्रार्जुन माझे मानसीं असे लपला ।
काठ तुझा परशु तो ? काय तुझा दर्प राघवीं खपला ? ॥६॥

श्रीरामा ! त्वां वधिली राक्षस–चमु रावणासवें सारी ।
सीतेचिमुळें हेंही. नातरि माझें सहाचि कां भारी ? ॥७॥
गोपाला ! कुबडीचा वक्रपणा पाहुनी तिला वरिलें. ।
तिजहूनि वाकडा मी. परि भोग्य नव्हे, म्हणूनि डावलिलें.॥८॥
खचली कंबर म्हणुनी, स्तब्ध उभा तूं धरूनिया हातीं ।
वरती कां नच बघसी ? लज्जेनें झपतील कां पातीं ? ॥९॥
अवतार तुझे झाले, होतील, तयां शुकादिकें गावें ।
मजला नुद्धरिसी तरि, अवतारा कासयासवें खावें ? ॥१०॥
आलासी तूं येथें, सारुनि गेलासि आपुल्या खेळा ।
काय तयाचें मज ? मी गाइन तो खेळ जो मसीं केला ॥११॥
तूं माय बाप माझा, ऐसी मी फिरवितों जगीं द्वाही ।
जतन करावें नातें काळजिनें माउले ! गुरो ! त्वांही ॥१२॥

## १३ बिल्वार्चन

पद–मम परम–पूज्य गुरु मायी ! । वाहतें बेल तव पायीं ॥ध्रु०॥
त्रिगुणासि वेगळी मूर्ती । सच्चिदानंदमय स्फूर्ती ॥
अवतरली धरती वरती । संचरली संता हृदयीं ॥१॥
रवि इंदू पावक नयनीं । भासविसी लोकां तीनी ॥
तूं वसे सहज हृद्गगनीं । आणीक मागणें नाहीं ॥२॥
काल आज उदया आले । तुज माजीं तेवि निमाले ॥
काल नसे श्री महा काले ! । बालका ठाव त्या ठायीं ॥३॥

## १४ गुरुब्रह्मानंद स्तोत्र

उपजाति— श्री अच्युतानंद सरीं दया जी ।
ती कोण वाचें वदु मी तुम्हा जी ॥
स्वामींचिया श्री–चरण प्रसादें ।
धामींचि मी श्रीचरणांत नांदे ॥१॥

काळीं बहू मी निरखीत लोकां।
आली स्वतां उद्धरण्यासि ताका ॥
या माउलीचें स्तवनासि वैखरी।
कामासि येईल तरीच ती खरी ॥२॥

अनुष्टुभ्- वैराग्य-ज्ञान-सिध्यर्थं पद-द्वय-विबोधिनी।
भक्ति-क्रिया-सुखाप्त्यर्थं हस्तक-द्वय मीलिता ॥१॥

उपजाति- हें चित्र आहे अपुलें समोर।
विचित्र देखूं जगतांत थोर ॥
हें ब्रह्म किंवा जग भासताहे।
बोला असे तें सर्व तयांत आहे ॥२॥

श्रीमाउली खेरिज ब्रह्म न्यारें।
असेल तें आणुनि हातिं द्या रे ॥
नसेल जो अर्थहि या सुचित्रीं।
वसेल कोठें तरि काय शास्त्रीं ? ॥३॥

आर्या-वैराग्य पाहिजे तरि, इह-पर विषयां त्यजूनि परतावें।
ऐसें साधायाला श्रीमाउलिच्या पदीं जगीं ध्यावें ॥५॥
चिदचिद्विवेक आत्मज्ञानाचा सुधर चोखटा पाया।
बांधूनि निघे, जेव्हां भावें लागाल सद्गुरु-पायां ॥६॥
स्थावर-जंगम व्यापुनि, कैसा रमतो जगांत श्रीराम।
"तत्पद" साक्षात् दावी चरणीं मन पावताचि विश्राम ॥७॥
श्रीचरणाची सेवा काया-वाचा-मनें-जयासि घडे।
श्रीमंत तोचि. हें धन श्रीब्रम्हाई पहा ठिवी उघडें ॥ ॥८॥
व्यापक नभापरी जो अखंड-मंडल गिळूनि दिक्काला।
"त्वंपद" दिसेल जेव्हां भावें भाळीं धराल पायाला ॥९॥
"तत्पद-त्वंपद" याचें ऐक्य कसें राखिजे सदा अंगीं।
हें दावाया माझी माउलि जोडीत हात निजरंगीं ॥१०॥

जोडावें भक्ताला देवासी, ज्ञान गर्व तोडावें ।
मोडावें जगदुःखा कैसें ? सर्वांसि हात जोडावे ॥८॥
होतां अशी मनाची जाग्रत् स्वप्नीं स्थिती समाकारा ।
श्रीगुरु माउलि तेव्हां नयनीं येईल खास आकारा ॥९॥

अनु० –विमला, सुंदरा, शामा, शुभ्रवस्त्रयुता, शुभा ।
ब्राम्हणी–जंगमी–माता, अर्ध–मात्रा नटेश्वरी ॥२॥

आर्या–शबल रजस्तमसत्वें लिंपेना कोंवळी कळी कमला ।
केवळ ज्ञप्ती–मात्रा सात्विक शुद्धा अशी सखी विमला १०
ही मोहवी सुरांना असुरांना आपुलें कलाकुसरीं ।
शंकर ही देखुनिया भुलले. ऐसी न सुंदरा दुसरी ॥ ॥११॥
लाल नसे, श्वेत नसे, नील नव्हे, पीत ही नव्हे कांहीं ।
केशापरीच नाहे, ऐसी ही सावळी विठाबाई ॥१२॥
कोणी दृष्टी लाविल, म्हणुनी माता सुवस्त्र पांघरली ।
तेजें झळके, शुभकर मूर्ती देखूनि वृत्ति ही मुरली ॥१३॥
जाग्रत्–स्वप्न–सुषुप्ती विरहित मात्रार्ध ही अशी नटली ।
श्रीपांडुरंग–लिंगार्चन दावी साधका, मला पटली ॥१४॥

अनु० –वैष्णवी शांकरी देवी भक्तानामभयंकरी ।
विस्मय स्मित युक्ताच प्रणवार्थो विभावरी ॥३॥

आर्या–वत्सा हरिणी गाउलि, कैवल्याची धनी शिवा देवी ।
भलते परीहि भजकें भजतां अभयद करा शिरीं ठेवी ॥१५॥
सर्वा ठायीं व्यापक चैतन्याची प्रभाचि आकारा ।
विस्मय मृदुस्मितानें हृदयीं दावीत अर्थ ओंकारा ॥१६॥

अनु० –निर्गुणा गुणतां याता निज वात्सल्य सिन्धुये ।
सुतोद्धार–करी शक्तिः कृपयापांगवीक्षणी ॥४॥

आर्या–पद, अर्थ, कीं पदार्थी अच्युत परतू निज-स्वरूपी ही ।
निर्गुण म्हणूं तरी कां कार्याभावीं दिसे सुखी ती ही ? ॥१७॥

पाहे चंद्रकरें जे अकल्पिता दृष्टि ती कृपा साची ।
झाला उद्धार, सुता तुटली ही भ्रांति गर्भवासाची ॥१८॥

अनु० –नमो अद्वैत बोधाय वात्सल्यात् द्वैत भासिने ।
सच्चित्प्रेम स्वरूपाय ब्रह्मणे निजरूपिणे ॥५॥

आर्या–सन्मुख उभि ही मूर्ती आणिक अंतरिं बसूनि एकसरी ।
दोही अभिन्न अंतरिं, बाहिरि, दृष्टींत काय ती कुसरी ॥१९॥
दिसतें तें जरि खोटें, ज्याला दिसलें खरा कसा झाला ? ।
आभास दृश्य जैसा, द्रष्टा आभास ठायिंचा ठेला ॥२०॥
एकचि वस्तू ऐसी एका प्रेमामुळें द्विधा स्फुरली ।
गुरु-शिष्य, शिशू-माता, धनि-चाकर ज्ञातृ-ज्ञेय विस्तरली ॥२१॥
शब्दें न बोलवें तें निःशब्दें कोणतेपरी दावूं ? ।
टाकुनि मी तूं हेतू प्रेमा निर्हेतुकामधें राहूं ॥२२॥
सच्चित्–प्रेमळ माते! सांगावें जगतिं चित्र कां वसलें ?॥
चेटुक कवणें केलें? नाटक पाहूनि कोण ते फसलें ॥२३॥
मृगजळ खरें नसें, परि बुडती जे प्राशना तिथें जाती ।
तव पायाची नौका करुनी येथें सुखेंचि उद्धरती ॥२४॥
श्री अच्युत-स्वामीच्या दासाचा दास दीन मी राही ।
स्वसुतेच्या तनया परि पाळो याला अखंड ब्रम्हायी ॥२५॥

---

## १५ मी तो अनाथ अपराधी

अभंग–मी तो अनाथ अपराधी । मज सनाथ करिसी कधीं ? ॥१॥
सांगसी तूं न विचारीतां । काय मौन धरिसी आतां? ॥२॥
गुप्त तेंही स्नेहें देसी । प्रगट रूपा कां चोरीसी ? ॥३॥
माउलीये ! सद्गुरु आई । माधव-कन्या लागे पायीं ॥३॥

---

## १६ होशील तूं दयाळू ( नजीरवरून )

गजल– होशील तूं दयाळू कीं क्रूर केशवा ! रे ।
दे भेट नीट किंवा ठकवूनि दे दगा रे ॥
करि तेंचि तूं प्रभोजी ! तुज जें रुचेल सारें ।
नेणें भलें बुरें मी सुखदुःख गोड खारें ॥१॥

सहजीच मी सुखाची, जशि ठेविलीस त्वां रे ! ।
ऐशीहि वाहवा तुझि, तैसीहि वाहवा रे ! ॥ध्रु०॥

जरि मानवेल तुजला, करि येउनी विलासा ।
कपटी जरी कन्हैया, लावी गळ्यासी फांसा ॥
हृदयासि भाजुनी या सुखरूप घेई घासा ।
निष्ठूर खाटिका तूं! वाग आहेस तैसा ॥२॥ सह०

मज ठेवि नीज दारीं, कीं जन्म-जन्म वारी ।
मोकाट मी विराणी, सौरी नसे चुकारी ॥
देशील तें सुखानें घेईन मी भिकारी ।
कैवल्य गोड किंवा मज नर्क दे विखारी ॥३॥ सह०

पाचारिसी कृपेनें, तरि गोड तूंचि सारा ।
धिःक्कारुनी सुखें तूं मज ताडि लाथ-मारा ॥
येणे परीहि नाथा! आहेस तूंचि प्यारा ।
तेणे परी दयाळा ! नोहेसि कांहिं न्यारा ॥४॥ सह०

वृंदावनांत रासीं आनंद आम्हि लुटिला ।
संपूर्ण आमुचा तूं, संधी नसूनि तुटिला ॥
कुब्जे करीं अतां तूं विकलासि गंध-उटिला ॥
परि मी तुझ्याचि घरची सुख-वस्तु. ऐक कुटिला ! ॥५॥

आतां रुचेल तूंतें तरि भेट चित्तचोरा ! ।
कीं तीक्ष्ण चक्र-धारें शिर कापि रे कठोरा ॥

ठेवी जिती, विदेही, नंदाचिया किशोरा।
सहजीच मी सुदाची, गाईन हाचि होरा ॥१८॥ सह०

## १७ लावुनी आधिं लळा

गजल–लावूनी आधिं लळा मानचि मुरगाळु नको।
देउनी भाक हरे! ब्रीदाला टाळु नको ॥ध्रु०॥
माझिया मौन-व्रता त्वांचि अधीं भंगियलें।
आजि "मी तूं" करितां सागुनि कंटाळु नको ॥१॥
लावुनी ध्यास असा, आधिं तनू शोषियली।
वक्र पाहूनि असा, पूर्ण मला जाळु नको ॥२॥
जाळितां ही तनु मी, धूळ जहालें पायीं।
ही विनंती सदया! चरणाला क्षाळु नको ॥३॥
दूर तूं टाकियलें, हुर हुर वाटे जीवीं।
बोल कीं, ना तरि मज जीवपणें पाळु नको ॥४॥
दीन दुर्बळ माधव-कन्या ही तुज विनवी।
आधिं दुखवूनि मला आश्रु पुन्हः ढाळु नको ॥५॥

## १८ नलगे आम्हां कांहीं एक

अभंग–नलगे आम्हां कांहीं एक। व्हावी तुझी जयळिक ॥१॥
लागताती जीवा कळा। त्वां मज लेखितां वेगळा ॥२॥
मुक्ति कैवल्य रोकडी। ही तव अभ्यासाची जोडी ॥३॥
भक्तिहुनी अन्य भाग्य। काय तुजपाशीं सांग? ॥४॥
सुत म्हणे वो माधवे!। तुजवीण काय हवे? ॥५॥

## १९ सदा राहीवो सामोरी

अभंग– सदा राहीवो सामोरी। नको गाते फेकूं दुरी ॥१॥
तव मुखिचें बोधामृत। तेंचि मज जीवपीत ॥२॥

मज वाटे जीवं भावें। माझें अंगीं तूं दाटावें ॥३॥
तुवां मजला कुरवाळावें। तुज सन्निध मी खेळावें ॥४॥
विनवीत बाळुताईः—। कृपा दृष्टीं मज पाही ॥५॥

---

## २० संत शंकराच्या मूर्ती

अभंग— संत शंकराच्या मूर्ती। कोण जाणे त्यांची स्थिती ?॥१॥
कोणी उदासी तापसी। कोणी नाटकी साहसी ॥२॥
कोणी बाल कोणी वृद्ध। स्पष्ट कोणी कोणी मुग्ध ॥३॥
एक शुद्ध शुचिर्भूत। एक भासती उन्मत्त ॥४॥
हिंदू ख्रिती मुसलमान। संत सुता ते समान ॥५॥

---

## २१ आरती सद्गुरुची

शिव कल्याण विभूती शंकर सुखदायी।
पूर्ण ब्रह्म परात्पर श्रीसद्गुरु मायी॥
नित्य निरंजन सज्जन-रंजन वरदायी।
शरणागत हा दुबळा लागे तव पायीं ॥१॥
जय गुरु जय जय सद्गुरु जय सद्गुरु नाथा।
जय जयकार तुझा हो, तव चरणीं माथा॥ ध्रु० ॥
आदि अनादी बीजा पोसिसि तू हृदयीं।
नव खंडीं लक्ष मनीं तें पावे उदयीं॥
मायामय विधि-निर्मित जग जाई विलयीं।
तव निर्मित चित्सुख हें कल्पांतीं राही ॥२॥
दृश्य जगाला नाशी भैरव शूळपाणी।
ऐशा शूर शिवाला वेदादि वाखाणी॥
नाहीं त्यासि निरासी, तव अद्भुत करणी!।
थोर पराक्रम तव हा, वर्णु कुणं वाणीं ॥३॥

आहे तैसें राखी, हरि हा जग पाळी।
दुर्जन ते निर्दाळुनि सज्जन सांभाळी॥
परि तूझी वर्णावी कवणें कनवाळी।
हीना दीना होसी दसरा दीवाळी ॥३॥
कोण तुला गुरुराया ठेविल जीं नांवें?।
सांगे कवणें रीतीं तुज मी अळवावें?॥
ज्या ज्या नांवें आतां तुजला बाहावें।
ओं देउनि तू माझे सामोरीं यावें ॥४॥
कवणाला मी विनवूं? तुजाविण कुणि नाहीं।
कोठें पाहूं? तुजाविण शून्य दिशा दाही॥
तूं जें निज-गुज-बीजा ठिविलें मम-हृदयीं।
म्हणुनी सहजाचि बालक जडला तव पायीं ॥५॥

---

## २२ गुरुमाउलीचे अबोल्यावर

गजल-पाणी न मूळा घालिसी, तरु हा भला कां लाविला?।
दाणा न केव्हां चारिसी, शुक पंजरीं कां पाळिला? ॥१॥
तुज लेकराची काळजी घेण्यासि वेळ नसे तरी।
मज सांगिजे गुरुमाउले! हा जन्म तूं मज कां दिला? ॥२॥
निर्वाद निर्गुण तूं जरी, सर्वांत बेपर्वा खरी।
निर्वाणिच्या हृदयांतरीं, मज मोह कां तूं पाडिला? ॥३॥
मी एकदां आधीं सुखी, जाणे न दुःखाची नखी।
होऊनिया तूं विन्मुखी, कांटा मनीं कां रोविला? ॥४॥
देसी न कांहीं भाकरी, घेसी न केव्हां चाकरी।
सोसीत जासी गुर्गुरी, हा श्वान तूं कां पाळिला? ॥५॥
चारा सहा अठरा सवें वाचाळ ते तुजला हवे।
बाळा वरी परि माधवे! तूं कां अबोला ठेविला? ॥६॥

---

## २३ गुरु करुणा-याचन

वियो०–गुरुनें मजला उपेक्षिलें। तरि हो काय जगूनि राहिलें॥
हरि शंकर थोर वाणिलें। परि कोणी न मला नहाणिलें ॥१॥
गुरु वस्तु जगांत सद्गुरू। लघु हें एकचि दीन लेंकरू॥
तुजवीण कुणासि मी स्मरूं। त्याजि जें गाय जगें न वासरूं॥२॥
कनकीं तद्भव कील शोभलें। सरिते माजिं तरंग ही भले॥
भवतारक माय कोमल!। तव पायीं मज ठाण लाभलें ॥३॥
बहु दूर ठिऊनिया मुला। न कळे हो करमें कसें तुला॥
नसतां कारण द्वैत-हेतुला। तटका तोडिसि आत्म-तंतुला ॥४॥
ब्रह्मायी गुरुराज! आंबिके!। तुज वाचूनि समस्त हें फिकें॥
मी वाढे तव दृष्टि-कौतुकें। सहजी त्याविण मी पहा सुके ॥५॥

---

## २४ आरती केदारनाथाची

शार्दूल०–ध्यायेद्देवं परेशं त्रिगुणगुणमयं ज्योतिरूपं स्वरूपं।
वामे पात्रं त्रिशूलं डमरुगसहितं खड्ग दक्षे विराजम्॥
शेषारूढं सुरेशं क्रमणपदयुगं भक्तकारुण्यगम्यम्।
सर्वांगे लिंगभूषं उपविति सहितं नाथ मार्गाधिपत्यम् ॥१॥
अनु०–शेषारूढो भवेद्विष्णुः त्रिशूली शिवरूप धृक्।
उपवीत्त भवेत् ब्रम्हा शक्तिः खड्ग-समन्वितः ॥२॥

---

धन्य तूं पिंडिं आलासी। ब्रह्मांडिं बहुत श्रमलासी॥
हरि हरा! नाथ ईश्वरा! सांब गुरुवरा! ज्योति केदारा,
——रूप अविनाशी ॥ध्रु०॥
जान्हवी मस्तकीं झिरपे। शशिखंड शोभतें तिरपें॥
शेष हा पदांतळिं सरपे। डमरुनें तरी मन हरपें॥
खर्परा, घेउनी करा, असी सुंदरा, शूलही बरा
—— घरोघर फिरसी। धन्य तूं ॥१॥

हरि म्हणूं तुला फणि-वहना । शिव डमरुशूल शोभना ॥
ब्राम्हणा मार्गदर्शना । जंगमा लिंगभूषणा ॥
गुरुवरा! नारि कीं नरा! हरी कीं हरा! कोण तूं खरा
———कळेना मजसी । धन्य तूं ॥२॥

ब्रम्हांड तुला हें थोडें । नाचण्या दिगंबर उघडें ॥
तुज धरीन हातीं कोडें । झाकीन बिल्व पातोडें ॥
भवहरा, परेच्यापरा, बाप माहेरा, माझिये करा
———कैद झालासी । धन्य तूं ॥३॥

रवि शशी अग्नि त्रीनयना । मम चर्म नयनिं या लाहना ॥
तुज नजर कैद साहेना । तरि प्रवेश मम हृद्गगनां ॥
प्रियकरा! करुनि आसरा, प्रेम ओवरा, राहि तूं बरा
———हृच्छिच्या पाशीं । धन्य तूं ॥४॥

जीवना जगाच्या तुजला । स्नापीन प्रेम आश्रुजला ॥
तव पदीं देह जें झिजला । चर्चीन चंदनें विमला ॥
मोहना, घेइ सूमना, नाशि वासना, विश्व-दीपना!
———ओवाळिन तुजसी । धन्य तूं ॥५॥

विश्वाचि करुनिया आटी । घास ही पुरेना ओठीं ॥
आशि तुझी भूक ही मोठी । तरि मलाचि घे कीं पोटीं ॥
रावळा! क्षेत्रपा चळा! चांग तूं भला! मेरु निश्चळा!
———कोंद्रिं वसलासी । धन्य तूं ॥६॥

आरती ज्योति उजळूनी । दे रती मला तव चरणीं ॥
निज भोवरीच फिरवूनी । घे तुझी हौस पुरवूनी ॥
अच्युता! अगुणगुणवता! अनंता पिता माय! तूं सुता
———पाळि दीनासी । धन्य तूं ॥७॥

## २५ दुख लेवा हमारा कोइ नहीं

पद– दुख लेवा हमारा कोइ नहीं ।
सुख देवन हारा कोइ नहीं ॥ ध्रु० ॥
पिय देखन जमुना मैं आयी ।
इत बन्सीका बाजियारा नहीं ॥१॥
तम फैला रैन अमावासी ।
चंदुवा का कित उजियारा नहीं ॥२॥
चाढि जमुना भरि भरि बहती है ।
करु कां सखि नीर उतारा नहीं ॥३॥
धन बरसत बादल कडकी है ।
कित देखुं जियाका सहारा नहीं ॥४॥
सुकुमार गोपी माधव-कन्या ।
हिय अच्युत अन्य पियारा नहीं ॥५॥

---

## २६ परम कोमल माउली

पद– परम कोमल माउली गुरु दीनजन सुख साउली ।
चिन्मयी जी शोभते निजदुःखहारक पाउली । ॥१॥
पान्हयानें पूर्ण गंगा वासराची गाउली ॥
देश काल उपाधि विरहित आजि हृदयीं पाहिली ॥२॥
माउलीला माळ सुमनें गुंफुनी मी वाहिली ।
माउलीचे पाउलीं सहजींचि वृत्ती राहिली ॥३॥

---

## २७ श्री सद्गुरु रहस्याष्टक (रहस्य पहिलें—प्राणावधान)

वसंत०– श्रीसद्गुरू भुवन मंगल ब्रह्मधाम ।
आरूढ अच्युत अनंत अपार ब्रह्म ॥
हा योग दावि सहजा निज गूढ वर्म ।
ब्रह्मांड बीज वरि सर्व सुखा विराम ॥१॥

बाळा! जसा उपजसी, उरिं प्राण वाहे।
प्राणाचिया सुगतिनें तव जीव आहे॥
प्राणोद्भवासि विलयासि निचिंत पाहे।
प्राणावधान करि, सावध शुद्ध राहे ॥२॥

सोहं सरीं बसुनि हंस निवांत आधीं।
प्राणासि सावध निरीक्षुनि सौख्य साधी॥
प्राणासि तूं विसरतां पडसी उपाधीं ।
प्राणावधान बसवील तुला समाधी ॥३॥

जो श्वास उद्भवत श्रीगुरुदत्त मेवा।
चैतन्य देत करण्या गुरुभक्ति, सेवा॥
वाया जरी दवडिसी निज आत्म ठेवा।
तें आत्मघात करिसी, मुकशील देवा ॥४॥

जो श्वास जाय, परतूनि न येत हातां।
श्वासासि खंड, तरि प्रेत बने अवस्था॥
प्राणा न सांडि कथुनी जन-जल्प-गाथा॥
प्राणावधान करुनी भज प्राणनाथा ॥५॥

श्रीसद्गुरु परम कारुणिकें दयाळें।
कैवल्य-बीज हृदयांतरिं पेरियलें ॥
तें रोप व्यर्थ विसरांत सुकूनि गेलें.।
प्राणावधान चुकतां हकनाक मेलें ॥६॥

चालेल हंस तरि तो हरिरूप पाहे।
जेथें विरे शिवचि तो शिवरूपिं राहे॥
जें उद्भवें विधिचि विश्वनिधींत वाहे।
प्राणावधानिं तुज सद्गुरु-दत्त लाहे ॥७॥

आकीट–ब्रह्म विलसे गुरु एक खासा।
विश्वा रचीत परिपाळुनि घेत घासा॥

मांडीत मोडित निज-स्वरुपीं तमासा ।
प्राणावधान गुरु चोजवितो विलासा ॥८॥

श्रीसद्गुरू कथितसे निज-गूज बाळा ।
बाळासि साहजिक बोध उरांत आला ॥
प्राणावधान करूनी स्वरुपींच धाला ।
ब्रम्हाइ माउलि करी सुखरूप त्याला ॥९॥

---

## २८ श्रीसद्‌गुरु रहस्याष्टक ( रहस्य दुसरें—पादावलोकन )

वसंत०— श्रीसद्गुरू मुगुट सर्वहि देशिकाला ।
हें सर्व सार गुज सांगत बालकाला ॥
दृष्टी सदा बिलगवी चिक्षण्या! पदाला ।
पादावलोकनचि दे सहजा सुखाला ॥१॥

पांगे दिठी जरि कधीं बघसी जगा तूं ।
दृष्टीसवें मनहि फाटत दुःख-हेतू ॥
काम-प्रकोप, मद होय जगांत थू थू ।
पादाववलोकानिं मिळे तुज भक्ति-तंतू ॥२॥

दृष्टी बघूनि ठिवणें जगिं पाउलातें ।
ही शुद्ध रीत निज सद्गुरु दे अम्हातें ॥
ही वाट नीट निघते गुरुच्या घरातें ।
पादावलोकनचि दे सहजा सुखातें ॥३॥

पाताळिं एक पद स्वर्गिं दुजा विलासें ।
ऐसा त्रिविक्रम गुरू जगतांत भासें ॥
ब्रह्मांड सर्व गुरुचें चरणांत खासें ।
पादावनलोकचि देत सुखा उमासे ॥४॥

येसी कुठूनि अससी मति कोठ राहे ।
याचा विचार कळण्या चरणासि पाहे ॥

विश्वस्थितीगति सदा चरणींचि आहे।
पादावलोकनिं हरी तुज दीसताहे ॥५॥

श्रीसद्गुरू सुखदमेघ दयालु ओळे।
विश्वीं तुडुंब भरुनी हृदयांत खेळे॥
आनंद अमृत सुपात्र उरांत आलें।
पादावलोकनिं जया मन लीन झालें ॥६॥

शंका कुतर्क कुटिलांतर काम दंभ।
क्रोधादि शत्रुगण ते निवटी सलोभ॥
श्री सद्गुरु प्रगट तो हरि वेद-गर्भ।
पादावलोकनिं दशांगुलि हा स्वयंभ ॥७॥

आम्हासि अन्य-तम साधन क[illegible]सयाला ?।
सोपें सुबोध सुख सेव्यचि सेवकाला॥
तें गूढ माउलि कथी निज भाविकाला।
पादांवलोकनिं मिळें निज-ब्रह्म बाला ॥८॥

---

## २९ श्रीसद्गुरु रहस्याष्टक (रहस्य तिसरें—धामप्रवास)

वसंत— श्री माउलि कर धरी निजबालकाचा।
होऊनि धाम, निज-देह स्वतां तयाचा॥
देऊनि दिव्य नयनादिक, शक्ति, वाचा।
धाम प्रवास करवी सहजा सुखाचा ॥१॥

पद—धाम-प्रवासा देखे सहजा! सोहं-हंसा! साचारा ॥ध्रु०॥

तारक, दंडक, कुंडल, चंद्रकला तूं बिंदू ओंकारा।
भू जल तेज समीर ख पंचक कालविसी कर्दम गारा॥
स्थूलक सूक्षम कारण कारण ह्मतीं राचिले आवारा।
औटकरांगुल, पर्व, मसूरा तेथें कल्पुनिया थारा ॥१॥

जाग्रत, स्वप्न, सुषुप्ती, तूर्या, उन्मनि बैसुनि चौबारा ।
सात्त्विक,राजस,तामस,साम्याहि, निर्गुण तूं गुण-गंभीरा॥
विष्णु,विरंची,शिव, तूं ईश्वर तूंचि सदाशिव तो प्यारा ।
वैश्वानर, तूं तैजस, प्राज्ञ,प्रत्यक् तूं निरहंकारा ॥२॥

नयनीं कंठीं हृदयीं मूर्ध्नीं रोमीं रोमीं धन-चोरा ।
खेचरि भूचरि चाचरि गोचरि लक्षालक्षी या मुद्रा ॥
रक्त शुभ्र सावळा नीळ कीं पीत सुशोभित मणिचंद्रा ।
तंत वितंत मृदंग टाळ घन वेणू वाजविसी मंद्रा ॥३॥४

देह प्राण मनोबुद्धी चित् सौख्याचें लेसी चीरा ।
क्षर अक्षर कूटस्था आत्मा क्षेत्रज्ञा घे सुविचारा ॥
हामी तोमी कोहं शिवमी नाहं नामी सरदारा ।
घट मठ महदाकाश चिदोदित एक अखंडित घनघोरा ॥४॥

वैखरि मध्या पश्यंति परा नेणति तव पारावारा ।
ऋग्यजुसाम अथर्णव वेदा सूक्ष्मचि तू अर्थागारा ॥
करणे जाणिव इच्छा इंगित शक्तीचे पर आधारा ॥
विषयीं योगीं भजनीं सांख्यीं ब्रह्मानंदीं तव चारा ॥५॥६

वसंत– दावी प्रवास परि बोधित माय बाळा ।
तूं तो अजिंक सहजा ! गुण देश काला ॥
शक्ती तुझीच बहु दाखविते कलाला ।
तूं तो सदाशिव अखंड अलिप्त काला ॥७॥

हा चिद्विलास गुरु माउलिचा विनोद ।
पिंडींच होत सकला अखिलार्थ बोध ॥
पिंडासि बाहिर वृथा करिजेल शोध ।
धाम-प्रवास गुरुचा हृदयीं निरोध ॥८॥

जो तापसी निघत प्रेमपथ-प्रवासीं ।
पांथस्थ पंथपदवीस सदा उदासी ॥

श्रीसद्गुरूच निज-धाम असे मिरासी।
धाम-प्रवास गुरू माउलिचें घरासी ॥९॥

रे सहजा गुरुचि पंथ गुरूचि ग्राम।
श्री ब्रह्मणी सुखद प्रेमळ पूर्ण-काम ॥
संपे प्रवास सहजा मज हेंचि धाम।
धाम-प्रवास गुरुचे चरणीं विराम ॥१०॥

---

## ३० श्रीसद्गुरु रहस्याष्टक ( रहस्य चौथें—सभेंत एकांत )

श्री सद्गुरूची अघटित लीला। प्रपंच हा मंच कसा रचीला ॥
मीतूंपणाचा जड भाव नेला। सभेंत एकांत सुतासि केला ॥१॥
व्यापूनि ठेली गुरुमाय नेना। आहे स्वता आपण बिंब ऐना।
देखें दिसें दावित सूख नाना। सभेंत एकांत निवांत चैना ॥२॥
माता पिता बंधु बहीण झाली। गिळूनि शिष्यासि गुरूसि व्याली ॥
कोणा कळे कोवि नटेल काळी?। सभेंत एकांत सुखा दिवाळी ॥४॥
कानी भरोनी निजगूज सांगे। शब्दीं निशब्दीं प्रणवार्थ जागे ॥
शब्दार्थ रूपें नटुनी निजांगें। सभेंत एकांत अभोग-भोगें ॥५॥
माझे सवे तृप्ति नव्हेचि साधी। शृंगारवी ही मजला उपाधी ॥
जागा नसे जेथ मला न वेधी। सभेंत एकांत रमूनि बोधी ॥६॥
नेणों कधीं काय करी कुणासी। प्रेमांत भोगूनि ठिवी उपासी ॥
डोळां धुळी घालुनिया जगासी। सभेंत एकांत रते अम्हांसी ॥६॥
दया गुरू माउलिची अफाट। सर्वांग ही व्यापित पाठपोट ॥
चैतन्य सारें घन घोर दाट। सभेंत एकांत अबोल थाट ॥७॥
ब्रम्हानंदा! सद्गुरू नाथ मोला। मीमी किंवा तूंचि मी कोण बोला?॥
मी तो फोला तूंचि तूं रे अमोला। राहो तूझा साहजी बोलबाला ८

॥ इति चतुर्थ रहस्य ॥

---

## २१ श्रीसद्‌गुरु रहस्याष्टक ( रहस्य पांचवें—कृतस्मृति )

भुजंग—

गुरू माउले! शक्ति तृशा अचाट।
न देसी बसूं आम्हुतें वायफाट ॥
उदेजूनि चित्तांत होसी पहाट।
स्मृती फैलते तेज तूझें अचाट ॥१॥

गुरू माउले! तूं सुधापूर्ण सिंधू।
तुझे लेकरांचा दयूनी मुदेंदू ॥
तुझा वाहवी पूर विश्वा सबंधू।
स्मृती लाट कल्लोळ बुद्‌बूद बिंदू ॥२॥

तुझीयाचि अंकावरी मी बसावें।
तुझें मूख पाहूनिया मीं हसावें ॥
दुणायासि प्रेमा उगे मी रुसावें।
स्मृतीवीण तूझे कदापी नसावें ॥३॥

तुझें नाम गावें तुझे पंथि जावें।
तुझेशीच मी सर्व काजा करावें ॥
उरावीण तूझे न कोठें रहावें।
स्मृतीचें घृती माखुनि विश्व खावें ॥४॥

गुरू माउले! गोड झालीस भारी।
न बाधे मला विश्व होकां विखारी ॥
जरी सृष्टि माझे सवे दुष्ट सारी।
परी त्वत्स्मृती संकटें सर्व वारी ॥५॥

दिलें सार सर्वस्व तूं जें अम्हांला।
तुझे माजि माझापणाही निमाला ॥
कसा चिंतु येरा जगा कीं स्वताला?।
तुझी ही स्मृती या उरामाजि माला ॥६॥

तुझेनी स्वताचें मला भान नाहीं ।
तरी येथ येरा कुठें ठाव कांहीं ? ॥
मला लोटिले आपुलें तूं प्रवाहीं ।
स्मृती ही तुझी, थोर तूझी दयाही ॥७॥

मला सद्गुरो ! तूंचि आप्तेष्ट प्यारा ।
अनिष्टासि कां चिंतिजे कष्ट भारा ? ॥
दिला तूंचि ब्रम्हासि आनंद सारा ।
स्मृतीचा तुझ्या साहजा देइ वारा ॥८॥

॥ इति पंचम रहस्य ॥

## ३२ श्रीसद्गुरु रहस्याष्टक (रहस्य सहावें—निवृत्ती)

भुजंग०—

सदाची स्मृती विस्मृतीमात्र नाहीं ।
स्मृतीची स्मृती श्रीगुरूमाय खायी ॥
निवृत्ती निवर्तूनि वर्ते विदेहीं ।
निवृत्ती गुरू श्री परब्रह्म मायी ॥१॥

उडे अंबरीं घार पै पंथ नाहीं ।
फिरूनी पिलापासि येऊनि राही ॥
अहो ओढिते माय तेवी मलाही ।
निवृत्ती गुरु श्री परब्रह्म मायी ॥२॥

भले ठायिचे बैसवीलेसि ठायीं ।
समुद्रामधें देखतो कोण रायी ? ॥
वयेच्या घरीं येथ वृत्तीच नाहीं ।
निवृत्ती गुरु श्री परब्रह्म मायी ॥ ॥३॥

तरो जा बुडोजा प्रवृत्ती प्रवाही ।
जगो जीव कीं विश्व जावो लयाही ॥

उगे या बसा हो बसा. काय घायी ? ।
निवृत्ती गुरु श्री परब्रह्म मायी ॥४॥

घटाचा खटाटोप माथा फुटायी ।
मिटेना खटायी न लाभे मिठायी ॥
समाधान हें सद्गुरु-माय-पायीं ।
निवृत्ती गुरु श्री परब्रह्म मायी ॥५॥

मुकावे श्रुती, दर्शना दृष्टि नाहीं ।
पुराणें पुरानें, कशी देति ग्वाही ? ॥
निरालंब सैरा गिळी देश दाही ।
निवृत्ती गुरु श्री परब्रह्म मायी ॥६॥

निबोधीत खोडील पोरासी आयी ।
"इथें स्वस्थ बैसूनि खायी मिठायी " ॥
तरी एक शब्दें लया विश्व जायी ।
निवृत्ती गुरु श्री परब्रह्म मायी ॥७॥

मला काय जाणीव नेणीव कांहीं ? ।
करी खोडिया मी, असाही तसाही ॥
परी साहजीं आसपासींच राही ।
निवृत्ती गुरु श्री परब्रह्म मायी ॥८॥

॥ इति षष्ठम रहस्य ॥

---

३२ श्री सद्गुरु रहस्याष्टक ( सातवें रहस्य—जतन करावें )

गुरु मातेनें दिधलें ज्या अक्षर-बीजा ।
त्याचा अंकुर शिंपुनि प्रेमें करुं ताजा ॥
विश्वीं मग तो तरुवर विलसे मनमौजा ।
जतन करावें गुरु माउलिचे निज—गूजा ॥१॥

करुणा करुनी वारी संसृति मरणाला ।
जाळी विस्मृति, देत सदोदित स्मरणाला ॥

सभर भरी आनंदें अंतःकरणाला ।
जतन करावें गुरु माउलिचे चरणाला ॥२॥
लीलाकेली, बोलाचाली, बोधाला ।
सहजा पटवी, नाशी काम-क्रोधाला ॥
धाला बोला चिंतुनि जातां शोधाला ।
जतन करावें गुरु माउलिचे बोलाला ॥३॥
गुरु मातेचें पूर्ण दयेचें जें भरतें ।
ब्रह्मांडीं ही नाहीं त्या प्रेमा परतें ॥
परते वाणी, स्फुरती जेथें हरि हर ते ।
जतन करावें गुरु माउलिचें प्रेमातें ॥४॥
डोळा भरुनीं निरखीतां ही लवभर ती ।
भरती स्वानंदाची दाटे सुखसरिती ॥
हरती तापें, पापें लीला उद्धरती ।
जतन करावी सद्गुरुची चिन्मयमूर्ती ॥५॥
पुढती पुढती वाढवि भक्ति प्रेमाला ।
शोका नाशी, उद्धरि सकला जगताला ॥
माला होइल गुरु माउलिचे कंठाला ।
जतन करावें गुरु भजनाचे नेमाला ॥६॥
दरडी बरडी नाहीं, हा धोपट रस्ता ।
अडका दिडकी नलगे, निर्हेतुक सस्ता ॥
गातां गातां जातां मोक्ष मिळे हाता ।
जतन करावें श्री सद्गुरुचे निजपंथा ॥७॥
कार्या कारण हेतू निर्हेतुक झाला ।
ब्रम्हानंदें लावियलें निज छंदाला ॥
गोवी मजला भक्ति प्रेमाचें जाला ।
जतन करावें ब्रह्मानंदा ! सहजाला ॥८॥

॥ इति सप्तम रहस्य ॥

३४ श्री सद्गुरु रहस्याष्टक (रहस्य आठवें—तूं माझा, मी तुझा)

नु०— धरूनि मजला हातीं निज मार्गासि आणिलें।
माय तूं बाप तूं माझा, मी तुझा, तूंचि जाणिलें ॥१॥
होतो मी आंधळा कष्टी तापाग्नीमधिं भाजलों।
बंदानवाज तूं माझा, मी तुझा हा नवाजलो ॥२॥
तान्हेला बहु काळीचा भुकेला मी तुझा परी।
तूं माझा मी तुझा नाथा! हीच तृप्ति मला खरी ॥३॥
निंदास्तुती जना माजीं होवो का भलते परी।
तूं माझा मी तुझा देवा! बाणो हें मम अंतरीं ॥४॥
मत्पापाचे महामेरू, पुण्याची नाहिं मोहरी।
परी दयाळ तूं माझा, मी तुझा उंबरा धरी ॥५॥
सुखीं ठेवी मला किंवा जाळी दुःख दवानलीं।
तूं माझा मी तुझा ऐसी कोण तोडील साखळी? ॥६॥
सद्गुरू माउले! राजा सावळ्या गुणसुंदरा।
तूं माझा मी तुझा नाथा कोणाच्या जाउं मी घरा? ॥७॥
ब्रह्मानंदा प्राणनाथा प्रेमळा चरण-ध्वजा।
तूं माझा मी तुझा ऐसा राखी निश्चय साहजा ॥८॥

---

## ३५ बहार आहे

पद—बहार आहे कसा हरीचा। जगाच्चिया एक चोंधरीचा ॥ध्रु०॥
मयूर टोपी शिरीं विराजे,—पदीं झणत्कार घागरीचा ॥१॥
स्मृती तनूची समूळ लोपे,—भरे ध्वनी कानिं बासरीचा ॥
कुमार कोणा, पुराण कोणा, गमे मला हा बरोबरीचा ॥३॥
कसे म्हणूं यासि शुद्ध स्वामी? बहूत या छंद सुंदरींचा ॥४॥
ठिकाठिकाणींच आडवीतो, खरा लुटारू घरोघरीचा ॥५॥
दुधाहुनी यासि प्रेम गोडी, फिरे व्रजीं क्षीरसागरीचा ॥६॥

कर धरीतां कदा न सोडी, गडी असा हा खरोखरीचा ॥७॥
दयाळ दातार हा बघोनी, मनीं वसे हेतु चाकरीचा ॥८॥

---

## ३६ मंदिरीं तीर्थीं.

गजल– मंदिरीं तीर्थीं जनीं कीं गोकुळीं वृंदावनीं ॥
सर्व आम्ही पाहुणे गा तूंचि येथींचा धनी ॥१॥
हाय हें अज्ञान कैसें!– अंतकाळीं जाणवें ॥
पाहिलें तें स्वप्न होतें, ऐकिलें ती काहणी ॥२॥
हे हरे! जन जल्पती कीं वाळलें उद्यान हें ॥
जेथ माझ्या तूळसीची मंजुळा संजीवनी ॥३॥
जाहली ही चावडी कीं चावटीला वृत्तिच्या ॥
रिक्त होता ही कुटी, जी माजि तूझी राहणी ॥४॥
शांत हो तूं गोपबाळे! नाठवी वृंदावना ॥
रंग केले वा न केले, काय आतां सांगुनी? ॥५॥

---

## ३७ पाळणा शिवशक्तीचा

जो मी मी जोरे! जो जो रे! नीजीं निजो दोरे ॥ ध्रु०॥

बाळा निजरूपा निजरूपा शाम हरे जगबापा।
तेजें झळकसी, झळकसी भाग्योदय-दिन-दीपा ॥
सहजी आलासी, आलासी वाराया भवतापा ॥१॥
बाळे! निजमाये! निजमाये चैतन्यांकित काये।
तुजला उपमेसी उपमेसी, रजनीनाथ न साहे ॥
हससी स्वानंदीं. स्वानंदीं थोडी उगली राहे ॥२॥
जाणुनि हा भोळा. हा भोळा, सर्वांगीचा डोळा।
करुणार्द्रितचित्तें, त्वच्चितें अखंड दिसतो ओला ॥
कोणी जाणावी जाणावी याची अघटित लीला ॥३॥

चपला गंभीरा, गंभीरा सर्वार्था शुभकारा ।
प्रणवा माजीं ही, माजी ही आलीसे आकारा ॥
भक्तावरि हीच्या, वरि हीच्या पार नसे उपकारा ॥४॥
पाळणा विदेहीं. विदेही जग हें झालें नाहीं ।
प्रेम दोरें हा, दोरें हा चालविला लवलाहीं ॥
चैतन्याकाशीं, आकशीं पाहतां पाहणें पाही ॥५॥
गोडी सौरसी सौरसीं ऊर्मी स्वानंदाची ।
जोडी शिवशक्ती शिवशक्ती ब्रह्मायी-शामाची ॥
थोडी तरि घ्यावी, तरि घ्यावी भक्ती आणि ज्ञानाची ॥६॥
बाळे निरुपाधी, निरुपाधी आली आपुलें कूळी ।
विरळा प्रेमानें, प्रेमानें हृदयासी कवटाळी ।
त्याला अच्युतजी अच्युतजी निज-बाळापरि पाळी ॥७॥

———

## ३८ गौरीहर पूजा.

लावणी–सगुणरूप सावळा जगाचा परमपूज्य प्रियकर ।
पती मम होवो मुरलीधर ॥ ध्रु०॥

भाग्योदयिच्या प्रभात समयीं, शुद्ध करुनि अंतर,
नाहलें यमुनाजलिं निर्भर, नेसले शील-शालु भरजर ॥
सुगंध कुंकुम-मळवट भरिला माउलिनें सुंदर,
घातिल्या माळा चंद्रहार, शांतिचे दिधले अलंकार ॥
उत्साहें अनुमोदन मिळतां, झालें मी सादर ॥ पती० ॥१॥
पूजेस्थानीं येउनि पाहतां पूजेचा विस्तर,
झळकतीं उपकरणीं सुंदर, जाहलें माझें मन सुस्थिर, ॥
चहुं बाजूला कलशश्रेणी शोभाति एकाधर,—
एक, ती रचणारी चातुर, मांडिले पांच पांच बाहिर ॥
सुदृढ पाट्यावरी विराजित मध्यें गौरीहर ॥ पती० ॥२॥

पंचरत्न आसनीं बैसली गिरिजा अंकावर,—
शंभुचें आलिंगन प्रियकर, तेथ मी निरखी जोडुनि कर
चंद्रशेखरें उभारिला मग अभय द्यावया कर,
दुजा कर वरदानीं तत्पर, अमृतघट उचंबळे झरझर ॥
सुहास्य-वदना मूर्ती पाहुनि भ्रमभय झालें दुर ॥ पती० ॥
उभय मूर्ति त्या पाहुनि झालें दंग, भरे मम उर,
सुचेना कांहीं मग नंतर, सुवासिनी म्हणतीः–"पूजा कर
मग दवणा चाफा बकुल मालती कुंद आम्र-मोहर,
बेल तो कोमळ दूर्वांकुर, आणखी पुष्कळ ते उपचार–॥
केले असातिल, मला न स्मरती मन्मन कृष्णातुर ॥पती० ॥
मम देहाचें सूत्र घेउनी सत्ताविस पदर,
काकडा वळिति सती भरभर, तीनदां तीन तीन गुणकर
सुवर्ण-पात्रीं स्नेहयुक्त प्रज्वाळुनि अभ्यंतर,
उजाळिलें उमा शंभु शंकर, गर्जती श्रुति घोषें द्विजवर ॥
सखी संवगड्या हसूं लागती, खुणविति परस्पर ॥पती०॥
मला सुचेना कांहिंच बाई ! हृदयीं भरला स्मर,
श्रीहरी सबाह्य अभ्यंतर, साबडी भोळी मी पामर, ॥
अशी स्थिती पाहुनी तोषती पार्वतिपरमेश्वर,
म्हणतिः–"बघ अला तुझा वर." वाजतो वाद्याचा गजर ।
माधव-कन्या मोहित झाली पाहुनि शारंगधर ॥ पती० ॥ ३

---

## ३९ डोहळे अंबिकेचे

अवडे काय तुजला ? सखये अवडे काय तुजला ? ॥
हिम-नग-बाळा सती अंबिका । पुसे डोहळे तिजला भोळा ॥ध्रु०॥

पहिलें मासीं निजसुखवासी ।
ओळख झाली तुज अम्हासी ॥
सन्निध मी परि धरिसि अबोला ॥ध्रु०॥ ॥१॥

मास दुजा आठव साठवली ।
चटपट तुझियें चित्तीं जडली ॥
भान न उरलें तेथें काला ॥२॥
महिना तिसरा विसरुनि विसरा ।
तुझिये नयनीं मी एकसरा ॥
माझी दृष्टी तुझिये डोळां ॥३॥
चवथा महिना दशा सुलीना ।
अखंड सन्मुख मी तव नयनां ॥
तव इच्छेचा बहुत भुकेला ॥४॥
नवल वर्तलें पंचम मासीं ।
तेज तुझें उन्मनिसी ग्रासी ॥
मी मी कीं तूं कळे न मजला ॥५॥
आज लागला मास सहावा ।
तुझीच होते सर्व वहावा ॥
मेळविसी शक्तींचा मेळा ॥६॥
महिना सप्तम अद्भुत उत्तम ।
समाधान हें तुजला मजसम ॥
मांडिसि विश्वातें तूं लीला ॥७॥
मास आठवा सुखा साठवा ।
क्रिया प्रकाशी बोधपाटवा ॥
तरि अतां तूं सोड अबोला ॥८॥
आला महिना नवा अभिनवा ।
म्हणे अंबिका अवडे सेवा ॥
नमिते मी या सदाशिवाला ॥९॥
पूर्ण शिवाची पूर्णचि शक्ती ।
परिपूर्ण प्रेमानें भक्ती ॥
सहजीं ब्रह्मानंदें झूला ॥१०॥

# तृतीय प्रवाह आख्यानें.

## १ मुकुंदराजाचें पूर्वचरित्र

( हरिदास मुखें कथा ऐकिली त्यावरून )

दिंडी- गुरू चरणाची काय वदूं थोरी ?।
चरण लक्षावें सदा हे समोरीं ॥
भवारण्याची गोड ही सिदोरी।
कळी काळासी पिटी पाठिमोरी ॥१॥

मुकुंदराजांचे गुरु राममंदिरांत एक अंधस्वामी होते.

साकी- अवंति नगरी मार्जी होते स्वामी रामानंद ॥
सदा पहाती निज-रूपासी, जगा पाहण्या अंध ॥२॥

अभंग-स्वामी बैसती मंदिरीं। राम रामाचें सेजारीं ॥
काय म्हणू यानां संत?। अथवा प्रत्यक्ष भगवंत ? ॥
रामावीण नेणति अन्य। ऐसे रामासीं अनन्य ॥
मुखीं गाती "रामराम"। राम करी त्यांचें काम ॥
नवल नोहे माधव-सुता। यांची सेवा वामन करितां ॥३॥

त्यांची सेवा करण्याकरिता वामन नांवाचा एक बटु आला व म्हणाला!

वियो०- चिमणा हा बटु बाळ ब्रह्मचारी।
रमणीया तनु याचि कांति गोरी ॥
" नाहीं कोणि " म्हणे " मला गुरुजी।
साहीजे लघु चाकरी करूं जी " ॥४॥

त्यावर गुरूंनीं त्याला विचारिलें.

"सुकुमारा मज सांग तूं कुणाचा ?।
सुखवाया मज बोलसी सुवाचा ॥

मजला श्रीहरिवीण नाहिं कोणी ।
भजका पाळित नाथ चक्रपाणी ” ।।५।।

यावर बटु-वामन म्हणाला.

श्लोक– “नेणे मी कुणि तात आणि माता ।
जाणेना भगिनी अणीक भ्राता ॥
केली मौंज, परी कुणीं न ठावं ।
धुंडी मी गुरुला अनेक गांवं ।।६।।

घनाक्षरी–आजि भाग्योदय-काळ, गुरु-चरणीं लागे भाळ ।
मनीं प्रेमाचा बंबाळ, धगधगीत पेटला ॥
संचिताचि झालि होळी, प्रारब्धाचिहि रांगोळी ।
गुरु-सेवा गदारोळीं क्रियमाण उदेला ॥
मज दीजे कृपा-दान, करा चरण स्वाधीन ।
सेवेवीण कांहिं अन्य, नेणिजे मी हेतुला ॥
तुम्ही अखंड अनंत, अहो अद्वय अच्युत ।
मायबाप! कृपावंत, सुता जवळि घ्या मला” ।।७।।

श्रीगुरूंनीं अंगिकार केल्यावर बटु वामन त्यांची सेवा करूं लागला.

ओवी–येणें परी हा वामन । सेवीत राहिला श्रीचरण ॥
सद्गुरू वांचूनि नेणे आन । साधनादिक ।।१।।
धरूनि गुरूंसि करकमळीं । प्रातर्विधि करवी सकाळीं ॥
रामनाम भूपाळी । मुखीं गायी ।।२।।
उष्णोदकें क्षाळी चरण । स्नेहें करी अंगमर्दन ॥
निज-करें घाली स्नान । बैसवीत आसनीं ।।३।।
शाल्या पात्रें लखलखित । गुरु संनिध ठेवित ॥
स्वहस्तें विभूति चर्चित । गुरुरायासी ।।४।।
करवी संध्या आचमन । शाटी घाली पांघरुण ॥
गुरू लावितां समाधि-ध्यान । सांचल् नेदी ।।५।।

नातिसंन्निध नातिदूर । उभा जोडुनिया कर ॥
मन श्रवण दोनी सादर । ऐकावया ॥६॥
आणी मधुकरीचें अन्न । निवदी गुरुराया भोजन ॥
उष्टावळी सेवून । तृप्ती पावे ॥७॥
श्रीगुरु पहुडतां । श्रीचरण सेवी निज- हस्तां ॥
वैकुंठीची संपन्नता । तुच्छ मानी ॥८॥

एकदां बटुवामन नित्याप्रमाणें मधुकरी आणावयास निघाला तो वेदशास्त्रसंपन्न त्रिकालज्ञ विप्रवर मुकुंदराज याचें घरीं आला. मुकुंदराज वैश्वदेव करून अतिथीची वाट पहात होते—

( पद—चाल—जूजूरे जूजू )

बटु वामनः—

"ॐ भवति भिक्षां देही । श्रीगुरु श्रीगुरु मार्य।"॥ ध्रु०॥ श्रीगुरु०॥

मुकुंदराजः—

"कोणाचा तूं बाळा ? ऐसा ग्रासचि काळा" ॥ श्रीगुरु श्रीगुरु ॥

बटु वामनः—

" श्रीरामनंदाचा वामन बालक साचा ॥ श्रीगुरु श्रीगुरु ॥
नवखंड भूमी साची, सत्ता गुरुरायाची ॥ श्रीगुरु श्रीगुरु ॥
चिंतित चिद्रत्नातें, गुरु मज देत स्वहस्तें ॥ श्रीगुरु श्रीगुरु ॥
जेथें जेवि मी पाही, श्रीगुरु नांदे भायी ! ॥ श्रीगुरु श्रीगुरु ॥
ज्यासी जें मी मागें, देवावि निजगुरु अंगें ॥ श्रीगुरु श्रीगुरु ॥
सद्गुरु मम जिव्हाळा, मी तव भीत न काळा ॥ श्रीगुरु श्रीगुरु ॥
श्रीगुरुस्मरतां भायी, माझें लेखीं काळाचि नाहीं ॥ श्रीगुरु श्रीगुरु ॥
कळि काळाचा आजा, अच्युत स्वामी माझा ॥ श्रीगुरु श्रीगुरु ॥

मुकुंदराज त्या बटुवामनाचें मरण एक घटकेनें आहे असें जाणून त्यास म्हणतात.—

मुकुंदराजः—

"घडि मांजि मरुनी जासी, कां रे घरघर फिरसी?" ॥ श्रीगुरु० ॥

बटु वामनः—

"पल घडिते घडणारी, स्फूर्ती चंचल नारी ॥ श्रीगुरु श्रीगुरु ॥
मजला नाचि अंगिकारी, बाळ मि ब्रह्मचारी ॥ श्रीगुरु श्रीगुरु ॥
अलखीं[1] पलखं ही सहजीं, पलखीं मुलुख न मोजी ॥ श्रीगुरु श्रीगुरु ॥
मरणा आधिंच मेलों मग श्रीचरणीं ठलों ॥ श्रीगुरु श्रीगुरु ॥
नाहीं येणं जाणं, पूर्णचि गुरुरायानं" ॥ श्रीगुरु श्रीगुरु ॥

मुकुंदराजः—

"बोलसि तूं बहु कोडें, मजला नुमजे कोडें" ॥ श्रीगुरु श्रीगुरु ॥
शीघ्र हें सिद्धान्न नेई, गुरुला भोजन देई ॥ श्रीगुरु श्रीगुरु ।
शीघ्रचि घे शेषासी, ना तरि मरसि उपासी" ॥ श्रीगुरु श्रीगुरु ॥

असें बोलून उभयतां गुरु-शिष्यास पुरेशी भिक्षा मुकुंदराजांनीं दिली.

बटु वामनः—

"मस्तकिं जी गुरु जोडे धरितां दुर्मिळ जोडे ॥ श्रीगुरु श्रीगुरु ।
स्वस्ति असो बा तुजला, दिधली भिक्षा मजला ॥ श्रीगुरु श्रीगुरु
पूर्ण दिलें मज भायी, सद्गुरु पूर्णचि देई ॥ श्रीगुरु श्रीगुरु ॥
अच्युत गुरुला ध्यातां, नुरलें मज भय आतां ॥ श्रीगुरु श्रीगुरु ॥

दिंडी— शीघ्र वामन सद्गुरू पाशिं आला ।
गुरू चरणा देखुनी मनीं घाला ॥
जाहलें तें गुरु लागि निवेदीता ।
गुरू धाला, लाधला शेष हातों ॥१०॥

( लावणी राग–जोगी ताल–धुमाळी )

नित्यविधी परी सेज घातली मृदुशीतल सुंदर ।
जणूं कां मुनिचें शुद्धांतर, पहुडले त्यावरि श्रीगुरुवर ॥

---

१ अलक्षीं दृष्टी.

श्रीगुरुआज्ञा वामन मागुनि बैसे संन्निध स्थिर, ।
घेउनी चरणा अंकावर, नयानिं मग प्रेमाचें पाझर ॥
चरणाब्जासी करकमलांनीं करवाळी सादर ।
धनासी जसा कृपण नर, सेविते गौरी जसी हर ॥

चाल० नवल यांत कोणी आपण समजूं नका ।
गुरुचरण स्पर्शाहुनि अमृतरस हा फिका ।
इंद्रादिक त्याविण लाळ घोटिती फुका ।

हरि ही घे अवतार श्रीगुरुचरणाचे परवडी ।
असी रुचि याची ही चोखडी ॥
चरणानीं या मरण चुके हो तरण भवाचे थडीं ।
न जावी स्मरणावांचुनि घडी ॥ध्रु०॥१॥ ॥११॥

मुकुंदराजांनीं वामनाचा मरणकाल सांगितला त्याप्रमाणें यमदूत आले असें वामनास दिसू लागले.

दिंडी- काळ सोडीना सान आणि थोरा ।
बळी दुबळा वगळिना कृष्ण गोरा ॥
चालतीना उपचार कांहिं केले ।
चरक सुश्रुत वाग्भट्ट सर्व मेले ॥१२॥
दंत दाढा विक्राळ हेमकांती ।
धीट वीरहि देखुनी दचकताती ॥
दूत संयमनी-नृपें पाठवीले ।
प्राणियासी न्यावया शीघ्र आले ॥ ॥१३॥

लावणी [ चाल सदर ]

दूत यमाचे कराल कर्कश शूल पाश मुद्गला,
घेऊनी आले म्हणती "चला, न दवडा आतां एकही पला ।
मृत्युपुरीं जो काल तुम्हाला विधिदेवें नेमिला,
सर्व तो याचि घडी संपला, येथुनी घाट दुजा लागला ॥

बहुत टवाळी केलि धुमाळी, विषयरांगें रंगला,
अतां खा निजकृति तरुचें फला,विचाराचि कोमल वयसीं भला॥
चाल० काय दांत ओंठा चाऊनि असुं गाळितां ?।
फायदा न होइल पश्चात्तापें अतां।
वायदा तुम्ही श्रीहरिसी केला स्वतां।
टळली मुद्दत आधिंच धरिली तुम्ही बुद्धि वाकुडी,
कुडी ही सोडा जी तातडी॥
चरणांनीं या मरण चुके हो तरण भवाचें थडीं।
न जावी स्मरणावाचुनि घडी॥ ध्रु० ॥२॥ ॥१४॥

त्याच कालीं शिवदूत आणि विष्णुदूतही आले.

आर्या–महदपराध न व्हावा म्हणुनी यमदूत जेथ संचरती।
फिरती श्रीहरिदूतहि वैकुंठाची करावया भरती ॥१५॥
केल्याचें फळ देणें यमधर्माची असी असे नीती॥
श्रीहरि परम दयाळू, नामें हरिली अजामिळा भीती॥१६॥

लावणी–[ चाल सदर ]

पीत वसनधर सुहास्यसुंदर विष्णूचे परिचर,
विनविती गुरुभक्ता सादर, "चलावें वैकुंठीं सत्वर"॥
त्रिनयन वसु-कर डमरुशूलधर प्रत्यक्षचि जणु हर
म्हणति "चल देखों श्रीशंकर." ताडिता भ्याले यमकिंकर॥

विष्णुदूत आणि शिवदूत उभयतांनीं यमदूतास ताडण केलें.
या तिन्ही लोकांच्या दूतास वामन म्हणतो:—

वामन बोले "सकल वंद्य मज धर्मराज हरिहर,
नसे मज कोठें याया डर, जरी मज अज्ञापिति गुरुवर॥
चाल– परि सांगा करपादिं काय नमति हरिहर ?॥
वरि अनंत ब्रह्मांडाचें सद्गुरु घर ॥
तरि सगुणाविण या कवण सौख्य-मंदिर ?॥

१ लघुन्यास पादयोःविष्णुस्तिष्टतु, हस्तयोः हरास्तिष्टतु.

तळमळती जरि मजविण हरिहर येइन तरि अरघडी।
कुणी जरि राहिल येथें गडी ॥
चरणानीं या मरण चुके हो तरण भवाचे थडीं।
न जावी स्मरणावांचुनि घडी ॥ ध्रु० ॥३॥ १७॥

या गलबल्यानें श्रीगुरूस्वामी जागे होऊन म्हणतातः-

कामदा-"कवण स्वामि तो ? कवण दूत हा ?।
कवण तो पिता ? कवण पूत हा ? ॥
कवण तो सरे ? कवण तो मरे ?।
कवण तो कुणामाजि वावरे ? ॥१८॥
कवण तो विधी ? मांडितो कुणा ?।
कवण धर्म तो दंडितो कुणा ? ॥
कवण निर्गुणें घेतले गुणा ?।
न कळता तुम्हां, पुसुनिया खुणा" ॥१९॥

या श्रीसद्गुरु वचनानें यमदूत विष्णुदूत शिवदूत अंतर्धान पावले.

लावणी- [ चाल सदर ]

गुरुसेवेसी वामन रतला, दूत संघ परतला,
सद्गुरु देवाही वरतला ॥
कर्म फळाचा निधी करपला, आगमागमहि हरपला,
सोरसें प्रेमांबुधि झिरपला ॥
निज-कर्मासी धर्म विरमला, म्हणती हरिहर "मला,
असावा ऐसा नरवर भला" ॥
चाल-'पशु' 'पती' 'पाश' कां श्री गुरुहुनि वेगळे ?॥
शिशु माता सति पति एकांगीं सोहळे ॥
पशु पुरुष, पुरुष यजमान यज्ञ हा फळे ॥

---
२ अर्धीघडी.

निज चरणाच्या सेवेसाठीं इच्छित तैसें घडीं ।
दयाघन प्रेमास्तव गारुडी ।
चरणानीं या मरण चुके हो तरण भवाचे थडीं ।
न जावी स्मरणावांचुनि घडी ॥४॥ ॥२०॥

---

विनियोनी- गुरूपुत्रा न करीत काल कांहीं ।
सरसें सौख्य दिशा गिळूनि दाही ।
परिसों विश्व अपूर्व सत्कथाही ।
फिरतो श्रीगुरुपुत्र देत ग्वाही ॥२१॥

दुसरें दिवशीं पुन्हः मुकुंदराजाचें घरीं वामन भिक्षेस आला.

वामन- "ॐ भवति भिक्षां देही । श्रीगुरु श्रीगुरु मायी "॥
मुकुंद्राज- " कैसा हा फिरूनि आला ? " ॥
वामन- "आहे तैसा आला. "
मुकुंदराज- " नाही कालाचि मेला ? " ॥
वामन- "नाहीं - काळाचि मेला ? " ॥
मुकुंदराज- " माझी वैखरी चळली! "
वामन- " मुळिची वैखरी चळली "
मुकुंदराज- " गेलं तपही वाया! "
वामन- " गुरुविण सर्वचि वाया. "
मुकुंदराज- "आतां तनुही जाळूं! "
वामन- " आरति ओवाळूं! "
मुकुंदराज- "गुरु गुरु करिसी पोरा. "
वामन- " अच्युत पाठीमोरा. " ॥२२॥

मुकुंदराजास आपली वाचासिद्धि फोल झाली म्हणून वैताग आला.

साकी- साधु संत हे उदंड पिकले, कर्ममार्ग ते रुकले ॥
स्वर्ग नरक परलोकाहि सुकले, धर्मराजही थकले ॥२३॥
जगीं न टिकावें । आता कृष्ण वदन व्हावें ॥ध्रु०॥
अगाध तपला दुर्वास ऋषी वर्षे साठ हजारा ॥
खिन्नमात्र अंबरीष होतां, कुणी न देती थारा ॥२४॥
वाटमारका चोराचि एका हरिदासें ऋषि केला ॥
शुद्धाचारें वर्तत परि तो गालव शूळीं नेला ॥२५॥
कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुं हरि, तरि पंडित वाया ।
कर्मनिष्ट याज्ञिका त्यजी हरि, तारी पोरें बाया ॥२६॥

मुकुंदराजानीं स्ववचन अन्यथा झाल्यामुळें अग्नि प्रवेशाचा निश्चय केला. त्यावेळीं मित्रमंडळीनीं त्यास स्वामींचें दर्शन घेण्यास सांगितलें.

लावणी- [ चाल सदर ]

गुरु सेवारत चाखी अमृत ते देखुनि पंडित,
जाहला सहस्रधा खंडित ।
अहंपणें मत्सरासि मांडित, निज तत्त्वा सांडित,
जाहला पाखंडें मंडित ।
चिंता चेते चिता धगधगित, पडे तिथें दुश्चित,
पातला मृत्यू त्या धुंडित ।

मित्रांच्या आग्रहास्तव मुकुंदराज अग्निप्रवेशापूर्वी रामानंदांच्या दर्शनास आले, व त्यांनीं आपला अग्निप्रवेशाचा निश्चय सांगितला.

चाल- येउनी गुरुपदीं अदळी अपुले शिरा ।
मज खोटें केले, मरतां आतां खरा ॥
गुरु म्हणे "राखिले सेवेस्तव लेंकरा" ।

श्रीगुरु म्हणतात सेवेकरितां मी निज लेंकराचें संरक्षण केलें. मग तुला मरायचें काय कारण ? असें म्हणून श्रीगुरूनीं मुकुंदराजांचें शिरावर आपला दंड हाणिला, त्या सरसी मुकुंदरायाचें वैताग-अहंतेसहित देहभान नष्ट होऊन अखडैकरस चित्स्वरूपाची प्राप्ती झाली.

मार मारितां मरणचि मेलें, ऐसी अच्युत छडी ।
सुता ने कैवल्याचें थडी ॥
चरणानीं या मरण चुके हो तरण भवाचे थडी. ।
न जावी स्मरणावांचुनि घडी ॥५॥ ॥२७॥
अच्युत नाथा ! हरे अनंता ! काय मागु मी अतां ? ।
माउले ! पाळावें मज स्वता ॥
कर-कमलानें कान धरुनिया निजपदिं आणी सुता ।
शिरातें कुरवाळी निज-हातां ॥
चरणांगुष्ठा क्षाळुनि मजला दे निज दिव्यामृता ।
श्रवणपुटिं पेरी चित्सुखलता ॥
चाल- जरि कुटिल, मत्सरी, पाखंडी मी कली ॥
तूं समूळ रगडी मजला चरणा तळीं ॥
परि असो काळजी माझी तुज तळमळी ॥
सकल संत-पद तीर्थी मजला न्हाहणावें मायडी ॥
असावी अपुली तुपली गडी ॥
चरणानीं या मरण चुकें हो तरण भवाचें थडी. ।
न जावी स्मरणावांचुनि घडी ॥६॥ ॥२८॥
ओवी–खाऊनि सद्गुरूचा मार । मुकुंद पावला भव-पार ॥
अनुभवून सुख अपार । लोळण घाली गुरु चरणी ॥२९॥

मुकुंदराज सद्गुरूस विनवितात.

दिंडी- " कृपा केली मजवरी गुरुदेवा ! ।
परी नाहीं घेतली कांहि सेवा " ॥

मुकुंदराजास सद्‌गुरूनीं सेवा सांगितली:–

गुरू बोले " उद्धरी जैत पाळा ।
सोडि बंधापासुनी संतमेळा " ॥३०॥

॥ इति मुकुंदराज चरित्रे मुकुंदराज उद्धार ॥

## २ मुकुंदराजाचें चरित्र २ जयंतपाळ उद्धार.

उपेंद्र०— सुशील संपन्न जयंतपाला ।
जोगेश्वरी जोगविते दयाळा ॥
प्रजेसि तो पाळुनि नीतिपंथा ।
ऐके सदा शास्त्र पुराण गाथा ॥१॥

भुजंग— सदाचार सद्भक्ति आली फळाला ।
पहावा हरी होय इच्छा नृपाला ॥
न चिंतीत अर्था अनर्था कशाला ।
उदो ! अंबिकेच्या उदेल्या मशाला ॥२॥
पुराणीक सांगे पुरानें पुराणा ।
"ध्रुवा नारदें दाविला देवराणा" ॥
वदे रावः–" तो देव सन्मूख आणा ।
मलाही ध्रुवाच्या स्वरूपीं नहाणा ॥३॥
अहो धन्य जे तृप्त कीं मुक्त झाले ।
दुजे जेविले, तें मला काय धालें ? ॥
हरी रूपडें जों न सामोरि आलें ।
तरी भक्तिची ती कृती केविं चाले ? । ॥४॥
तुम्ही देव दावाल तेव्हां उपासूं ! ।
अर्धी साधनाला वृथा कां तपासूं ॥

निरालंबनीं थोर केला विलासू ।
प्रतीतीविना बोल आयुष्य नासू "॥ ॥५॥

पुराणिकांनीं यावर पुष्कळ वाद केला. राजा म्हणतो:–

पद ( ताल–झंपा )

"अहो !!—बोलतां फोल कां बहुत बाता ? ।
अनुभवा आणिजें ब्रह्म आतां ॥ध्रु०॥
अनुदिनीं संहिता खोलितां बांधितां, ।
पामरा या मला शब्द गोवा ॥
ब्रह्म तें दाखवा, ब्रह्मरस चाखवा, ।
वा न वा व्यर्थ कीं आत्मघाता " ॥६॥

पुराणिकास वाटलें कीं आतां राजा आपणांस मारतो.

साकी—ऐशा निकरा येतां राजा, विप्र म्हणे:–"मज न वधीं ।
मज न दिसे तें दावूं कसें तुज ? मास एक दे अवधी "॥६॥

राजाच्या मनांत पंडिताला मारायचें नव्हतें. पण स्वतः पंडितानेंच एक महिन्याची मुदत आपले मरणास मागून घेतली.

स्रग्धरा–मासांतीं मृत्युहातीं तनुसि निरखुनी, पंडिता थोर चिंता ।
गोडी लागे न भाता, दचकत निजतां, भासली लाव कांता ॥

पंडिताचे पत्नीनें सांत्वन करून सर्व अनेक ग्रंथ पाहाण्यास सांगितलें. महिना संपत आला. पोथ्यामध्यें पंडितास कोठें ब्रह्म दिसलें नाहीं. सर्व पोथ्या सन्निपातांत फेंकूं लागला.

वैतागें फेंकि ग्रंथा. अचुक अवचिता पत्र ये एक हाता ।
"देखाया लोकनाथा, शरण निजहिता जाइजे येथ संता " ९

ओवी–" संता दिशंति चक्षूंसि "[1] । व्यासोक्ति दाविली रायासी ॥
राव म्हणे:–"अनायासीं । सुटला तुम्ही पुराणिक !" ॥१०॥

---

१ श्रीमद्भागवत

भगवतास संत दाखवितात या व्यासवचनावर जयंतपाळानें विश्वास ठेविला.

आर्या–दौंडि दिली राजानें:–" साधूसंतासि मजपुढें आणा ।
हरि जो दाविल मजला, त्याचें चरणासि वाहिले प्राणा ॥११॥
संताभगवंताची व्यासादिक वर्णिताति थोर गडी ।
भगवंतासि न दाविति, ठेविन संतासि, तोंवरी निगडीं"॥१२॥

———

उपेंद्र०– स्वतासि जे लेखिति साधु संत ।
त्यानां पथीं बोलाति राजदूत ॥
"दावा हरी आमुचिये नृपास ।
किंवा बसा भोगित बंदिवास " ॥ ॥१३॥

राजाज्ञेप्रमाणें कोतवालांनीं साधुसंतास अटकेंत ठेविलें अर्थशास्त्रज्ञ प्रधानास त्यांचें खुराकीची काळजी पडली.बजेटात तडजोड काढिली.

साकी–सवा लाख यति संत अतीता यापरि ठेवून बंदीं ।
दहा लाख पागेची लाविति भरडायाला चंदी ॥१४॥

———

अभंग–अंगीं जडलीसे बेडी । कैसी भोग निद्रा गोडी ? ॥
दळितााती दिवस राती । हरी आळवीती गीतीं ॥
दुःखा माजि हा आनंद । सहजीं आठवे गोविंद ॥१५॥

दळतांना साधुसंत गातात:—

पद–हरि हो ! तोडी भवबंदा । करुणा करिगा गोविंदा ॥ध्रु०॥
वेषं वरि वरि बहु नटलों । परि तव पायीं नाचि पटलों ॥
आतां दोहिकडे तुटलों । सखया ! निजप्राणा विटलों ॥
केला उदरास्तव धंदा । करुणा करिगा गोविंदा ॥ध्रु०॥१॥१६॥

तूझा दास मला म्हणती । त्याची खंत धरी चित्तीं ॥
पापी मज सम नचि जगतीं । त्राता एकचि, तव ख्याती ॥
येई झडकरि मूकुंदा । करुणा करिगा गोविंदा ॥२॥ ॥१७॥

---

धावा ऐकून मुकुंदराज काराग्रहांत प्रगट झाले. व साधुसंतास मुक्त केलें.

स्रग्धरा–ऐकूनी आर्तवाणी प्रगटलि निगडीं दिव्य चैतन्य काया ।
शांती भानू उदेला, निरखुनि अवघी आटली मोह माया ॥
वेत्रें स्पर्शीत जातीं, कुणि न फिरवितां लागती तीं फिराया ॥
दिंडी गोविंद नामें उसळत नगरीं. सांग तीं दूत राया. ॥१८॥

पद–आला नृप अश्वावरती । सत्वर उतरूं म्हणे धरती ॥
मारितां छाडि विरली वृत्ती । समाधी अनुभवितां नृपती ॥
सहजीं घे ब्रह्मानंदा । करुणा करिगा गोविंदा ॥१९॥

---

ओवी–जयंतपाळ मग विनवी । "ही स्थिती अखंड असावी" ॥
सद्गुरू मुकुंदराज दावी । विवेक सिंधू ॥२०॥

॥ इति मुकुंदराज चरित्रें जयंतपाळ उद्धार ॥

---

## ३ द्रौपदी–कृत कोटि अश्वमेध

[ महाभारतावरून रूपांतर ]

आर्या– गोत्रवधा शमवाया आरंभी अश्वमेध पंडुसुत ॥
पृथ्वीपति जिंकुनिया भीमार्जुन हस्तिनापुरा येत ॥१॥

शार्दूल०–थाटाचा हयमेध तो गजपुरा. संपूर्ण नारी नरा ।
अर्पी धर्म परोपरी मुनिवरा दिव्यान्न हेमांबरा ॥
कृष्ण श्रीगुरु माउली निवडितां उच्छिष्ट चारी करां ।
वारी भीम. हरी निमूट बसला जाऊनि कुंती घरा ॥२॥

वेदीपासुनि एक मुंगुस निघे हेमांग. बोले कथा।
"हेमांगी बनलों शिलोंच्छ मुनिचें भस्मामधें लोळतां।
सातू दोनचि पाव तेथ शिजले, येथील मोठी प्रथा॥
सोन्याचा बनला न कैसाहि इथें हा यज्ञ धर्मा! वृथा" ३

---

दिंडी— म्हणे नारद ऋत्विजाः—"चला जाऊं।
हरी नाहीं त्या यागिं नका राहूं॥
अशा यज्ञाचें तोंड नका पाहूं।
हरी संन्निध जाउनी सुखें गावूं" ॥४॥

असें म्हणून ऋत्विज सभासद इत्यादि सर्वांसह नारद निघून गेले. यज्ञ मंडपात फक्त पांडव आणि धौम्य राहिले.

साकी— यज्ञ अधूरा, धर्म सबांधव चिंता डोहिं बुडाला।
धौम्य वदे "हरि आणुनि पूजा. यज्ञ पुरा मग झाला"॥५
आर्या—विनवी धर्म 'गुरो' तुम्हि हरिसम, समजाउनी हरी आणा'।
न कळे हरिपासीं जो गेला परतेल कोणता शाहणा?॥६॥

या प्रमाणें धौम्यगुरूला पाठविलें. तेव्हां तेही श्रीकृष्णा संन्निध जाऊन नारदमुनीचें कीर्तनांत गुंग झाले.

आर्या—हरिचा आशय धर्मा शिष्यमुखें कळविती गुरू घाई॥
"शत हय-मेधाचें फल अर्पी हरिला, तरी हरी येई" ॥७॥

धर्मराजानें नकुलसहदेवांस श्रीकृष्णास आणण्यासाठीं पाठविलें. ते पर्यंकारूढ श्रीकृष्णास म्हणतातः—

---

पद—चाल ॥ उद्धवा शांतवन कर जा ॥

करि याग सांग यदुराया। अम्हि दीन शरण तव पाया॥ ध्रु०
धर्माज्ञा घेउनि आले, सहदेव नकुल ते सुमती।
"यज्ञांतुनि धर्म न हाले, यज्ञाचें कंकण हातीं।
लेंकरा अम्हां पाठविलें, पूजना चलावें" म्हणती॥

चाल–हरि म्हणे "देह हा विकला । तुमचेंच घरीं, परि थकला ॥
अर्पा शत हय-मेधाला । तरि येइल धीर उठाया" ॥१॥८॥

नकुल सहदेव परतून हें संभाषण धर्मास सांगतात.

दिंडी– परत सांगति धर्मासि खिन्न वाणी ।
विजय बोलेः– "बुद्धिची येथ वाणी ॥
मीचि बोधुनि आणीन चक्रपाणी ।
कर्म-कंकण धर्मा ! न हरी मानी" ॥९॥

अर्जुन येऊन देवास विनवितोः–(पद–चाल सदर)

पद–करि याग सांग यदुराया । अम्हि दीन शरण तव पाया ॥
विकलासि दयेनें आम्हां, थकलासी मेघःशामा ।
शत हय-मेधाचें कर्मा, मिळसिल कां आत्मारामा ? ।
चल दर्शन दे तूं धर्मा, निजरंगा ! अंतर्यामा ! ॥

चाल–हरि बोले "शत-मुख तनया ! । पाचारिसि जरि तूं याया ॥
तरि हवेत शत-मख सखया । टाळुं नको मजला घ्याया ॥२॥१०

---

आर्या-निःशब्द जाय फाल्गुन.भीम वदेः-"बोल फोल काय करी ? ।
उत्कट कृतिनें हरि-पदिं जीवा द्यावें,तरीच येत हरी" ॥११॥

भीमसेन देवास विनवितातः–( पद–चाल सदर )

करि याग सांग यदुराया । अम्हि दीन शरण तव पाया ॥ध्रु०
म्हणे भीमः-"सख्या गोपाळा शत हय-मेधा द्या म्हणसी ।
शत दुष्ट अर्धी शत वेळां उपजावे गांधारीसीं ।
खेळावें कपटें द्यूता, तळपावें अम्हि वनवासीं ॥

चाल–तुज नको जरी अम्हि नाथा, तरि गदा पडो मम माथा" ॥

असें म्हणून गदा वर फेकून भीमसेनानें आपलें मस्तक खालीं धरलें. तेव्हां हरी म्हणतातः–

हरि म्हणे "गदा मद्भक्ता फिरली न कधीं माराया" ॥३॥१२॥

गदा वरचेवर जाऊन अदृश्य झाली.

आर्या-गेली गदा नभीं ती परतुनि आली कधीं न माघारी।
माघारीच निरायुध भीमाची दीन परतली स्वारी ॥१३॥

---

कृष्ण न आला देखुनि चिंतातुर धर्मराज गडबडला।
परि सारिसाचि उठूनी,धावत श्रीहरि पदांबुजीं दडला॥१०

धर्मराज विनंति करितातः-

पद-"करि याग सांग यदुराया। अम्हि दीन शरण तव पाया॥ध्रु०
स्वीकारी पूजा नाथा! हा याग सांग मग होई।
करि सफल यज्ञ तूं ताता? कृष्णार्पण फल तूं घेई।
तूं कर्ता भर्ता हर्ता, कवणाची काय बढाई?॥
चाल- हरि म्हणे "पावला मजला एक हा याग अर्पियला।
बाकिचें मागुं कवणाला? मागतां कोण मज देई?॥४॥१५

धर्मराजही परतून यज्ञमंडपात खिन्न बसले.

साकी-पांचहि बंधू खिन्न अधोमुख साश्रु-वदन देखूनी।
करी शांतवन मंजुळ वचनें याज्ञसेनि गुणखाणी ॥१६॥

कामदा- द्रौपदी प्रती धर्म बोलिलाः-।
" आमुचे वरी नाथ रूसला॥
यागिं ज्या हरी नाहि तोषला।
कर्म मांडुनी शीण सोसिला "॥ १७॥
द्रौपदी म्हणेः-"कृष्ण मावली।
संकटा मधीं नित्य पावली॥
दीन वासरा केवि मोकली।
आमुचीच पै भक्ति चूकली॥ १८॥

आणिते हरी–हेंहि बोलणें ।
नित्य–संन्निधा लाविते उणें ॥
पैं हरीपुढें आर्त धावणें । ”
पान्हयासि कीं वाढवी दुणें ॥१९॥

द्रौपदी श्रीकृष्णास विनविते:–

पद–“करि याग सांग यदुराया। अम्हि दीन शरण तव पाया ॥ध्रु०॥
कान्हायी ! अति कनवाळे । मम-मानस-सरस-मराळे ! ॥
आर्त हे नयन वेल्हाळे ! । देखाया तव मुख रुसलें ॥
उत्कंठित मन हें झालें । अर्पणा सर्व मागितलें ” ॥

पर्यंकावरून चटकन् उठून प्रभू चालूं लागतात व म्हणतात:–

चाल–हरि म्हणे “एकादा रुसलों । परि न मिळे म्हणुनी फसलों ॥
क्रतुविना उपासि न बसलों। मज मान नको कीं याया” ५॥२०॥

द्रौपदी म्हणते—

“कान्हया ! अधिर कां होसी ? । घे पुरवुनिया तव होसी. ॥
मिळविल्या कोटिक्रतु राशी । आधींच अर्पिल्या तुजसी ॥
घे हवेत तितुक्या तुजशी । राहिल्या वाटि संतांसी, ॥
‘नाम घेतां पाउल चाले । क्रतु कोटि तयाचें झालें ” ॥
हें तूंचि अम्हा शिकवीलें । लाविसी पुन्हा विसराया ॥६॥२१

---

श्लोक–गो कोटि दानं ग्रहणेषु काशी-प्रयाग-गंगायुत कल्पवासः ॥
यज्ञायुतं मेरु-सुवर्ण-दानं गोविंद नाम्ना न कदापि तुल्यम् ॥२२॥

यज्ञमंडपांत प्रभुराज येऊन धर्मराजाची पूजा स्वीकारली.



## ४ सुलभाजनक संवाद

[ महाभारतावरून ]

साकी गांगयासी पुसे युधिष्ठिर "मोक्ष तत्व मज सांगा।
स्थूल सूक्ष्म या दोन अहंता कशा पावाति भंगा" ? ॥१॥
भीष्म वदः- राजर्षी-तनया सद्गुरु मुनिवर सुलभा ।
बोधी धर्मध्वज-जनका, तो बोध मुक्ति दे सुलभा ॥२॥

दिंडी "राजनीतीनें प्रजे सर्व वागे ।
यमें नियमें सत्संगिं जनक जागे" ॥
असें सुलभेला कुणी संत सांगे ।
येत सुलभा मिथिलापुरीसि वेगें ॥३॥
रूप सुंदर चैतन्य चंद्रकांती ।
वेष यतिचा त्यावरी ज्ञानदीप्ती ॥
सभा बोले देखुनि दिव्यमूर्तीः-।
"लोकतारक ही ईश्वरी विभूती" ॥४॥
यथाविधि तिज अर्चिले जनकरायें ।
तृप्त झाले जन सर्व चरण-तोयें ॥
एक सत्संगाचेचि या उपायें ।
होत सुख तें गगनांत ही न माये ॥५॥

साकी-राव बोलतो शास्त्र, तयाचा अनुभव कितपत साचा ? ।
हें जाणाया सुलभा त्याच्या ठाव घेत हृदयाचा ॥६॥
निज सत्वा सुलभा जनकाच्या सत्वामाजीं मिळवी ।
निज दृष्टीच्या तेजें त्याची वरली बडबड पळवी ॥७॥

पद- चाल (बा किती घालिसी संसृतिचा पिंगा)

कवण तूं, कुणाची, कोठुनि कोठें जासी ?
म्हणे जनक तिला "तू अशी कशी संन्यासी" ॥ध्रु॥

"मी राजा असुनी अलिप्त सर्वा भोगीं ।
यम नियमीं दक्ष, विरागी, ज्ञानी, योगी ॥
यतिहूनि अधिक मी गृहस्थ अंतस्त्यागी ।
यतिवेषा अनुचित तूं शिरसी पुरुषांगीं ॥
जय इच्छुनि वागसि स्वैर मसीं राजासीं " ।

म्हणे जनक तिला तूं अशी कशी संन्यासी ?"॥१॥९॥

---

वदली मग सुलभा " वचन मधुर बोलावें ।
गंभीर अर्थ हळुवार सरस झलावे ॥
एकार्थी श्रोता, वक्ता, वचन, मिळावें ।
वक्त्याचा हेतू तरीच श्रोता पावे ॥
भय, लाज, काम, अभिमान श्रोतया नाशी" । म्हणे०॥२॥१०॥

[ तूं कोण याचें उत्तर ]

उत्तरा एक 'मी कोण?' असे तूं पुससी ।
हा प्रश्न जडला, कीं चैतन्या करिसी ? ॥
जरि जडासी करिसी, काय कळे रे त्यासी ? ।
चैतन्य एक घनदाट वसे सम-देशीं ॥
'कवण तूं?' प्रश्न हा कवण करी कवणासी'? । म्हणे०॥३॥११॥

[ तूं कोण यावर पुन्हां उत्तर ]

"इंद्रियें पांगळीं, मन तें संशयखोर, ।
करि बुद्धि निश्चया सत्व असे जरि थोर ॥
मीपणा चोर, वासना तया शिरजोर. ।
अज्ञान, जीव, रचि प्रकृती हा संसार. ॥
मी, तूं, हे सर्वचि प्रकृति. प्रश्न कां करिसी ? । म्हणे०॥४॥१२॥

[ तूं कोणाची, यावर उत्तर ]

हा देह बिंदु, मग गर्भ, जंतु, मग प्राणी, ।
धरि नाम रूप नर नारि तुच्छ चिन्हानीं ॥
शिशु, तरुण, वृद्ध, शव होत स्थूल देहांनीं ।
पळ पळ परमाणू पळति सर्व गगनांतीं ।
जी तनू अतां, ती नुरली याचि क्षणासी । म्हणं० ॥५॥१३॥

[ कोठुनि कोठें जाशी, यावर उत्तर ]

चंचलीं कुठुनि कुणि येत ? कसा कुणि जायी ? ।
जगिं वस्तु कुणाची असे ? कुणाची नाहीं ? ॥
हे प्रश्नचि फलकट, असमंजस, संदेही ।
"समदृष्टि" "मुक्त" तूं स्वतासि गणसी पाहीं ॥
निज आत्म्यापरि तू मला कसा नचि बघशी? । म्हणं०६॥१४॥

[ जय इच्छुनि वागसि स्वैर, यावर उत्तर ]

अरि मित्र हार जय भिन्न लेखिसी राया, ।
वरि मुक्त म्हणविशी कसा स्वतासी वाया ? ॥
अभिमान रोग हा तुझा हवा झाडाया. ।
घे दवा, ठेवि हृदयांत सद्गुरू पायां. ॥
बांधल बांध, जरि गर्व कुपथ्या करिसी । म्हणं० ॥७॥१५॥

[ मी राजा यावर उत्तर ]

बा जनका ! राजा सार्वभौम जरि झाला, ।
मुठभरीच खाउनि ओंठ करामधिं निजला. ॥
परि जिणें पराधिन, घडी नसे सुख त्याला. ।
जाणता कोण पतकरी अशा राज्याला ? ॥
हें वैभव अघवें काय तुझी मागासी ? । म्हणं० ॥८॥१६॥

पुरुपांगीं शिरलीस या आक्षेपावर उत्तर

बिलगलें तुला, तू दोष देशि मज त्याचा. ।
तुज संग न घडला हाय ! गुरु रायाचा. ॥
उपनिषद्, उपासन, उपाय, कथिसी वाचा ।
बडबडशी दंभ, अनुभव केवळ काचा ॥
मी अलग जशी बाहिर तुझ्यामधिं तसी । म्हण० ॥९॥१७॥

ज्ञान-भक्ति-विरहित शून्य असा तव हृदयीं ।
मी शिरे, यांत अपराध लेश हा नाहीं ॥
वासना गुंग जरि तुला भासलें कांहीं ।
तू कुलीन कां भर सभेंत देसी ग्वाही ? ॥
निज तनुद्वयें मी शिवल कां तुज ? कैसी ? । म्हण० ॥१०॥१८॥

तूं मोक्षपथिं रंगलासि, हें मज कळलें ।
तव मोक्ष कसा तो देखाया मन वळलें ॥
जय विजय दैत्य हे मला भिऊनि पळले ।
तव कल्याणास्तव मन माझें कळवळलें ॥
तव शून्य तनू मज यतिला जागा खासी । म्हण० ॥११॥१९॥

[याप्रमाणें जनकास बोध झाल्यानंतर तो म्हणतो]

बोधिला जनक मग म्हणः–"माय अविनाशी ।
सद्गुरू माउले ! चैतन्याचे राशी ! ॥
या हृदयीं संतत तूंचि होय सुखवासी ।
सन्मुख ही मज तूं ठेवी चरणापाशी" ॥
गुरु ब्रह्मानंदीं सहज ब्रह्म विलासीं ।
म्हण जनक तिला तूं अशी कशी संन्यासी ? ॥१२॥२०॥

॥ इति सुलभाजनक संवाद ॥

## ५ वृद्ध-कन्या कुणिकेचें आख्यान.

( महाभारतावरून रूपांतर. )

दिंडी- 'कुणी' नांवाचा ऋषी महाज्ञानी ।
ब्रह्मचर्यानें करी तपा रानीं ॥
तया नारद बोललाः-" अहो ज्ञानी ! ।
जगीं संतानीं ठिवावी निषानी ॥ १ ॥

निसंतानें सद्धर्म सर्व लोपे ।
कुणासाठीं तापसी खटाटोपे ? ॥
भक्ति-बीजाची लाविजेत रोपं ।
देव पूजाया बांधिजेत सोपे " ॥ २ ॥

---

निरपत्याचें सर्व व्यर्थ आहे, असा कुणी ऋषीचा निषेध नारदांनीं केला, तेव्हां कुणी ऋषीनें तपोबलानें कन्या निर्मिली

आर्या-ऐसें ऐकुनि कुणिनें, इच्छा मात्रेचि निर्मिली कन्या ॥
शीण तपाचा नुरला. प्रेमें बोधुनि करी तिला धन्या ॥३॥
यम पांच, नियम पंचक, शम संपत्ती सहा.नऊ भक्ती ॥
आत्मानुभव, मधुरता,, प्रेम, दया,धैर्य,सरलता, युक्ती ॥४॥
बत्तीस लक्षणांनीं युक्त बहू वृद्ध जाहली नवरी ॥
तिज योग्य पती न मिळे,म्हणुनी हीना कुणा नरा न वरी॥५

---

दिंडी- पुनः नारद येउनी तिला बोलेः —
" दिलें कोणाला तेंचि करीं आलें ॥
वर न वरितां तव आयु फोल गेलं ।
तपा आचरुनी तुवां काय केलं ? " ॥ ६ ॥

हें ऐकून कुणिकेनें तप समर्पण करण्याची प्रतिज्ञा केली.

साकी-कुणिका बोले:-"मला वरिल जो, तप हें अर्पिन त्याला" ॥

नारदानीं ही प्रतिज्ञा सर्व भारतवर्षांतील ऋषिमंडळांत जाहिर केली.

ऐसें ऐकुनि गालवऋषि-सुत शृंगी वरण्या आला ॥७॥
भजनानंदीं कुणिका गातां, पशुपक्षीगण सारे ॥
वैरा सांडुनि सेरा नाचति, उभाविति पुच्छ पिसारे ॥८॥

कुणिका गाते. (पद चाल-कारे हरी ! तूं मज छळि तो)

वरा वराया गुरुसि वरा ॥
हरि गुरु, गुरु हरि, भजुनि चराचरिं,
पार हा संसार तरा ॥ध्रु०॥
हंस सारस गाति चकोर, मयूरहि नाचत ताल धरी ॥
सिंह गायि ससे हरिणासह-फेर धरी नट-नृत्य करी ॥

इतक्यांत शृंगी आला हें पाहून पशुपक्षी पळून गेले.

कुणिका गाते:—

भीउनी पशुही पळती, तो हिंसक संत न घेति करी ।
पक्षिपशू भजनीं रमले, नर त्याविण जन्मुनि व्यर्थ परी ॥
चाल- नरा जया देहभाव, तया कैसा मिळे देव ?
नसे नसे तो नराचि खरा ! ॥ वरा वराया० ॥१॥९॥

शृंगीला वाटलें आपण खर ठरलों, म्हणून तो लाजून परतला.

नारदानी शृंगीस उपदेश केला.

साकी-शृंगी परते नारद बोधी, "हिंसा निंदा सोडी ।
यम नियमानें, शम दम भजन, जोडी हरिपदिं जोडी" ॥१०॥

---

बारा वर्षें यापरि वर्तुनि, शृंगी परतुनि आला ।
पळाति न पशुगण, परि शंकाकुल-दृष्टी निरखिति त्याला ११

कुणिका गात आहे. [ पद–चाल पहिली ]

वरा वराया हरिसि वरा ॥
हरि गुरु, गुरु हरि, भजुनि चराचरिं,
पार हा संसार तरा ॥ध्रु०॥

साधनें, यमनेमदमें, तनु मात्र झिजे, विषयासि तुरे ।
भेद वंचक संचरतो, जरि किंचितसा संदेह उरे ॥
संत संगति अंतरते, जरि अंतरिं चंचल नारि शिरे ।
नारि नसे, भरपूर वसे हरिबोध ज्या उरिं, तो नर रे ॥

चाल– अनुभवा नाहीं ठाव, जपीं तपीं मात्र भाव, ।
कच्चेल काचा नर न पुरा ॥ वरा वराया० ॥२॥१२॥

---

निराश व लज्जित शृंगी परत गेला. पुन्हां नारदांनी बोध केला.

आर्या–परतूनि जात शृंगी, नारद बोले " नको फुका परतूं ।
आत्मानुभव नसे तुज, नवरी न वरी, असा कसा नर तूं? १३
सर्वांभूतीं व्यापक निज आत्म्याला तुवां परिक्षावें ।
व्रत आचरूनि संतत, सुंदर नवरी तिला निरिक्षावें " ॥१४॥

शृंगी याप्रमाणें द्वादश वर्षें आत्मचिंतनांत राहिला.

द्वादश वर्षें शृंगी तपुनि पुन्हां नारदासवें आला ।
नारद बोलेः-"कुणिके! आतां हो सिद्ध यासि वरण्याला" ॥१५॥

कुणिका गात आहे. ( पद–चाल पहिली )

वरा वराया हरिसि वरा ॥
हरि गुरु, गुरु हरि भजुनि चराचरिं,
पार हा संसार तरा ॥ध्रु०॥

नारदा वदली कुणिकाः-"मुनिहो! आइका नमितें चरणा।
पातला नर हा शाहणा हरण्यासि धना, नचि उद्धरणा॥
मी दिलें तप बोध तया, मज आलि दया बघुनी निपुणा।
एक हा आत्माचि जगीं, तरि कोणि इथें वरिजेल कुणा?॥

चाल- मला जरी वरूं आला, तसें कळावें कीं मला,
हरी धना हा चोर खरा॥ वरा वराया० ॥४॥१६॥

शृंगी खिन्न होऊन बसला.

दिंडी म्हणे नारदः-" विपरीत थोर झालें।
नसे नवरी, परि चोरपणाचि आलें॥
तुझें हातीं तें नवें काय ठेलें?।
परी प्रेमाविण जिणें व्यर्थ गेलें" ॥१७॥

---

जशी खडका फोडिते वज्रधारा ।
तसा शृंगी पाझरे प्रेमधारा॥
म्हणेः-" गुरुराया! मला अंगिकारा।
तुम्हा वांचुनि मज अन्य नसे थारा" ॥१८॥
दया आली सद्गुरु माउलीला।
पुसे डोळे मग म्हणेः-" उगे बाळा॥
तुवां माझा जो अंगिकार केला।
मला त्याचा थोरला भार झाला" ॥१९॥

शृंगी म्हणतोः-(पद चाल पहिली)

वरा वराया गुरुसि वरा॥
हरि गुरु, गुरु हरि भजुनि चराचरिं,
पार हा संसार तरा॥धु०॥
माउले! गुरु अंबिके! सनकादिक वंदिति पाय निके।
मी तुकेन कसा तुजसी? तप बोध मशीं तुजवीण फिके॥

कौतुकें धरिलेंसि करासि, दयेविण कांहिं न होउं शके ।
मी तुझा धरि उंबरठा, नचि जाइन साहिन सर्व धके ॥
चाल- ब्रह्मानंद सहजाचा, सनातन पूर्ण साचा,
भाव हा धरिलाचि धरा ॥ वरा वराया० ॥४॥२०॥

## ६ कुंतीनें देवास आडवून धरिलें.

साकी-देव सहायक निज भक्तांचा, जिंकुनि कौरव सेना ।
धर्मा स्थापुनि स्वाराज्यावरि, निघे आपुलें सदना ॥१॥
दिंडी- रडत कुंती आडवी यदूरावा ।
" नको वैभव जें देतसे दुरावा ॥
दिला वनवासें भला लाभ देवा ।
तुझी जवळिक या जगीं थोर मेवा " ॥२॥
पद-नको सोडुनि जाउं आतां । दिन-बंधु द्वारकानाथा ! ।
कां निष्ठुर होसी ताता ? । तव पदीं ठेविला माथा ॥ध्रु०॥
मुनि योगी बहु निर्धारी । तप करुनी शिणले भारी ।
निजदयें होसि सामोरी । आत्मया ! आंत बाहेरी ॥
चाल-आजि दुरी, जासि तूं हरी, कसी तुज तरी—
पाहुं मी आतां ? । दिनबंधु द्वारकानाथा ॥१॥
शीणतां देवकी वाहिनी । सोडविलें कितिक दिसांनीं ॥
शीणलासि परी त्याहुनी । माझिये सुता पाळूनी ॥
चाल-अनुदिनीं, आधिं पाळुनी, अतां तूं झणी,—
सोडिसी हातां । दिनबंधु द्वारकानाथा ॥२॥
वनवासचि बरवा देवा, तूं मिळसि चित्सुख मेवा ॥
हा संतति संपति हेवा, सांडितो जोडिला ठेवा ॥
चाल-तूं दिवा, दीन मानवा, जिवाचे जिवा—
लाभसी संता । दिनबंधु द्वारकानाथा ॥३॥

फोडितां दहीं हंडीला। बांधिलें तुला उखळाला ॥
यम भीत तुझे सत्तेला। तो तूं भीसी मातेला॥
चाल-हरि रडे, तेंचि रूपडें, चिंतिता पडे—
मोह मम चित्ता,। दिनबंधु द्वारकानाथा ॥४॥

अवतार तुझे यदुराया। काणि म्हणाति दैत्य माराया॥
मुनि म्हणाति भक्त ताराया। संसृतिचा शीण हराया॥
चाल-कासया, तुझी ती दया, पावली लया ?—
लागली चिंता। दिनबंधु द्वारकानाथा ॥५॥

हे यादव पांडव वीर। तूं राखिसि म्हणुनी शूर॥
तुजवीण ओस माहेर। तुजवीण शून्य सासर॥
चाल-अनिवार, मोह हा फार, झाडुनी केर,—
धरी निज हातां। दिनबंधु द्वारकानाथा ॥६॥

सांवाळिया तूं सुखकंदा। नलगे मज आणिक धंदा॥
वृंदावन-गोप-विनोदा। मज संन्निध राहि मुकुंदा॥
चाल-गोविंद! ब्रह्म आनंद! सहज सुखकंद!—
रुजे मम चित्ता। दिनबंधु द्वारकानाथा॥७॥

आर्या-कुंतीच्या या वचनें, मकरंदें बांधिला जसा भ्रमर॥
राहे कुंती जवळीं, विसरे वसुदेव, देवकी कुमर ॥८॥

दिंडी- नाथ या परि हस्तिनापुरीं ठेले।
द्वारकेचं जन दर्शना भुकेले॥
दिवस. महिने, वर्षही, सुणें गेलें।
नाहिं एकहि सणवार कुणी केले ॥९॥

आर्या-वसुदेव पत्र धाडी कुंतीला, "तूं हरीसवें यावें"॥
देवासि हेंचि ठाउक, भक्तामागें हळू हळू जावें ॥१०॥

## ७ कोकिला व्रत कथा.

पद-कूजते कोकिला "शंकर! शंभू शिवहर!" भवभिदनाचे।
भजनीं मुनि नारद नाचे ॥ध्रु०॥

कर्माग्रणि दक्षा औरस कन्या षोडश. पत्नि प्रसूती।
धर्मासी दिधली मूर्ती ॥
मति,मेधा,श्रद्धा, दया, तितिक्षा, क्रिया, मैत्रि, उन्नती,
ऱ्ही, पुष्टी, तुष्टी, शांती ॥
या धर्मा तेरा जणी. स्वाहा अग्नि. स्वधा पितरा ती.।
फाकली प्रजा बहु जगतीं ॥
षोडशी सती वरि शिवा. नसे सुख जिवा पुत्र-वदनाचें।
भजनीं मुनि नारद नाचे ॥ध्रु०॥१॥

साकी-धर्मा तेरा, स्वहा अग्निला, पितरासि स्वधा देई।
शील कुलाचें, हे दक्षाचे, झाले घर-जावाई ॥
दक्षा मनि ताठा। नगणी आणिक मोठा ॥२॥

पद-धर्माची संतति परिसा. श्रद्धा सुरसा वीत शुभाला।
ऱ्हा प्रश्रय, शांति सुखाला ॥
मति अर्थ, तितिक्षा क्षेमा, पुष्टी कामा, कृति योगाला।
प्रसवली दया अभयाला ॥
मैत्री ती वीत प्रसादा, तुष्टी मोदा, मेधा स्मृतिला ।
उन्नती वीत दर्पाला ॥
मूर्तीचे नरनारायण, हरिति पुरातन मद मदनाचे।
भजनीं मुनि नारद नाचे ॥२॥३॥

साकी-अग्नीचे सुत हुत-भोजन, शुचि, पावक, हें तेजस्वी।
पंचेचाळीस नातू, अगणित पणतू बहु ओजस्वी ॥
पितरांच्या कन्या। वयुना, धारिणि सन्मान्या ॥४॥

पद-शिव कैवल्याचा दानी, पति-अनुसरणि, शिवाची राणी
शिकवीत सतीची रहणी ॥
भूर्जाचें वल्कल धवळा, मळवट भाळां, निर्मल करणी
बहु शोभे गुंजाभरणी ॥
शिवयोगी सतत विरागी, विषय त्यागी, पतिचे स्मरणी
रत संतत भवहर-चरणी ॥
करि मत्सर दक्ष सतीचा, पडला खांचा, गर्व धनाचे.
भजनीं मुनि नारद नाचे ॥३॥५॥

———

त्रैविद्या-मंडित पंडित, यागा मांडित, भरला गर्वा
ऋग्यजुषासामअथर्वा ॥
यक्षोरग दानव किन्नर, सुर विद्याधर, मिळवी सर्वा
सांबाची नकरी पर्वा ॥
कर्माचे चुकला वर्म. न पावे शर्म, तुडविता दुर्वा
हर हर ! हा वाळी शर्वा ॥
"त्या यज्ञा सत्वर मोडा, शिर ही तोडा, अभिमानाचे"
भजनीं मुनि नारद नाचे ॥४॥६॥

———

दिंडी- म्हणे नारदः-"द्या येथ पूर्ण लक्षा।
तुम्हां वाळुनि जन मिळति सर्व दक्षा ॥
विप्र, देव हि मग घेति त्याचि पक्षा।
कोण सांगा वाढील तुम्हा भिक्षा ?" ॥७॥

———

आर्या-अपमान तातकृत तो पतिचा साहे कसी ? सती खवळे ॥
बोले शिवाः-"चला जी ! संपादूं भाग आपुला स्वबळें" ८

———

पद-शिव बोलेः-"सज्जन गेहीं, अवतण नाहीं, तरि हि जावें
दुर्जन मुखही न पहावें ॥

विद्यावय, तपकुल वपुधन, संतां भूषण, परि बहकावें
खलमन यागुणिं गुरकावें ॥
करि आप्त म्हणुनि खळ गौरव,परि तो रौरव, चिरि उर घावें
त्या नरकीं काय रिघावें ॥
खळ संगीं अवचित भिडसिल, भंवरा पडासिल, तूं मरणाचें
भजनीं मुनि नारद नाचे ॥५॥९॥

अवमानी साति शिवबोला, बसली बैला, निज माहेरी
चालली. वाजती भेरी ॥
रिटि, भृंगी, चंड, विनायक, भद्रभयानक, भैरव गजरी
वाजविती शंख तुरारी ॥
तो वीणागान विशारद, चाले नारद मुनि, सामोरी
दक्षा वरि लक्षुनि स्वारी ॥
शिवभागेविण त्या यागें, उडती ठिणगे, साति नयनाचें
भजनी मुनि नारद नाचे ॥६॥१०॥

श्लोक- रोषें सती तेथ पित्यासि बोले ।
नष्टा तुझें अर्जित फोल झालें ॥
डोळयावरी धूर तुझ्या. शिवाचा ।
हा द्वेष जाणे पथ रौरवाचा ॥११॥
नसे शिवावीण जगांत थोर।
नसे शिवाला कवणासि वैर ॥
सर्वा जिवाचा प्रिय जो सुजाण ।
निंदी तयाते तुजवीण कोण ? ॥१२॥
बघूनि तूते मम ऊर फाटे ।
त्वत्संभवाची मज लाज वाटे ॥
त्वदंगभूता तनु येथ रक्षा ।
करूनि, मी होइन पूत दक्षा ! ॥१३॥

पद-पद्मासन सति मग घाली, तनुची होळी, केली रक्षा
नावरे क्रोध शिवपक्षा ॥
उतरले निशाचर शिवगण, बहु पिशिताशन, भूता यक्षा-
सांपडले ऋत्विज भक्षा ॥
यज्ञाचे मंडप मोडित, पात्रें तोडित, झोडित दक्षा।
कैकांचे फोडित अक्षा ॥
कोलाहल उठती दारुण, हृदय विदारण, रण-कदनाचे ।
भजनीं मुनि नारद नाचे ॥७॥१४॥

शरणागत अमरपराजित, सुरवर-पूजित,-भक्तकदंबा-
विधि विष्णूसह मग सांबा ॥
विनवीत विधी विश्वेशाः-"अध्वर शेषा, तुम्हि आलंबा।
दक्षासी द्या पाठिंबा" ॥
मुनि बोलेः-उठतिल मेले, यज्ञही चाले, परि हेरंबा-
कैं भेटे मम जगदंबा!॥
हर दे वरः-"होउनि कोकिल, सति सुख राखिल, भक्तपणाचें।
भजनीं मुनि नारद नाचे ॥८॥१५॥

अमरासव सुरसा चाखुन, करित गायन, "शिव मदनारी"।
कोकिला रूप घे गौरी ॥
तनु काळी चंचू पिवळि, मनाची कवळी, कल्पापारी।
अवतरे हिमाचल-उदरीं ॥
ही टाकुनिया निजमुक्ति, शिवाची शक्ति, जाहली नवरी।
प्रेमाची शिकवी कुसरी ॥
शिवदायक व्रत जे करिती, सहजा वरिती, सुख सदनाचें।
भजनीं मुनि नारद नाचे ॥९॥१६॥

आरती कोकिला गौरी, सहमदनारी, जय सन्माते ।
जय जय जय चित्सुख-दाते ॥

घे हळदी कुंकू बाई! आंबे खाई नैवेद्याते ।
भरितें मी ओटी हातें ॥
सौभाग्या दे संतानां, संपति नाना, भरि भुवनाते ।
प्रेमाचें रक्षीं नातें ॥
सहजा तूं चुकवी दुर्गति, ठेवी संगति, निज सुजनाचें ।
भजनीं मुनि नारद नाचे ॥१०॥१७॥

॥ इति कोकिलाव्रत कथा ॥

## ८ नामदेवाची तीर्थयात्रा.

दिंडी- तीर्थयात्रेसि निघे ज्ञानराजा ।
घेत मुक्ताई सवें संत फौजा ॥
म्हणे सोपाना “ त्वरें राउळा जा ।
अणा नामा भक्तिचा भोड ताजा” ॥१॥

सोपानदेवांनीं हें काम आपलें शक्तीबाहेर आहे असें सांगितलें.

साकी-सोपान “वदे हरि निज काळिज देइल कां जरि दाता?।
ज्ञानराज हरिरूप, तयांची भीड पडे श्रीनाथा ॥
देवा विनवावें । नामा मागुनिया घ्यावें” ॥२॥

ज्ञानदेव राउळास जातात.

आर्या-श्रीपांडुरंग राया कर जोडुनि ज्ञानदेव विनति करी ।
“मागत मी तव नामा, जेणें लाभेल साच भक्ति करीं” ॥

देवाचें उत्तर

दिंडी- देव बोलेः- “ गाउली वासराला ।
दूर नेऊं देईल कां पराला ? ॥
परी मी तूं अद्वैत अंतराला ।
म्हणुनि निजधन सोपितो तव कराला” ॥४॥

देव म्हणतात.—पद

"नामदेव एकुलतें, बाळ तान्हुलें ।
ज्ञानोबा ! जतनकरीं, तव करीं दिलें ॥ ध्रु० ॥

नेणत हा काशि, गया, माझिया विना ।
आज हा वियोग मला, साहवेचिना ॥
नामयासवें मन्मन तुजसि अर्पिलें ॥१॥५॥

नामदेव देत, तोचि ग्रास सेवितों ।
त्याचियाचि प्रेम-जान्हवींत नाहतों" ॥
आजवरी मीं तयासि कधिं न सोडिलें ॥२॥६॥

तेव्हां ज्ञानराज म्हणतात.

विठ्ठलासि नामदेव विनवि तेधवांः-।
"नामदेव हृदयीं तूं राहि केशवा ॥
संतासह तीर्थाटण बहुत चांगलें" ॥३॥७॥

दोघांचें संभाषणावर नामदेव म्हणतात.

नामदेव वदेः—"देव हृदयिं राहिला ।
परि हरपे सन्मुखिचा घोर हा मला ॥
ब्रह्मानंद प्रगटरूप सहज शोभलें" ॥४॥८॥

देव नामदेवास यात्रेस जाण्याची आज्ञा करितात.

दिंडी— नाथ बोलेः—"ही संत फौज सारी ।
उभी ठेली नामया ! महाद्वारीं ॥
हवें तेव्हां तूं मला हाक मारी ।
प्रगट होइन तत्काल तुज समोरी" ॥९॥

यात्रेची दिंडी निघाली.

पद ( चाल–व्रज भुवनीं यदुनायका, )

कवळुनी नामया करें, चालले ज्ञानेश्वर योगी ॥ध्रु०॥
सुर-सरिता तटसे सखे आरसे सन्मुख दो बाहीं ।
निरखिती आप आपणां, पुरातन पुरुष जसा पाही ॥
चालती एक पाउलें, त्रिविक्रम भुवनीं जणुं जायी ।
हरिनाम जान्हवीपूर वाहवी विश्वा गगना ही ॥
परि तरले तेथें भाविक, साधे, भोळे, भवरोगी ॥कव०॥ १०

संत मुक्कामास आले.

दिंडी– वाट चालीं पातले एक गांवा ।
संत म्हणती :–“ घेऊत जी विसावा ॥
स्नान संध्या सारुनी पूजु देवा ।
शेष सेवूं या, गोड होत मेवा ” ॥११॥

साकी–शुद्ध सुरस ती करुनि रसोयी, संत भोजना बसले ।
परी नामया फुंदत बोले :–“ मजला जेवण कसलें ? ॥
हरि तो उपवासी । माझा पंढरपूरवासी ” ॥१२॥

---

इकडे देवास तळमळ झाली.

प्रश्नः–देवास तळमळ झाली त्याचें काय कारण ?

भुजंग० जया दर्शनें स्पर्शनें पुण्य जोडे ।
जयाचें मुखें क्लिष्ट संदेह मोडे ॥
असे संत विश्वामधीं फार थोडे ।
विचारा तयानांचि हें काय कोडें ? :— ॥१३॥
“स्वयें धाडि तीर्थाटणा नामदेवा ।
दिला ज्ञानराजा करीं आत्म-ठेवा ॥
पुन्हः होत कासाविसी काय देवा ? ।
जिथे आदिशक्ती करी नित्य सेवा ” ॥१४॥

देवी रुक्मिणी म्हणते

म्हणे आदिमाताः–"न शोभे तुम्हांसी।
असी खिन्नता नाथ! सच्चित्सुखासी॥
असे नामदेवागुणें कां उदासी।
सुधापात्र तुम्ही तिथें भक्त मासी" ॥१५॥

हें ऐकून देवास राग आला.

"परे पार हो," बोलले चक्रपाणी।
"तुझी जीभ ही लांबली फार राणी!॥
न सोसे तुझे शब्द अंगारवाणी।
अनंता मला शक्तिची नाहि वाणी ॥१६॥
जया सागरीं मी वसे मीन-रूपी।
भुयीं लोळतों जेथ क्रोडस्वरूपीं॥
जिथें बद्ध मी सिंह हृत्स्तंभ यूपीं।
तिथें मक्षिका मीच कीं प्रेम–तूपीं ॥१७॥
निराधार मी, भक्त देतो सहारा।
निराकार मी, भक्त आणी अकारा॥
निरानंद मी, चारितो प्रेम चारा॥
निरासूं कसे भक्त राजा उदारा? ॥१८॥
जया नामदेवा गुणें देव झालों।
जया नाम लेवासि सन्मूख आलों॥
अशा भक्तराजामधें मीच व्यालों।
तसा देवघेवेसि कांहीं न भ्यालों ॥१९॥
मला पाळिता पोसिता अन्नदाता।
मला बाहतो ग्रास घेऊनि हाता॥
जरी मी त्वरेनें न जाईन आतां।
शिळा ग्रास होई पहातां पहातां! ॥२०॥

तयावीण मातें गमेना कदापी ।
मला भासतें लोटलों अंधवापीं ॥
दिसेना मला तूं, तुला मी असेना ।
नसे भक्त. वैकुंठ ही का नसेना ! ॥२१॥

द्विधा जाहलों भक्तिच्या मी सुखाला ।
सुधा नाहलों सेवितां भाजि पाला ॥
असा नामजी देव तो दूर झाला ।
त्वरें बाहतो तो मला जेवण्याला ॥२२॥

---

पद चाल—व्रजभुवनीं०

कवळ तो पंढरीकडे वोडवुनि पाचारी नामाः—
" झडकरी येइ बा हरी! करीच्या सांडुनिया कामा ॥
घे पंचप्राणाहुती, रुचे तरि भोजन मग आम्हां ।

देव प्रगट झाले.

प्रगटला कोटिसूर्यप्रभ वंदिति इंद्रादिक ब्रह्मा ॥
ती मूर्ति संत पाहती. कुणाची दृष्टी त्या जोगी ? ।
कवळुनी नामया करें चालले ज्ञानेश्वर योगी ॥२॥२३

याप्रमाणें पाडुरंगानीं सर्व संतांस दर्शन देऊन नामदेवाचें करानें भोजन केलें. पुढें प्रवासांत निर्जल प्रदेश आला.

---

भुजंग— नभीं वर्षतो चंड भानू निखारे ।
तळीं वाळुचे तप्त गोटे ढिगारे ॥
दिसेना कुठें तोय तें गोड खारें ।
अशी वाट, येती तिथें संत सारे ॥२४॥

तेव्हां मुक्ताबाई म्हणतात.

'मृगांबू' असें नाम देती जगाला ।
वसे कांहिंसी तेथ आशा मृगाला ॥
जलाचा कुठें माग नाहीं अम्हांला ॥
जलाभास सोपान ! ही कां निमाला ? ॥२५॥

मुक्ताबाईचें वचन ऐकून सोपानदेव चांगदेवास म्हणतात

जरी येथ हाणाल तोंडासि पाणी ।
तरी ही न लाभेल तोंडासि पाणी ॥
सुटे कोरड्या काय तोंडासि पाणी ।
नये येथ तोंडासि ही चक्रपाणी ! ॥२६॥

चक्रपाणी चांगदेव म्हणतात

जरी ब्रह्मरंध्रांत नेईन प्राणा ।
न बाधेन मी क्लेश दुःखा तहाना ॥
परी आसना येथ नाहीं ठिकाणा ।
इथें भाजतो देह जैसा फुटाणा ! ॥ ॥२७॥

इतक्यांत सर्व संत एका वापीपाशीं आले. तें पाहून ज्ञानेश्वर महाराज म्हणतात:—

जलाधार पृथ्वी. बहू खोल वापी ।
निघे जो तळीं, एक तो जीवना पी ॥
असा योग जो साधितो तोचि वाचे ।
न साधी तया कष्ट होती भवाचे ॥२८॥

सर्व ही संत त्या खोल वापीचे तटाकावर चितातुर बसलेले पाहून नामदेव म्हणतात:—

जरी एकला वाचला काय झाला ? ।
असा योग निष्ठूर केला कशाला ! ॥

तुम्ही येथ आणूनिया संत-मेळा ।
अशा निर्जलारण्यि कां नाश केला ? ॥२९॥

त्यावेळेस नामदेवानीं देवाचा धांवा केला. पद ( चाल–सदर )

सकलासि लागली तृषा, धांव गा ! हे संकट वारी ।
हरिरामकृष्णगोविंद ! मुकुंदा ! पीतांबरधारी ! ॥
ये झडकरि मधुसूदना ! करुनिया गरुडावर स्वारी ।
भवभंजन जगजीवना ! सखा तूं आमुचा कैवारी" ॥
उसळला झरा आंतुनी, ऐकुनी हाक असी वेगीं ।
कवळुनी नामया करें चालले ज्ञानेश्वर योगी ॥३॥३०

याप्रमाणें प्रभूनें नामदेवाचें धाव्यास जलावतार घेतला. व सर्व सज्जन त्याचें प्राशनानें शीतल झाले.

तृषित ते संत सोयरे, साहवे केसे श्रीरंगा ? ।
जगजीवन प्रेमळपोषण वाहे वापीतुनि गंगा ॥
तें अमृत पीउनि धाले, निवले सज्जन सर्वांगा ।
भानुही हिमांशू झाला, पाउनि ऐशा सत्संगा ॥
सांडुनी प्रखरता सहज ब्रह्मपद-पंकज-रुचि भोगी ।
कवळुनी नामया करें चालले ज्ञानेश्वर योगी ॥४॥३१॥

॥ इति नामदेव तीर्थयात्रा अख्यान ॥



९ अंभ्रणी आख्यान. ऋग्वेदांतर्गत वागंभ्रणी सूक्तावरून.

साकी–अंभ्राणि ऋषिची कन्या वाणी, परब्रह्म निर्वाणी ॥
"कोठें फिरसी?" म्हणुनी पुसतां, निज महिमा वाखाणी १

अंभ्रणी म्हणतेः—पद [ चाल—मसि बोलु नको गोविंदा ]

मी अकरा रुद्रांसंगें आदित्या मेळवीं ।
विश्वाचे भातुकलीनें देवांना खेळवीं ॥ध्रु०॥
रवि वरुण कडीये घेते । इंद्राग्नी हातीं धरिते ॥
मी विश्वांतिल द्वंद्वांतें । प्रेमानें पाळवीं ॥१॥
मी पाळी सर्वहि देवां । तुम्हि करितां ज्यांची सेवा ॥
कर्मफळांचाही मेवा । मी सकलां चाखवी ॥२॥
याज्ञीक क्रिया जी करिती । मी देत यज्ञ-संपत्ति ॥
मी व्यापुनि सर्वा भूतीं । निज महिमा दाखवी ॥३॥ध्रु०॥
जो प्राणी अन्ना चाखे । कां बोले ऐके देखे ॥
मज सर्वांचि तो संतोखे । सौख्या मी तोषवी ॥ध्रु०॥४॥
जो मला न जाणे प्राणी । तो पडे भवाच्या रानीं ॥
मी सांगे निश्चय वाणी । माझी ही थोरवी ॥५॥
हा अनुभव सिद्धचि सहजा । मी संतत सांगे मनुजा ॥
मी निज इच्छेच्या ओजा ॥ सर्वांना गौरवी ॥६॥
जो प्राणी आवडे मजला । मी ब्रह्मचि करिते त्याला ॥
जो माझा बहुत भुकेला । त्याला मी वाढवीं ॥७॥
खळ पापी ब्रह्मद्वेषी । ऐशांना मारायासी ॥
मी धनुष्य दे रुद्रासी । त्यांच्यावरि कोपवी ॥८॥
भुवनासि आरंभायासी । मी वाहे वायू जैसी ॥
मी पाताळीं आकाशीं । मी उघडी नागवी ॥९॥
निज जनकाची मी आई । मम कुसी समुद्राठायीं ॥
मी व्यापुनि पर्वत राई । भुवना मी जोगवी ॥१०॥

श्लोक— गुरूचे मुखापासुनी येत वाणी ।
दिसे सान पै थोर चैतन्य खाणी ॥
समेटूनि द्वंद्वासि एक्यांत आणी ।
चिदानंद सौख्यांत विश्वा नहाणी ॥११॥

असी वाणि ही आत्मरूपासि दावी।
तिची थोरवी अन्य कोणी वदावी ?॥
कृपेनें मिळे साहजी ज्या नराला।
रिघे तो गुरुब्रह्मणीचे घराला ॥१२॥

इति वागंभ्रणि आख्यान.

## १० सरमा आख्यान ( ऋग्वेदांतर्गत सरमा सूक्तावरून )

दिंडी- गुरू देवांचा बृहस्पती थोर।
छळी देवांना बळी दैत्य शूर॥
बळी-सेवक ते पणी दैत्य चोर।
गुरू-गोधन चोरुनी होत पार ॥१॥

साकी-गुरुदारीची कुतरी सरमा चोरां पाठीं धावे।
अंतरिक्ष ओलांडुनि सत्वर बळिचें नगरा पावे ॥२॥
बळि पाताळीं सरमा येउनि गुरु गुरु ऐसी भुंके।
दुमदुमिलें पाताळ दचकले दैत्य तियेचे हाकें ॥३॥
पणी चोर ते सरमे पासीं करूं इच्छिती मैत्री।
परी तयासी वश न जहाली गुरुदारीची कुत्री ॥४॥

पणी दैत्य सरमेस म्हणतात. पद. चाल—नित्य नवा कीर्तनीं.

"काय तुला आवडे ग सरमे ! आलिस बहु दूर ?।
परतुनि पाहतां मार्ग दिसेना पडला अंधार॥
काय हेतुनें कुणा शोधिसी येथें साचार ?।
अंतरिक्ष सागरा कशी तूं तरलिस गे पार ?॥
काय तुला आवडे ग सरमे आलिस बहु दूर ?"ध्रु०॥१॥

या दैत्यांचे प्रश्नास सरमा उत्तर देते

"सरमा बोले मी गुरु कुतरी, पाठविली इंद्रें।
शोधुनि काढिन तुमचा अवघीं गोधन भांडारें॥

सागर भीउनि शिवला नाहीं माझे पायां रे ।
अचाट शक्ती ऐसी सद्गुरुस्वामीराया रे ” ॥२॥६॥

दैत्य समरेस आशा व भय उत्पन्न करूं पाहतात व म्हणतात.

“सरमे ! कैसा इंद्र गुरू तुज रक्षिल या ठायीं ? ।
दूर येथवर आलिस परतुन वाट तुला नाहीं ॥
आमुचे सदनीं आलिस झालिस आमुची तूं पाही ।
गायी आमुच्या तूंचि पाळुनी गोपति तूं होयी”॥३॥७॥

दैत्यांच्या या बुद्धिभेदास हार न जातां समरेनें प्रत्युत्तर दिलें.

सरमा बोले :-“इंद्र देखणा सर्वांचा साक्षी ।
सद्गुरु पाठीराखा, तत्पद संतत मी लक्षी ॥
तेज तयांचें ब्रम्हांडासी निमिषार्धीं भक्षी ।
इंद्रें वधितां तुम्हां दैत्य हो कोण इथें रक्षी ? ॥४॥८॥

आतां एकल्या सरमेस असंख्य दैत्यांपासून अनेक गोधनें परतविणें अशक्य आहे. असा बुद्धिभेद दैत्य करितात.

दैत्य बोलती :-“सरमे ! असती या चपला गाई ।
स्वर्गांतुनि पाताळिं पुन्हः या येती लवलाही ॥
आम्हा संगें युद्ध न करितां कोण तयां नेयी ?।
तीक्ष्ण आमुचीं शस्त्रें, सरमे ! कोण कसा साही ?”॥५॥९॥

या शुष्क धमकीस सरमा उत्तर देते.

सरमा बोले :-“ चला चोर हो ! बोलाचि हे फोल।
पापी तुमच्या तनू तयांना संत न शिवतील ॥
तुमची चोरी तुम्हांसि चोरुनि नरकीं पचवील ।
थोर हानि ही तुमची, सद्गुरु तुम्हां न भेटेल”॥६॥१०॥

पुन्हः दैत्य आपला दुर्ग अभेद्य आहे असें सांगतात.

दैत्य बोलती :–" गायि कोंडिल्या तो गड दगडाचा ।
साठा तेथें अश्व गायींचा विविधा सुधनाचा॥
तया रक्षितां होउनि आम्ही कळपाचि सापांचा।
सावध आम्ही कदा न साहूं सांचल पायांचा" ॥७॥११॥

"अभेद्यदुर्ग" या शंकेवर सरमा उत्तर देते.

सरमा बोले :–" संत महंता गति सर्वांठायीं।
त्यांच्या दृष्टीपुढें विश्व हें अणुसम जणु राही॥
नाम तयांचें कठिणाहि कोटा भेदी लवलाही।
वचन तुमचें वमना ऐसें रुचे न कवणाही" ॥८॥१२॥

दैत्य सरमेसीं सख्य करूं इच्छितात.

दैत्य बोलती :–"सरमे! तुजला हाकालिलें देवें।
आलीसि येथें, परी नेणसी कैसें परतावें॥
आम्ही तूझें आहोंत बंधू, बहीण तूं व्हावें।
गायी आमुच्या तूंचि पाळुनी दूधहि तूं खावें ॥९॥१३॥

सर्वतः अलिप्त सरमा यावर उत्तर देते.

सरमा बोले :–"बंधू भगिनी मी नेणत नातें।
नातें माझें एकचि सखया सद्गुरु रायातें॥
उघड चोर तुम्हि कसे मूर्ख हो फसवितसा मातें?।
पळा चोर हो गुरु गुरु भुंकुनि पळविन तुम्हांतें" १०॥१४॥

सरमेनें गाईस पाचारण केलें त्या सरशा गाई परतल्या.

दैत्य पळाले, गुरु गुरु गुरु गुरु शब्दाच्या धाकें।
निगड फोडुनी गाइ परतल्या सरमेच्या हाकें॥
किरणापरि गुरुचरणीं आल्या सर्वाहि त्या हरिख।
ब्रह्मानंदीं सहजा सरमा पाळी कौतूकें ॥११॥१५॥

॥ इति सरमा आख्यान ॥



## ११ शबरीचें आख्यान

साकी–शबर नृपाची कन्या शबरी जगतीं धन्य जहाली ।
जन्मा आली, गुरु घरिं ठेली, राम रसायन प्याली ॥१॥

आर्या–शबरी उपवर झाली. लग्नाचा थोर थाट राजपुरीं ।
लेवूनि ध्वज पताका, नाचूं लागे जशी नटी नगरी ॥२॥
आले वनांतरीचे गोंड, शबर, भिल्ल सोहळयासाठीं ।
ल्याले जरि लंगोटी, सर्वांच्या तीर कामठे पाठीं ॥३॥

विवाहापूर्वी मातेसह शबरी दुर्गादेवीच्या दर्शनास निघाली.

आणिति उपायनास्तव पशुपक्ष्यांचे भरूनिया गाडे ।
दुर्गेला बळि देती, रस्त्यावरि रक्त चामडीं हाडें ॥४॥
देखूनि घोर हिंसा, शबरी मूर्छित पडे तिथें धरणीं, ॥
बरळे 'लग्न नको हे.' माय रडे 'केलि हो कुणी करणी !' ॥५॥

शबरीची प्रकृती बिघडली. लग्न रहित झालें. शबरीचा बाप मातंग ऋषीचा अंगारा आणण्यास निघाला.

दिंडी– कंदमूलें घेउनी पुष्पमाला ।
शबर चाले मातंग आश्रमाला ॥
" मीहि येते " बोलली मुग्ध बाला ।
करीं पूजेचा शबरि घेत थाला ॥६॥
पुसे ताता :–" दर्शना पादचारी ।
जातसा ते मातंग कोण भारी ? ॥
राव बोले:–"ते सेविती फकीरी ।
अशिर्वादानें दिली मज अमीरी " ॥७॥

याप्रमाणें पित्याबरोबर मातंग ऋषीचें दर्शनास शबरी येऊन त्या ऋषीचे सेवेंतच राहण्याचा तिनें निश्चय केला. ती आपले पित्यास म्हणते.

दिंडी- म्हणे शबरीः-"संपदा दो दिसांची।
महत्सेवा दुष्प्राप्य वस्तु साची॥
बोल ज्यांचा दुर्लंघ्य देव-देवा।
जन्मवरि मी साधीन संत-सेवा" ॥८॥

शबरीचा निश्चय पाहून ऋषींनीं तिला जागा दिली. व तिचा पूर्वजन्म व पुढलें तिचें भाग्य पित्यास सांगितलें. राजा समाधानानें परतला.

साकी- जन्मवरी यापरी सतीनें गुरुघरिं सेवा केली।
कोटि साधना न मिळें, तें फळ दे गुरुकरुणावेली ॥९॥

मातंग ऋषीचा अंतकाल आला.

मातंग म्हणेः-"शबरे! ही तनु मी सांडितसे आतां।
तुझें दर्शना राघव येइल. निरखी त्याचे पंथा" ॥१०॥

श्रीरामचंद्राची मार्गप्रतीक्षा करीत शबरी मातंगऋषीचे आश्रमांतच सेवा करीत राहिली.

---

पद

श्रीरामा रामरामा! हो श्रीरामा राम रामा!॥
दुबळी शबरी विनवि अनुदिनीं
कधीं भेटसी मंगलधामा?। रामा राम रामा!॥ध्रु०॥

पडले मी या मुनिचें द्वारीं।
आस इथें येशील मुरारी!॥
हिंडसि सावळिया! निष्कामा॥ रामा०॥१॥११

सुकली मम तनु वाहुनि भारे।
जन हे मजला वाळिति सारे।
दर्शन दे रे! नयन-विरामा॥ रामा० ॥२॥१२॥

मधुर फळें हीं नित्य नवि नवीं ।
तुज साठीं मी आणुनि ठेवी ॥
सुकाति फळें सरता हंगामा ॥ रामा० ॥४॥१३॥

मातंगऋषीचे आश्रमास येऊन प्रभू प्रथम शबरीचे कुटीस जातात.

शबरीसाठीं धाउनि आला ।
उष्टीं बोरें खाउनि धाला ॥
वाढवि निज भक्तांचा महिमा ॥रामा० ॥४॥१४॥

श्रीराम मुनीगणांचे दर्शनास जातात.

उपजाति- श्रीराम मातंग कुटीस येतां ।
आनंद झाला सकलां महंतां ॥
प्रभू मुनींद्रा विनवीत तेव्हां :-
"कांहीं वदावी मज योग्य सेवा " ॥१५॥
प्रभूंसि तो मुख्य महंत बोले :-
" तीर्थांत हे जंतु अपार झाले ॥
गमे अम्हा भिल्लिणिच्या विटाळें ।
तीर्था करी शुद्ध प्रभो ! स्वलीलें "॥१६॥

---

भुजंग० स्वभक्तावरी घोर हा आळ आला ।
सले तो उरीं रामराया दयाळा ॥
प्रभू नीरखी भिल्लिणीचें मुखाला ।
पदे वंदुनी ती वदे चित्सुखाला ॥१७॥

शबरी म्हणते:- [ पद चाल-पहिली.]

तीर्थीं नचि मी कधीं नहालें ।
परि म्हणती मी कलुषित केलें ॥
पतीत मी. तूं पावन रामा ! ॥ रामा० ॥५॥१८॥

श्रीराम मुनिगणास म्हणतात.

भुजंग० "नसे रीघ ज्या ज्या स्थळीं प्रेमळासी।
वसौटा तिथें सर्वही कश्मळासी॥
रिघे जेथ मद्भक्त तो पुण्यराशी।
तिथें जान्हवी येतसे पापनाशी" ॥१९॥

असें म्हणून राजा रामचंद्रांनीं शबरीचें चरण त्या तीर्थांत धुतलें. पद चाल—सदर.

शबरी पदरज तीर्थीं धुतले।
तीर्थ सरोवर पावन झालें॥
सहजा ब्रह्मानंदीं प्रेमा॥ रामा रामा० ॥६॥२०॥

॥ इति शबरी अख्यान ॥

## १२ चूडाल आख्यान. पद.

वसिष्ट बोले ऐक राघवा! पुरुषार्थाची चातुरी।
चुडाल सतिची कथा वर्णितां, पावन माझी वेखरी॥ध्रु०॥

गुरू भक्तिनें शब्दासरिसा अनुभव सतिचें अंतरीं।
राज्य कारणीं दंग शिखिध्वज, संशय त्यातें कातरी ॥१॥
सती पतीला वदे "चतुरजी!" राज्य-धुरंधर केसरी।
काय व्यवस्था केलि स्वताची? सांगा मजला सत्वरी" ॥२॥
गजरथ वाजी, पंडित काजी, येइल काजीं कोण तरी?"।
अनुदिनि टोंचणि सलित मना. नृप न कळत सिरला वनांतरीं ३
योगबळें गति न कळे सतिला. ज्ञानदृष्टिचें सामोरी।
सति कनवाळू, यतिवर वेषें शिखिध्वजातें मोहरी ॥४॥
शिखिध्वजातें कुंभक होउनि चुडाल बोधी परोपरी।
स्त्रीभावें जो बोध वाळिला. गुरुभावें नृप स्वीकारी ॥५॥

कुंभक म्हणतोः—

"राज्या परि, तूं जोग घेतला, भोग सारिखा दोनिपरी ।
देह गेह हे जवळीं ठेउनि, त्याग मानिसी वरीवरी" ॥६॥
देह त्यजितां त्याग होत. ही भ्रांति नृपाला सितरी ।
राव घेत मग फास गळयाला. कुंभक सत्वर कातरी ॥७॥
राव पुसे मग "सद्गुरु सखया! त्याग घडे मज कवणपरी?" ।
कुंभक सांगेः—"संग अहंता तुवां घेतली जन्मभरी ॥८॥
सांडि अहंता, सोहं हंसा! ऊड मोकळा चिदंबरीं ।
सद्गुरु बोधा, राहे सीधा, रूप देखरे नयन भरी" ॥९॥

———

बहु सायासें शिखिध्वजातें चुडाल बोधी सुंदरी ।
अद्भुत प्रेमा शिखिध्वजाचें हृदयामाजीं पाझरी ॥१०॥

———

अहा सद्गुरु ! दयाळु माता नसे जगीं कुणि दूसरी ।
स्वानंदाचें ताटीं आपुलें जेवूं घाली परोपरी ॥११॥
शिखिध्वजातें सद्गुरु नेई साम्राज्याचे गादिवरी ।
ब्रह्मानंदीं सद्गुरु माता सहज अम्हां तूं दया करी ॥१२॥

॥ इति चूडाल आख्यान ॥

## १३ पतिव्रता आणि कौशिकमुनि. महाभारतावरून.

साकी— मार्कंडेया पुसे युधिष्टिरः—"मज ऐकावें वाटे ।
पतिव्रतेचें चारित्र, ज्याचे संत गाति बोभाटे ॥
वचना त्या बोला । जेणें मौनाहि ये डोला ॥१॥
पतिव्रता निजपति देवाला पूजित गहन प्रकारें ।
भूजल पवना, संत मुनिगणा, वंदुनि पितरां सारे ॥
अवध्याना वंदी । परि जी संतत पति छंदीं ॥२॥

———

१ पछाडितें.

पोसी गर्भा, सोसी मरणा, कष्टा न गणी प्रेमें ।
मजला वाटे सतिची सरसी नोहे निष्ठा नेमें ॥
वागे संसारीं । नांदे मोक्षाचें पारी ” ॥३॥

धर्मराजाचे या प्रश्नास मार्कंडेय ऋषि कथा सांगतात.

कामदा– मुनि वदे “ यती कौशिकी वनीं ।
तपत. त्यावरी बक बसे झणीं ॥
करूर दृष्टिनें बक मरे क्षणीं ।
सिद्धि बाधली. लाजला मनीं ॥४॥

तप संपूर्ण झालें असें समजून कौशिक यति ग्रामांतरास निघाला. व गांवांत एका ब्रह्मणाचें घरीं भिक्षेस आला.

ब्राह्मणा घरीं पातला यती ।
“ भीक द्या ” असे बोलली सती ॥
वाढण्या अधीं, तोंचि अवचितीं ।
क्षुधित ये घरा तो तिचा पती ॥५॥

पतिसि देखुनी हर्ष निर्भरें ।
पाद्य आसना अर्पि निजकरें ॥
रुचिर भोजना वाढिलें त्वरें ।
पतिसि सेवितां यतिसि न स्मरे ॥६॥

भोजनोत्तर पति विश्रामला, सति यतीस वाढण्या- करितां भिक्षा घेऊन आली. तेव्हां यतीश्वर रागावले.

बहुत जाहला कोप तापसा ।
“ गे सती तुझा धर्म हा कसा ? ॥
नाडिले मला वाढण्या पसा ।
प्रहर लोटला, मी उभा असा ! ” ॥७॥

त्यावर हात जोडून सती उत्तर देते.

बोलली सती " जी यतीश्वरा ! ।
तुम्हि दया करा. भीक ही धरा ॥
कोप कासया दीन लेकरा ? ।
निज रिपूवरी कोप तो बरा " ॥८॥

सतीचें हें उत्तर ऐकून यतीश्वर अधिक क्रोधयुक्त मुद्रेनें तिजकडे पाहूं लागले. त्यावर सति म्हणते.

पद-"ऐक तापसा ! बघसी कैसा ? नव्हे वनांतिल मी बगळी ।
पती सतीचे दैवत साचें, वसेन त्यांचें पदकमलीं " ॥धु०॥

वदे तापसीः-"मी संन्यासी, तूं आहसी घरबारी ।
अव्हेरुनी मज यती अतीता, पतीस कां देसी थोरी ? ॥
भीत अम्हांसी इंद्र नेणसी. दुर्गति विवसी कवटाळी " ।
सती वदे:-" हो. शांति वरा हो ! रोष न राहो मनि मूळीं ॥
ऐक तापसा ! बघशी कैसा ? नव्हे वनांतिल मी बगळी ।
पती सतीचें दैवत साचें, वसेन त्यांचें पदकमळीं " ॥१॥९॥

सर्वज्ञता तुला कसी प्राप्त झाली ? हा प्रश्न कौशिकीनें सतीस केला.

शांत होउनी पुसे मग मुनी :-" हें तव ध्यानीं येत कसें ?" ।
सती बोलली :-" शुद्धमतीमधि बिंबे ज्ञान अनायासें ॥
गुरु सेवेविण, तप सारा शिण, संशय धामिण वेटाळी ।
सद्गुरु सेवा, सुंदर मेवा, भवा दवा घ्या या वेळीं ॥धु०॥२॥१०

यावर कौशिकी प्रश्न करितो, कीं संसारांत पति सेवेनें मोक्ष होईल कसा ?

पुसे मुनी मग " पती सेवुनी कसी पावसी मोक्षगती ?" ।
वदली साध्वी :-" पदिं मन बांधी. भक्ती-बंधन ती मुक्ती ॥

पतिचे सेवें मीपण हरवें पति तो बरवे परि पाळी ॥
तो अवडावा. त्या आवडावें. गती सतीची लडिवाळी " ॥३॥

सति पुन्हां कौशिकी मुनीस सांगते.

"नसेल ठावें तरि तुम्हि जावें. शरण रिघावें व्याधाला ।
व्याध कसायी असो कसाही, सद्गुरु राही तूम्हाला "॥
यती सतीला वंदुनि आला धर्मव्याधाचें जवळीं ।
"सतिमातेनें तुला धाडिले." म्हणे व्याध, त्या कुरवाळी. ॥

कौशिकी मुनीनें विख्यातसंत धर्मव्याधास शरण जाऊन मोक्षप्राप्तीचें साधन विचारलें.

व्याध बोलिला "मोक्षप्राप्तिला उपाय कथिला सद्गुरुनीं ।
न मिळें नेमें, तें द्या प्रेमें. विजनीं न मिळें, द्या भजनीं ॥
सांडुनि स्वबला सति ती अबला गुरुपायाला कवटाळी।
हरिगुरु,गुरुहरि, सुलभ चराचरिं, येत करीं हा प्रेम-फळीं"

धर्मव्याधानें आपले मातापितरांचे सेवेचें साधन कौशिकीस प्रत्यक्ष दाखविलें. याप्रमाणें स्वधर्माचरणयुक्त भक्तीनें मोक्षमार्ग शिकविला.

ब्रह्मानंदी सहजा बोधी :–" भावाचा कुणि देव घडी ।
नावाडी नावेतचि उरला, भक्त तारिले पैल थडी ॥
ब्रह्महि कळलें, इतरा वळलें, नाचि कळवळलें भक्तिबळीं ।
सार्थक पाहतां येत न हातां सद्गुरु माता कनवाळी" ॥६॥१४

इति सतिचरित्र.

## १४ रंगायीचें चरित्र. ( पंचवटी महात्म्य )

पद– हरिगुरु हरी । भवजलांत उद्धरी भवजलांत उद्धरी ॥ध्रु०॥
शुद्ध सती रंगायी. पंचवटिसि नित जायी ।
राम कथा ते ठायीं. नाम वैखरीं ॥ भवजलांत० ध्रु० ॥१॥

हरिदासानें नाममहात्म्य सांगितलें.

भुजंग० हरी श्रीहरीनाम संसार बंधा ।
महा मंत्र हा सद्गुरू देति साधा ॥
त्यजावें दहा येथ नामापराधा ।
जपूनी जपा, ना तरी होय बाधा ॥१॥

न बोला, न ऐका, कधीं संत-निंदा ।
गुरूसी न कीजे अवज्ञा, विनोदा ॥
न कीजे टवाळी कधीं शास्त्र वेदा ।
हरी नामिं कल्पू नये अर्थवादा ॥२॥

न कल्पा कधीं नाम नामांत भेदा ।
न नामाश्रयें आचरावें प्रमादा ॥
न नामा गणावें वृताचें तुकासी ।
न द्यावें हरी नाम तें नास्तिकासी ॥३॥

द्रवे ना कथा ऐकतां जो करंटा ।
वृथा जात गंगेतला गारगोटा ॥
अहंता ममत्वा धरी गर्वताठा ।
जपे कोटि पै, सर्वही होत खोटा ॥४॥

पद– रंगायी श्रवण शुक्ती-कीर्तन तें जल स्वाती ।
बनला मग सुरस मोर्ति,बोध तो उरीं ॥ भवजलांत॥ध्रु०॥५॥
एक दिनीं जव परते, गंगा डोलत भरतें ।
रंगायी मनिं गाते, नाम सुस्वरीं ॥ ध्रु० ॥६॥
स्थिर वृत्ती रामरसीं, ऐन्याची जणुं फरसी ।
गंगाही त्या सरसी, स्फटिक पायरी ॥ ध्रु० ॥७॥
पाचारी एक दिनीं हरिदासा निज सदनीं ।
"स्वामी ! द्या गोड करुनी मीठ भाकरी" ॥ध्रु० ॥८॥

रंगायी पुरिं चाले. परि स्वामी मार्गि भ्याले।
नौकेतुनि मग नेले साध्विनें घरीं ॥ ध्रु० ॥९॥
शुद्ध मती पूजुनिया, तृप्त करी गुरुराया।
पुसाति स्वामिः–"तरलिस या कोवें तूं पुरीं ?" ॥ ध्रु० ॥१०॥
रंगायी कारि विनतीः–"स्वामी मज दिधलि स्थिती।
"प्रभु तुमची बोधोक्ती धन्य ही खरी ॥ ध्रु० ॥११॥

रंगायी म्हणते.

"बुड्डानि स्वता बुडावि जना, ऐशाही पाषाणा।
तारुनि ने कपि सेना, नाम सागरीं ॥ ध्रु० ॥१२॥
भवसागर गहन अती, गंगाही सान किती।
गुरुराया ! निश्चल माति, केलि यापरी ॥ ध्रु० ॥१३॥
ब्रह्मानंद गुरुचरणीं गंगा उसळे भरणीं।
सहज दयेची करणी हर्ष–निभरीं" ॥ ध्रु० ॥१४॥

इति रंगायीचरित्र

## १५ वरद सावित्री चरित्र.

दिंडी– जेष्ट पुनिवेच्या समारंभ आला।
गजर सौख्याचा अयोध्यापुराला॥
उमा बोले अनुसया अहिल्येला।
"चला जाऊं जानकी मंदिराला" ॥१॥
ऋषी पत्न्यांची थोर होत दाटी।
जशा गंगा लोटल्या सिंधु-पोटीं॥
पवित्रांची निर्मळासवें भेटी।
सूख कैसे तें आणिजेल ओटीं ? ॥२॥

उमा म्हणते-"एक सावित्री थोर जगीं झाली।
कीर्ती अजरामर तिनें इथें केली ॥
सर्व सौभाग्या तीच कल्पवेली।
जिचें नांवें पर्वणी ही उदेली" ॥३॥
म्हणे अनुसूया :-" अंध सासऱ्यासी।
दृष्टि आणी सावित्रि गूणरासी ॥
राज्यपद तें साधिलें निर्विनाशी।
धर्म नांदे त्या सतीचें प्रकाशीं" ॥४॥

साकी-म्हणे अहल्या :-" ज्या वाटेनें सावित्री सति गेली।
त्या वाटेनें चाले, तीतें सतिची सद्गति आली" ॥५॥

कामदा- जानकी म्हणे :-" हो अरुंधती।
सांगिजे मला तीच पद्धती ॥
हीच आस कीं माझिये मतीं ॥
होय मी कसी ज्यापरी सति" ॥६॥
" एक जानकी " कथी अरुंधती।
" जीस दीसतो एकला पती ॥
अन्य विश्व हें येइना स्मृती।
तीच ओळखा या जगीं सती ॥७॥
धर्म वागतो जीचिये कृतीं।
शुद्ध चित्त तें सरळ पद्धती ॥
देखतां जिला होत सन्मती।
तीच जाणिजे या जगीं सती ॥८॥

साकी- निर्दय यम तो प्रसन्न झाला, मृतपति पुनरपि दिधला।
सावित्री सदया वर देतां अमरत्वाचि वरि पतिला ॥९॥

दिंडी- जानके! तूं रघुनाथ हिता जागे।
सतीपण तूं सावित्रि पदीं मागें ॥

जन्म जन्मीं सौभाग्य राज्य भोगीं ।
वरदसावित्री देत लागवेगीं " ॥१०॥
॥ इति वरदसावित्री चरित्र ॥

## १६ श्री सावित्री चरित्र.

पद चाल—उत्साहरण.

दमसेन वनवास.

मंगलमूर्ती सत्सुख स्फूर्ती, हरिहर गुरु माउली ।
सावित्रि सत्य पावली ॥ध्रु०॥
शैलराज दमसेन. स्वामिनी, सुप्रसन्न सगुण. ।
जना जीव प्राण पोषण ।
दहा सहानीं कहार केला, राज्यभार हिसकुन ।
काढिले हाय! लोचन. ॥
सती गरोदर, पती हीनधन, अती ताप पावुन ।
हिंडती दीन वनवन ॥
वनीं तपोधन मुनी शांतमन. पुनीत हरिपूजन. ।
त्या गेले लोटांगण ॥
ईश दयाघन नश्वर घेऊन, सत्संगति दीधली ।
सावित्रि सत्य पावली ॥१॥

ऋषि आश्रम वर्णन.

ताड माड पोफळें नारळें, फणस आम्र जांभुळें ।
ही छाया, खाया फळें ॥
कदंब चंपक बकुल मोगरा, गुलाब रातोत्पलें ।
प्रिय तुलसीवन कोवळें ॥
मयूर रावें, हंस सारसे, कारंडव, कोकिळे ।
हरि आळविती मंजुळें ॥

प्याया न्हाया झुळझुळ गंगा, नेसाया वल्कलें ।
आसनें शुभ्र कांबळे ॥
सदा सुखाची हरी सख्याची, प्रीत मनीं लाधली ।
सावित्रि सत्य पावली ॥२॥

सत्यवानाचा जन्म.

नवम मास लोटला देविला, देव जसा भेटला ।
नवभक्ती रस दाटला ॥
प्रेमरवी सन्मुख प्रगटला, शीणभाग आटला ।
सज्जना कृष्ण भेटला ॥
अरुंधती अनुसुयादि सकला, ऋषिपत्नी प्रेमळा ।
पान्हया पूर लोटला ॥
बाळ पाळण्यामधें सजाविला, " सत्यवान " गाइला ।
हा अल्पायू, परिभला ॥
"सत्य अमर" ही मार्कंडाची भाक मना भावली ॥
सावित्रि सत्य पावली ॥३॥

सत्यवानाचें उपनयन.

शीलरूप सद्गुणें लाडका, मधु-हित-मित बोलका ।
आवडे सत्य सकलिका ॥
सप्तम वर्षीं, संत महर्षी, लेववितो मौंजिका ।
करि संध्या त्रैकालिका ॥
दंड कमंडलु कुंडल कौपिन, यज्ञसूत्र मुद्रिका ।
त्या काय वर्णूं कौतुका ! ॥
सावित्री गायत्री जपतप, यांतचि सुख बालका ।
पितरांना भजतो सखा ॥
सदा सुखाचा सुकाळ नांदे, संतांचें मंडळीं ।
सावित्रि सत्य पावली ॥४॥

मद्रराजास सावित्री देवींचें वरदान.

मद्रराज शिरताज अश्वपति, गुणगण गणिजे किती ।
परि तया नसे संतती ॥
यम नियमासन प्राण संयतीं, ध्यान समाधी वृत्तीं ।
सावित्रि पूजिली सती ॥
प्रसन्न देवी बोले मग ती, "जी इच्छा सांग ती" ।
तव मागे "दे संतती "॥
" मीच कन्यका होइन देइन, तुज सुतशत मागुतीं " ।
मग राव करी सन्नुती ॥
या धरतीवर भक्तीकरितां, सावित्री धावली ।
सावित्रि सत्य पावली ॥५॥

सावित्रीचा अवतार

राव राणि आले एकांता, नयनांतरिं पाहतां ।
उरीं अमृत विद्युल्लता ॥
मास त्रय श्रवणीं सुखवार्ता, चवथा तो लोटता ।
सोहळया डोहळे स्वतां ॥
सती-मनोदय सुफलित होतां, वाणि नुरे तत्त्वता ।
सुख कोवि येत वर्णिता ॥
पूर्ण कालिं अवतरली दुहिता, चैतन्यामृतलता ।
वर-सावित्री देवता ॥
दुमदुमिला आनंद. तोरणें, गुढिया उभराविलीं ।
सावित्रि सत्य पावली ॥६॥

सावित्री उपवर झाली.

अखिल जगाची ब्रह्माणि माता, सावित्री अवचिता ।
ही अश्वपतीची सुता ॥

राजीवाक्षा सद्गुण सरिता, सुंदर ललितस्मिता।
लाजविते वैवस्वतां॥
अणूमात्र इज कुणी पाहतां, होई कृतकृत्यता।
वाढली देखदेखतां॥
उपवर कन्या जणु कनकलता, कोणि नये मागता।
चिंतातुर झाला पिता॥
भास्वर नवरी न वरी कोणी, वृत्ती काचावली।
सावित्रि सत्य पावली ॥७॥

सावित्रीचें वर शोधन.

चिंतातुर देखुनी स्वपितरां, बोले गुण सुंदरा।
"मी शोधी निज नोवरा" ॥
दळ भारासह जंगल नगरा, धुंडुनि ये मंदिरा।
तव नारद आले घरा॥
वंदुनिया नारदा नृपवरा, बोले " मम अंतरां।
सत्यवान वरिला खरा॥
धीरोदारा राजर्षिवरा, शूरा प्रिय चातुरा।
मन दिधलें करुणाकरा।
अखंड सेवा मेवा, देवा! वृत्ती लाचावली " ।
सावित्रि सत्य पावली ॥८॥

सावित्रीचा निश्चय.

नारद बोले "बरें न केलें, देवी तूं चित्कले!।
मन मरणाराला दिलें॥
एका कालें गुणगण सगळे, मंदिर हें कोवळें।
सोडुनी सत्य हा पळे "॥
राव बोलिला :-" राजस बाळे! शोधि दुसरीं स्थळें।
पाहतां सर्वही मिळे "॥

सावित्री बोलली :-" स्रोकलें, एका मन एकलें ।
तें दिलें, नये घेतलें ॥
निमिषार्धाचे सत्संगासी मुक्ती खालावली "।
सावित्रि सत्य पावली ॥९॥

सावित्रीच्या लग्नाची तयारी

निश्चय चिंतामणी पाहुनी, बोले नारद मुनी ।
" शुभ कार्य करा या क्षणीं"॥
मंत्री ऋत्विज राव घेउनी, ब्राह्मण सौभागिनी ।
चालिला दळासह वनीं ॥
कुडुम् कुडुम् डुम् मृदंग गाणी, झांज झणण झंझणी ।
जंगलीं मंगल-ध्वनी ॥
गज रथ घोडे सवार सेनी, गर्जति अक्षौहिणी ।
"शिव शंकर कात्यायनी !"॥
आश्रमवासी थक्कित झाले, ऐकुनि मंत्रावली ।
सावित्रि सत्य पावली ॥१०॥

वाग्दान.

विनवि अश्वपति द्युमसेनासी, " सावित्री लाडसी ।
तू सून घेइ राजसी " ॥
द्युमसेन वदे " आम्ही उदासी, वनवासी तापसी ।
राहणी मानवे कसी ? " ॥
राव वदे " सत्यास्तव सातिसी, यांतचि आहे खुषी ॥
कासया फार चौकशी ?" ॥
सावधान वर वधू सुखासी, सावधान मुनिऋषी, ।
हर्षले सर्व मानसीं ॥
"जय सत्या! जय जय सावित्री !" वर्षे सुमनावली ।
सावित्रि सत्य पावली ॥११॥

विवाह

सन्मुख वर-वधु ऐक्य प्रकटें, वरि सज्जन सद्भटे।
मेळविती अंतर्पटें ॥
करां धरुनि सप्तपदी वाटें, लाजाहुत गोमटें।
देखतां सौख्य राहटें ॥
लाडू गुरुवळी पूरण साठे, सुरस सार चांखटें।
सेवितां चित्त नाचि विटें ॥
शांति पुष्टितुष्टीची ताटें, दिधली सकळा लुटें।
आदरें आग्रहें हटें ॥
विहिणी बहिणी नागर सुगरिणी, मधुर विनोदावली।
सावित्रि सत्य पावली ॥१२॥

मांडव परतण

यथा विधीनें वस्त्राभरणें, मानापरिचीं धनें।
दीधली बहू आंदणें ॥
सत्यवान सावित्री सगुणें, चंद्रावरि चांदणें।
परतले राव पाहुणे ॥
अलंकार त्यागुनी भूषणें, नेसलि वल्कल जुनें।
सुख पति सरसें नांदणें ॥
सत्यध्यानें रमे चिंतनें, सकलांचीं ही मनें।
बाळा परि सांभाळणें।
अति विनयानें प्रियंकर-हृदयीं, जागा बळकावली।
सावित्रि सत्य पावली ॥१३॥

सावित्रिची नांदणूक

रवी न उगतां गृहा सारवी, पति श्वशुरा जागवी।
न्हापुनी वस्त्र नेसवी ॥

झळ झळ झारीं भरी जान्हवी, जेथिल तेथें ठेवी।
भोजनीं वाढवी चवी ।
सुगंध चंदन हस्तें लावी, पुष्पहार लेववी ।
मधु वाणीनें तोषवी ॥
चरणा सेवी, श्वशुरा सुखवी, एकांतीं रंजवी ।
प्रियकरा प्रीत अभिनवी ॥
क्रिया सुमंगल मानस निर्मल, वाचा बोधावळी ।
सावित्रि सत्य पावली ॥१४॥

पतिव्रत

खेळावि सारी सौख्य सागरीं, हास्यमुखी बाहिरी ।
उरिं नारद-भाकित सुरी ॥
काळ पातला. चिंतित निजहरि, तीन निशावासरीं ।
ती एका पायावरी ॥
साधावी आज ही अखेरी, चरण वंदुनी शिरीं ।
स्तविलें गुरु करुणास्वरीं ॥
"सुत-सौभाग्यवती हो चतुरी, आणिक इच्छा वरी"।
" मज सोसेनापति दुरी "॥
प्रियवर जे जे पाउलि चाले, व्हावे मी साउली" ।
सावित्रि सत्य पावली ॥१५॥

वनास सत्यवान सावित्री जातात

"बरे गोजिरे!" सासुसासरे, बोलति अति आदरें ।
"जा, येई पतिसह त्वरें" ॥
वंदुनि पितरें मुनिगण सारें, जात वनीं लेकुरें ।
धरि सती पतीला करें ॥

सत्य वदे " सखये! नृपकुमरे! उपवासी सुंदरे! ।
रुचतील पदीं कंकरे " ॥
सती वदे " सखया गुण शौरे! तव उपवासीं खरें ।
पद रुचें प्रेम अंकुरे " ॥
ललित विनोदें सुस्थिर छंदें ग्लानी मंदावली. ।
सावित्री सत्य पावली ॥१६॥

वनविहार, सतिपति संवाद

"सरू देवदारू मांदारू केदारू सुरतरू "
"वारिती सुमन चामरू " ॥
" वदे चकोरूः- हरि गिरिजावरू " "प्रेमळ तूं पुष्करू ।
तुज गाती हे सुस्वरू " ॥
"मोर समोरू पुच्छ उभारू काय इच्छिती करू? " ।
" तुज पाहे नयनीं भरू" ॥
करी विहारू अति सुकुमारू परि अंतरि कातरू ।
जाईल प्राण पांखरू ॥
दुखू नये पति ह्मणूनि वारि वारि शांती बोलावली ।
सावित्रि सत्य पावली ॥१७॥

यम येतो

फळें फुलें पति भरितो दुरडी, घे इंधन तातडीं ।
तव काळिज तें धडधडी ॥
वदे सखे " सर्वांग कडकडी. " अंकीं टाकी कुडी ।
नयनासि येत झांपडी ॥
हाय! हाय! सति ऊर तडाडी, कैसी आली घडी! ।
यम मूर्ती भीषण खडी. ॥
समयीं घेई धीर साबडी. बोले हळु बोबडी ।
" आपणा काय आवडी?" ॥

पति पायातें चिंतुनि बोले धर्मासी सावळी ।
सावित्रि सत्य पावली ॥१८॥

यमाचा पाठलाग

काळ बोलिला " सते ! पतिहिते ! हरितों मी जीविते ।
कैसें तरि तू पाहि तें " ॥
पाश घालुनी जीवा ओढी, चाले निज नगरिते ।
भेसूर कलेवर रितें ॥
शवा ठेविलें धरणी वरतें, " रक्षी वनदेवते ! " ।
धावली यमा मागुते ॥
यम बोले " सावित्री ! परते, साधी आखेरिते ।
ऊरलें रीण सारि तें " ॥
पति पायाचें बळें यमासी बोलू सरसावली ।
सावित्रि सत्य पावली ॥१९॥

पहिला वर सासऱ्यास दिव्य दृष्टि. सावित्री म्हणते.

" कोठें माझा भर्ता नेसी ? तरि तो मम मानसी ।
मम धर्म-चरणसौरसीं ॥
सप्तपदीं सख्यत्व सतासी, धर्मा जरि ऐकसी ।
वनवास न दुःखद मसी ॥
आत्म्या करिता जन उपवासी, संन्यासी तापसी ।
मम आत्मा तव तुजपसी ॥
एक सत्य धर्माचें मागें जाती मुनिगण ऋषी ।
वाट अन्य मज कायसी ?" ॥
धर्म वदे " वर घे ! " " श्वशुरा दे, नयनाची उज्वली" ।
सावित्रि सत्य पावली ॥२०॥

दुसरा वर सासऱ्यास स्वराज्य मागते.

यम बोले "शीणसी राजसा ! श्वशुर होय डोळसा " ।
"पतिजवळ शीणतो कसा ?" ॥

पती गती मज सत्य परियसा, दोघे एकारसा।
यावरी प्रेम आरसा ॥
लव भर सज्जन संगति सुरसा, मुक्तिवरि दे ठसा।
सत्संग जगीं सारसा ॥
संत समागम सुफल भरवसा, सत्संगीं तुम्ही असा "।
यम वदे "माग पाडसा!॥
"श्वशुरा हरिलें राज्य प्रजा दे धर्माची सावली"।
सावित्रि सत्य पावली ॥२१॥

सावित्री तिसरा वर पित्यास पुत्रप्राप्ती मागते.

"दिले राज्य सासऱ्या परत जा!" "यमराया सूर्यजा!।
नेतोसी नियमें प्रजा ॥
काया वाचा मनें भूतजा संत न देती इजा।
कृपादानें देती रजा ॥
जशासि तैसे मानव सहजा. परि संतांची मजा।
शत्रुला दया ही सजा ॥
सत्य संत-पद मधुर पूर्वजा!" यम बोले "आत्मजा!।
तुज काय देऊ वारिजा?" ॥
"ताता सुत शत द्यावे सत्वर सात्त्विक सुंदर बली!"।
सावित्रि सत्य पावली ॥२२॥

सावित्री चवथा वर स्वतःस पुत्रप्राप्ती मागते.

"परते, दिधले शतसुत बापा, आलिस बहु दूर पा"।
"मी पति सन्निध लोलुपा॥
वैवस्वत आगळा प्रतापा, धर्म कल्पपादपा!।
मम तापाते हारपा ॥
स्वतावरी विश्वास न सोपा, संतापाठीं लपा।
मागिजे संतपदकृपा ॥

विश्वावरि संता अनुकंपा. संतीं हरिला जपा. ।
सत्सेवा अधिक तपा "॥
"होउ कसा उतरायी माते!" "हो सद्गुंशावळी" ।
सावित्रि सत्य पावली ॥२३॥

सावित्री संत स्तुती करिते

"शत वार तुझे येइन पोटीं, नव्हसी तूं धाकुटी ।
करि कृपा केलि चावटी!"॥
"धर्मा! संताचि पाठीं पोटीं, नव्हाति बरें वाइटीं ।
सत्संग नव्हे फलकटी ॥
निर्भय रस संताचें तारीं, सूर्या देती दिठीं ।
ठेविती जगा हतवटी ॥
निराभिमानी संत नचि हटी, परोपकारी झटी ।
सत्कृपा नव्हे वांझटी ॥
सत्य संत रक्षी सर्वांसी." माउलि पान्हावली ।
सावित्रि सत्य पावली ॥२४॥

सावित्री वर [ पति ] मागते.

"माय माउले! बोध अभिनवा, पीयूषाचा खवा ।
तूं माग वरा ये धवा "॥
"मागु वरा, तरि वर दे देवा, सत्यवान वाचवा ।
कां हरिलें माझें जिवा ?॥
तुज कां रुचते माता विधवा? सुत होशिल केधवा ?।
कां मालविसी हा दिवा ?॥
मोक्ष धर्म ही काय करावा ? पति वाचुनि शिवाशिवा ।
नेणते उमा-मा-धवा ॥
सत्य राखिसी धर्मा! ही तरि, तूझी ब्रीदावळी " ।
सावित्रि सत्य पावली ॥२५॥

सत्यवानास देऊन यम अदृश्य होतो.

यम बोले :-"मम आत्मा धाला, सत्यवान सोडिला ।
पति घेउनि जावे स्थळा ॥
येइन शतधा तव उदराला, उद्धरिलें तूं कुळा ।
तू शोभा भूमंडळा" ॥
देह पतीचा जेथें ठेविला, आली मग प्रेमळा ।
अंकावरि कुरवाळिला ॥
हंस उडाला परतुनि आला, सत्यवान जागला ।
तों काळ गुप्त जाहला ॥
स्वप्नींचा बागुल यम स्वप्नीं, भीती लोपावली ।
सावित्रि सत्य पावली ॥२६॥

सत्यवानाचा शोक.

सत्य वदे :-"ही अघटित करणी, कोणाची साजणी ?।
माउली गुरूवाचुनी ॥
वाढविले प्रेमामृत पाजुनि, म्हणती कीं अनुदिनीं ।
तूं दीप अम्हां लोचनीं ॥
कसा पसरलों तयां विसरुनी, झाली बहु यामिनी ।
ने त्वरें मला भामिनी ॥
शोकें आतां लोळति धरणी, प्राणा त्यजिती क्षणीं ॥
तरि काय मला वाचुनी ?॥
माय ! बाप ! गुरु !" टाहो फोडी, साति ही भांबावली ।
सावित्रि सत्य पावली ॥२७॥

द्युमसेनाचा शोक.

"उगी दयाळा ! रात्र अघोरी, झाले मी घाबरी ।
आश्रमा चला सत्वरी" ॥

वाम बाहु घेई खांद्यावरि, बिलगे उजव्या करीं ।
पति वदे "भीति ही बरी" ॥
आले डोळे दमसेना. परि वृत्ति बहू बावरी ।
सुत पाहूं डोळे भरी ॥
धुंडिती कुंजीं वापी विहिरी, धीर नये अंतरीं ।
ऋषि हुडकिति नाना परी ॥
"हे सत्या ! सावित्रे !" ही ध्वनि जंगलिं पैसावली ।
सावित्रि सत्य पावली ॥२८॥

आश्रमास आले.

मुनिसुत म्हणती :- "आले आले, नवल आजि वर्तलें ।
रवि-बिंब निशीं प्रगटलें ॥
सावित्री सह सत्य उदेले." सुत-सुन-मुख पाहिलें. ।
सकलांसी सुख जाहलें. ॥
मृदंग वीणा ढोल कहाळें गोविंदा गाइलें, ।
जन हरिजागारिं जागलें ।
प्रातःकाळीं मंत्री आले, दमसेना विनविलें :- ।
"स्वाराज्य करा आपुलें ॥
सत्यवान सावित्रीसह तुम्हि, नांदा निज राउळीं "।
सावित्रि सत्य पावली ॥२९॥

दमसेनास अभिषेक.

वसिष्ट गौतम अत्रि अंगिरा, अभिषेकिति नृपवरा ।
गंधर्व गाति अप्सरा ॥
सावित्रीसह सत्य साजिरा, जोडुनि दोन्हीं करा ।
युवराज दिसे गोजिरा ॥
हळद कुंकवें फळें शर्करा, वाटिती परस्परा ।
ऋषिपत्न्या शुद्धांतरा ॥

वसन गोधनें तुरे फुलवरा, दिधलें नारीनरा।
पूजिलें ऋषीमुनिवरा॥
हरिदासांचें घरीं सुखाची दसरा दीपावली।
सावित्रि सत्य पावली॥३०॥

सावित्री महिमा.

सावित्री ही सती माउली, करुणेची कोवळी।
शांतीची निज साउली॥
यमपाशांतुनि करी मोकळी, दृष्टी दे सोवळी।
ठेवीत राज्य सोहळीं॥
संतांनां वाढवी सुकाळीं, सत्याची आपळी।
सौभाग्य दीप पाजळी॥
ब्रह्म सहज आले उदयाचळिं, विलसे सन्मंडळीं।
परमार्थ-प्रेम-परिमळीं॥
सौभाग्यवती मागे बाळीः-जागा पायातळीं।
सावित्रि सत्य पावली॥३१॥

आशीर्वाद.

सावित्रीची कथा पावनी, ऐका हो! साजणी।
सौभाग्य-सौख्य-दायिनी॥
देइल संपति विपुल अनुदिनीं, संतति सुंदर गुणी।
ही अमृत-संजीवनी॥
सुरस कथा ही भावी वाणीं, सर्व-सौख्य-कारिणी।
सावित्री व्हाग जनीं॥
सर्व सार रत्नाची खाणी, देइल तुमचा धणी।
निज हृदयाचें दर्पणीं।
निर्मळ प्रेम तुम्हाला लाभो, बाळीला माउली।
सावित्रि सत्य पावली॥३२॥

आरती.

जय देवी सावित्री जय ब्रह्मणिमाते ।।
सत्याचे सुख-दयित जय जय निज शक्ते ॥ ध्रु० ॥
जय देवी जय देवी ॥
अवतरली अवनीवरि अश्वपतीबाला,
विनयानें यम जिंकुनि प्रियकर सोडविला ॥
पितयाते सुत दिधले, वैभव श्वशुराला,
प्रीतीचे रीतीनें उद्धरिलें सकलां ॥ १ ॥
तुजला तुलना नाहीं मात या जगतीं,
"जन्म सावित्री" तरि तव नामें होतीं ॥
संतति संपति मुक्ती भाग्याची भक्ती,
तव चरणीं बाळीला तळहातीं येती ॥ २ ॥

इति सावित्री चरित्र.

## १७ चोखामेळयाची समाधी.

साकी–मंगळवेढ्याचा तट बांधी बेदरचा सरदार ।
कार्य तडीला न्यावें म्हणुनी मेळविले बेगार ॥
चोखा ही आला । साथीं अडल्या कामाला ॥१॥

दिंडी संत चोखा माहरा सर्व कामा ।
करी, पळभर ही बसेना रिकामा ॥
मना माजीं ठेविलें विठ्ठलाला ।
वैखरीनें फेरिली नाम–माला ॥२॥
चार माहिनें बांधिली थोर भिंत ।
ढांसळे ती त्यावरी अकस्मात ॥
बहुत बेगारी होत चूर तेव्हां ॥
त्यांत चोखा अर्पितो प्राण देवा ॥३॥

म्हणे चोखा " विठ्ठला ! विठाबायी !।
आस माझी, तनु वसो तुझे पायीं ॥
पडे मी येथें तटाच्याचि मूळीं ॥
कसी लागे मज संत-चरण-धूळीं ? " ॥४॥

असें म्हणून विठ्ठलनामाचें गजरांत चोखोबानें प्राण सोडिला

भुजंग– अता पंढरीमाजिं श्री पांडुरंगा ।
मिळाले बहू संत, सिंधूस गंगा ॥
पुसे नामजी:–" केशवा! सर्व आले ।
परी एकल्या चोखया काय झालें ? " ॥ ५ ॥

पद–विठ्ठलासि गहिंवर आला । सांगती नामदेवाला ॥ध्रु०॥
"मम सखा बीज चित्सुखा, चिरडला फुका, तटाचें मूळा।
नामया! जाइ झडकरी, आस्थि सावरी, आणि पंढारिला"॥१॥६॥

भुजंग– मृतांच्या मिळाल्या तनू पंचभूता ।
कसें पारखावें कुणीं तेथ संता ? ॥
पडें नामदेवासि हें गूढ कोडें ।
पुसे पांडुरंगासि लाजूनि कोडें ॥७॥

नामदेव म्हणतात:—

पद– " हृषीकेशा, आस्थि फारशा, ओळखूं कशा ?
घोर हा मजला " ॥
हरि म्हणे:–" विठ्ठल-ध्वनी, पडे तव कानिं,
वेचि त्या फूला " ॥
विठ्ठलासि गहिंवर आला ॥ ध्रु० ॥ १ ॥ ८ ॥

भुजंग० परेपार जो रंगला रामनामीं ।
अधींचाचि श्रीराम त्या रोमरोमीं ॥
पुढें देह हा जेथ पंचत्व पावे ।
अणू गाति नामासि पूर्वस्वभावें ॥९॥

परेहूनि हो सूक्ष्म त्या दिव्य गाना ।
निरे भक्त ते ऐकती दिव्य कानां ॥
असा शब्द देतांचि भक्ता कराला ।
पुन्हा घोष व्यापीत सर्वांतराला ॥१०॥

पद-परिखुनी, नामया अणी अस्थि, हरिधणी पसरि पदराला ।
अंजळीं हरीहर गजर, गर्जे अंबर, भक्तजन मेळा ॥३॥११॥

नामदेवांनी अस्थि निवडून आणिल्या आणि पांडुरंगास निवेदन केल्या, तेव्हां अस्थींतून नामघोष झाला तो सर्व संतांनीं ऐकिला.

ठेवितो अस्थि महाद्वारिं, भक्त कैवारी, संत जिव्हाळा ।
रखुमाइ राहि आरती-दीप उजळिती, गाति गोपाळा॥४॥१२॥

॥ इति चोखामेळा समाधि आख्यान ॥

## १८ देवाची भक्तावर फिर्याद.

श्लोक-"त्वं मे" "ऽहंमे" "कुतस्तत् ?" "तदपि तव कुतो ?"
"वेद मूल प्रमाणात्" ॥
"एतच्चानादि सिद्धादनुभवविभवात्"
"तर्हि साक्रोश एव" ॥
"क्वाक्रोशः ?" "तत्रगीतादिषु मम विदितः"
"कोऽत्र साक्षी ?" "सुधीशः" ॥
"हंत त्वत्पक्षपाती स." इति नृकलहे ।
"मृग्य मध्यस्त्वदीयम्" ॥१॥

भुजंग- असूनी बहू घोर दीर्घ प्रवासीं ।
घडे पंढरीमाजि येणं जिवासी ॥
पुढें आत्मधार्मीच ठेवूं तयासी ।
अशी लालसा जाहली केशवासी ॥२॥

श्री पांडुरंग म्हणतात :–" त्वं मे"

पद चाल–सुनरी सखी पियारी०

श्रीपांडुरंग बोले देखूनि या जिवासी।
" माझाचि तूं जिवाजी ! चल येइ माझेपासी " ॥१॥३॥
हें नावडूनि बोले हा जीव केशवासी।

जीव म्हणतो:–"अहं मे"

" तुजवीण मी विठोबा ! नाहीं बरें उपासी ॥२॥४॥
श्रीमंत तूं म्हणूनी बळकाविलीसि थोरी।
अटकाविण्या असें मीं काधिं काय केलि चोरी ? ॥३॥५॥
मी न्याय नीति जाणे, न करी परासि हेवा।
माझी स्वतंत्रता कां खुपते तुम्हासि देवा?" ॥४॥६॥

आतां देव जीवास पुरावा विचारितात " कुतस्तत् ? "

" मी मी अणीक माझें ऐशा स्वतंत्रतेसी।
संपादिलें कधीं तूं? तुझि काय ही मिराशी?" ॥५॥७॥

त्यावर जीव प्रतिप्रश्न करितो " तदपित्वकुतो ? "

" मी धुंडुं कां म्हणूनी लेखा पुरावियासी ?।
द्यावे प्रमाण लेखा, हें भाग वादियासी ॥६॥८॥
जरि मी असेन तूझा, तरि सिद्ध तूं करावें॥
मी स्वस्थ येथ माझा. मजला नको परावे " ॥७॥९॥

आतां श्रीपांडुरंग आपलें प्रमाण पुढें मांडितात व म्हणतात
" देवमूल प्रमाणात् "

"जरि मागसी प्रमाणा, देखे प्रमाण–मूला।
माझाचि जीव ऐसा वेदामधें कबाला[1]" ॥८॥१०॥

यावर त्याची अयुक्तता व अपूर्णता जीव सिद्ध करितो:–
" एतच्चानादिसिद्धादनुभवविभवात् "

---

१ रोखा.

" मी निर्मिलें न वेदा. लिहिला कुणीं न ठावें।
ऐशा अनादि लेखां मानूं कसें पुरावें? ॥९॥११॥
किति लोटलीं युगें तीं कुणि नेणतीच कांहीं ॥
मद्वत्त कांहिं रोखा वेदीं नसेल पाहीं ॥१०॥१२
तारीख वार नाहीं, ऐसा जुनाट रोखा ॥
लिहिला कुणी ? म्हणूनी घेताति लोक शंका ॥११॥१३॥
पहिलें असेल कांहीं, पाठीं अणीक झालें. ॥
व्याकरण तर्कटानें हलवीन तेविं हाले ॥१२॥१४
बाहेर मुद्दतीच्या रोखा तुझा असे हा ॥
आतां कलींत वेदा कोणी न मानिती बा ! ॥१३॥१५॥
म्हणसील देवराया ! निमिषार्ध ही न झालें ॥
तूझें, तरी भगोट्यानें येथ न्याय चाले ॥१४॥१६॥
तूझा नव्हेसि तूं, ही तुज नाहिं भ्रांति झाली ॥
मीही तसाचि माझा, राहीन कल्प-कालीं " ॥१५॥१७

भक्त आपला अनुभव भोगवटा सांगतो.

"कल्पापासून मी ही घेतों अखंड फेरी ॥
किति कोटि योनिमाजीं ! स्मरतांचि येत घेरी ॥१६॥१८॥
संपादितों धनासी, अशुभाशुभा प्रकारें ॥
भोगीत मी ! भगोटा माझाचि तो पहा रे ! ॥१७॥१९॥
होतो तुझा तरी कां मज धाडिलें विदेशीं ? ॥
मत्कर्म संचिताला पाहूनि सोकलासी ! ॥१८॥२०॥
तूझाचि तूं आहेसी, तूं आपणासि पाहे ।
माझाचि तेविं मी, हें अनुभूति सिद्ध आहे" ॥१९॥२१॥

आतां यावर श्रीपांडुरंगरायास प्रमाणांतर दाखविण्याची आवश्यकता दिसल्यावरून पुन्हः म्हणतात.

"तर्हि साक्रोश एव" "ममगीतादिषु विदितः"

" बारे ! कठोर ऐसे बोलूं नको, कदापी ।
गीता पुराण बोले, माझाचि जीव लोकीं ॥२०॥२२॥

ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः

सर्वा युगीं पुकारा मी हा अखंड केला ।
माझाचि तूं म्हणोनी, माझाचि राहि ठेला " ॥२१॥२३॥

त्यावर हा जीव श्री पांडुरंगास विचारितो "काक्रोशः ? कोत्र साक्षी ?"

" केला कधीं पुकारा ? मीं नाहि ऐकिला कीं ।
कीं ऐकिला जयानें, साक्षी न मी विलोकीं ॥२२॥२४॥
माझा न लेख कांहीं. तूझाचि तो पुकारा ! ।
श्रीमंत पांडुरंगा ! नीती तुम्ही सुधारा " ॥२३॥२५॥

श्रीपांडुरंगराय आपले साक्षीस पुढें करितात.

" कोऽत्र साक्षी?" " सुधीशः "

"साक्षी सदाशिवातें पाहे शिरावरीं रे ! ।
गिरिजा सुबुद्धि हीचा पति हा चराचरीं रे !" ॥२४॥२६॥

यावर पुन्हः हा जीव साक्षीची अयोग्यता सांगतो.

" हंत ! त्वत्पक्षपाती सः " इति

" श्री पांडुरंगराया ! उन्मत्त साक्षि आहे ।
तुमचेंचि नांव घोकी. चरणोदकांत नाहे ॥२५॥२७॥
लाचाविला तुम्ही जो उघडाचि पक्षपाती ।
साक्षी असे म्हणूनि दावाल काय भीती? ॥२६॥२८
वरि एकलाचि भंगड भोळा येत न कामा ॥
साक्षी असेल दूजा, ठेऊं नये रिकामा ॥२७॥२९॥
चवदाहि रत्न टाकी, हालाहलोंचि तोषे ।
शिवनाम जो वदे त्या कैवल्य देत हर्षें ! ॥२८॥३०॥
निजपत्नि राक्षसातें जो देत, लाज नाहीं ।
तूम्हींच सोडवील पूर्वीं पुन्हा तिला ही ! ॥२९॥३१॥

भस्मासुरासि जेव्हां वरदान देत भोळा ।
तूम्हींच पार्वतीचा तो रक्षिला जिव्हाळा ॥३०॥३२॥
उत्पात सांब मांडी जेव्हां वरप्रदानें ।
निस्तारितात सारे तेव्हां तुम्ही शहाणे ॥३१॥३३॥
ऐसा अतीत जोगी वरि हा अबोलका जी ! ।
माझे वितंडवादा येईल काय कार्जीं ? ॥३२॥३४॥
साधीन आशुतोषा जरि एक बेलपानें ।
" माझाच मी " असें हा बोलेल कीं सुखानें ॥३३॥३५॥
शिणलासि देवराया ! वाहूनि यासि माथा ।
साक्षी नसेचि दूजा. करिशील काय आतां ?" ॥३४॥३६॥

आतां रोखा साक्षी इत्यादि प्रमाणें जेव्हां या वादांत निर्बल ठरलीं, तेव्हां शपथेचाच एक उपाय राहिला.

मज मर्कटासि ऐसें पाहूनि नाथ भ्याला ॥
सुकुमार सावळ्याच्या वदनासि घाम आला ! ॥३५॥३७॥
थकतां उपाय सारे शपथ प्रमाण होई ।

श्रीपाडुरंग म्हणतात.

"माझा नव्हेसि ऐसा शपथेसि आजि घेई ॥३६॥३८॥
झालासि स्तब्ध कां रे ? आतां असा उदासी ? ।
तूं प्रेमपात्र माझा. माझीच तूं मिरासी " ॥३७॥३९॥

तेव्हां मी नाथाचा नाहीं असी शपथ न घेतां या जीवानें देवासच शपथ घेण्यास प्रवर्तविलें.

हा जीव म्हणतो:-

"घेशील काय राजा ! शपथेसि या प्रसंगीं ? ।
कीटामुळेंहि नाथा ! येशील काय रंगी ? " ॥३८॥४०॥

श्रीपांडुरंग नाथाचा पक्ष सत्य असल्यामुळें शपथ घेण्यास सिद्ध झाले.

**कनवाळु माय कान्हा शपथेसि सिद्ध झाला !।**
**वासुदेव देवकीसी टाकूनि शीघ्र आला ॥३९॥४१॥**
**कौमोदकी सुदर्शन शारंग बाण भाले।**
**द्वारावतींत शस्त्रागारीं तसेचि ठेले ॥४०॥४२॥**

शपथ घेतांना श्रीपांडुरंगराज निरायुध होऊन पंढरीस आले.

**एका करांत पद्मा एका करांत शंखा।**
**घेऊनि पातला हा वारावयासि शंका ॥४१॥४३॥**
**टाकूनि येथ आला परिवार राज्य सारे।**
**रखुमाइ राहि भामा येताति पाठिमोरे ॥४२॥४४॥**

श्री पंढरीस देवाच्या पाठीमागें राही, रखुमायी, सत्यभामा आल्या. सत्कला देवी रखुमायी देवास म्हणते:—

**" हें काय आजि नाथा झालें तुम्हासि देवा ?।**
**निजभान नाहिं. माझी चुकली असेल सेवा " ॥४३॥४५॥**

चित्कला देवी सत्यभामा देवास म्हणते:—

**" रूसकी सदा हटेली खटियाळ ऐसी कांता।**
**फसवूनि मिष्ट बोलें जाताल काय नाथा ? " ॥४४॥४६॥**

आनंदकला श्री देवी राधा म्हणते:—

**"रासांत एकलीला मजला कृतार्थ केलें।**
**तें चित्त आजि नाथा! कोणीं हिरूनि नेलें ? " ॥४५॥४७॥**

याप्रमाणें प्रभूच्या दिव्यशक्तींनीं हटकलें तेव्हां भक्तवत्सल श्रीपांडुरंगराय म्हणतात. "मृग्यमद्यस्त्वदीयम् ! "

**" ब्रह्मांड ही लयाला जावो कुणी न राहो !।**
**माझाचि भक्त माझ्या प्रेमामृतांत नाहो! ॥४६॥४८॥**

साञ्चित सुधा ! फिरा जा आज्ञा अशीच माझी ।
तुम्हि अंतराल मातें जरि आड याल काजीं ॥४७॥४९

देव शपथ घेतात.

श्रीसंत-पाद-पद्मा स्नापूनि शंख-तोयें ।
पुजूनि याचि पद्में शुभ आजि बोलतों हें ॥४८॥५०
तुमचा न अंकिला मी, जा आपुलेच वाटां ।
मद्भक्त एक माझा सर्वस्व आप्त साठा ॥४९॥५१
त्याचीच आण वाहें त्यातेंचि मी न्यहाळीं ।
सर्वस्व मी तयाचा राहें अकाल-कालीं" ॥५०॥५२॥

देव भक्त उभयतां शपथ घेतात.

"माझाचि तूं सख्या रे ! तूझाचि मी त्रिवाचा ।
वाचाहि खुंटलीसे सुत सर्व माधवाचा" ॥५१॥५३॥

॥ इति देवाची भक्तावर फिर्याद ॥

---

## १९ श्रीजगन्नाथ पुरुषोत्तम क्षेत्र-यात्रा.

स्कंदपुराण पुरुषोत्तम खंडावरून.

### १ पुरुषोत्तम क्षेत्रदर्शन.

अभंग- सद्गुरुची दया । व्यक्ती आणीत सखया ॥
चैतन्याची काया । पांघुरला चैतन्य ॥१॥
सद्गुरु पाहिला । तोचि डोळा गुरुनें दिला ॥
द्रष्टा दर्शन सोहळा । दावि रूप लावण्य ॥२॥
गुरु भावाचा भुकेला । धांवे आर्तिचे हाकेला ॥
माय सद्गुरुचा केला । सहज ब्रह्मीं अनन्य ॥३॥

ओवी- गुरु माउली पूर्णकाम । फिरवी यात्रा चारी धाम ॥
पुरीमाजीं पुरुषोत्तम । दाविला डोळां ॥४॥

**सर्वांभूतीं पुरुष क्षर। कूटस्थ आत्मा अक्षर॥**
**पुरुषोत्तम ह्या परात्पर। सद्गुरु रावो ॥५॥**
**ऐसा सद्गुरु वसूनि जवळीं। कां फिरवितो रानोमाळीं॥**
**कथा सांगे गुरु माउली। परिसावी संतीं ॥६॥**

पातंजली मुनी आणि व्याघ्रपाद राजा यांची आख्याइका

**उपजाति- पातंजली व्याघ्रपदा नृपाला।**
**प्राकाम्य सिद्धी कथि योगलोला॥**
**इच्छा-तनू पाउनि राव डोले।**
**कृतार्थ झालों समजूनि बोलेः- ॥७॥**

प्राकाम्य सिद्धीनें इच्छित देह प्राप्त करून घेण्याची शक्ति आली असें वाटून राजा श्रीगुरूस म्हणतो.

**"जे देहिं जासी गुरु देव राया!।**
**येईन तेथं तुजला वराया"॥**

श्रीगुरु पातंजलीस व्याघ्रपाद राजाचा हर्षवेग फोल वाटून ते त्यास म्हणतात.

**"बोले मुनी गर्व करी अपाया।**
**बुद्धी नसे सिद्धिमधें खपाया॥ ॥८॥**

पातंजल सूत्रः–ते समाधावंतराया व्युत्थाने सिद्धयः योगसिद्धी समाधीस विघ्नें आणि व्युत्थान कालीं सिद्धी आहेत. पुन्हां पातंजल व्याघ्रपादास प्राकाम्य सिद्धीचें निष्फलत्व दाखवितात.

**"प्राकाम्य सिद्धी दिधली विधीनें।**
**जीवासि, ती कोटि तनू मधीं ने॥**
**ती काय दावी गुरुमाय जीवा?।**
**दया गुरुची गुरु जो दिसावा"॥ ॥९॥**

पुन्हां पातंजल व्याघ्रपादास म्हणतात.

भुजंग- "जसी पक्षिणी अंतरिक्षीं पिलाला।
तसा सद्गुरू लक्षितो बालकाला ॥
पशू जातमात्रा जसा अंधलोला।
तसा जातमात्रासि जीवा न डोळा" ॥१०॥

तेव्हां याची प्रचीति पाहण्याकरितां राजानें देहांतरें धारण केलीं.

शार्दूल० होतां राव विहंग, श्येन बनुनी पातंजली त्या धरी।
होतां वानर, राव ये गिरिदरीं श्रीनाथसिंहा करीं ॥

याप्रमाणें विहंगम आणि कपि दोनी मार्गांत श्रीगुरुनें राजास पकडिलें, तेव्हां राजा मीन झाला, व श्रीगुरु जलरूप झाले, परंतु राजा श्रीगुरूस ओळखूं शकला नाहीं.

झाला मीन प्रचंड राव, भटके एकार्णवीं सागरीं।
देखेना जलरूप सद्गुरु, जरी व्यापी सबाह्यांतरीं ॥११॥

सद्गुरुचें दर्शन होईना तेव्हां :

कामदा-दीन होउनी राव रडे। "मीनमी गुरू केंवि सांपडे ?" ॥
श्रीगुरू तया दावि रूपडें। आर्तिला दया भूत रोकडे १२

याप्रमाणें शिष्य जेव्हां दीन झाला, तेव्हां दयाळू सद्गुरुनीं त्यास दर्शन दिलें.

---

ओवी-हाचि आशय व्यास मुनी। निरोपिती स्कंद पुराणीं ॥
जे ब्रह्मदेवा लागुनी। श्रीहरि गुरु दिसेना ॥१३॥
सृष्टिभार संत्रस्त विधाता। भवतरणाची पाउनी चिंता॥
स्तवी हरीसी आर्तचित्ता। जगन्नाथा! सगद्गुरो! ॥१४॥

ब्रह्मदेव श्रीहरीस आळवीतो

दिंडी- "कुठें वससी, मज सांग गुरुराया!।
देइ लोचन मज तूजला पहाया ॥

तुझे पाया पावण्या हो सहाया।
होइ सन्मुख निज खूण दाखवाया" ॥१५॥

साकी-ऐकुनि दीन विधीची वाणी, मोक्षाचा वरदानी।
जगन्नाथ पुरुषोत्तम क्षेत्रीं, विधिला हरिगुरु आणी ॥१६॥

ब्रम्हदेव त्या पुरुषोत्तम क्षेत्रीं येतांच त्याला तेथें एक चमत्कार दिसला.

विधी बघे तो काक भुशुंडी रोहिणि तीर्थी नाहे।
मार्जनमात्रें विष्णु-दर्शनें रूप चतुर्भुज लाहे ॥१७॥

---

आर्या-काका स्वरूप मुक्ती मिळतां आश्चर्य वाटलें विधिला।
बोले रमा:-"उणिव ती मुक्तीची कायशी कृपानिधिला?" १८

श्री रमादेवीनें ब्रम्हदेवास काकाच्या स्वरूप मुक्तीचें कारण समजाविलें. रमादेवी म्हणते:-

इंद्रवज्रा- "पदार्थ मात्रा जधिं जीव पाहे।
पदार्थ रूपासि लवांधि लाहे॥
जो नाथ जीवांत ठिवी कला हे।
तद्दर्शनें जीव अभिन्न राहे ॥१९॥
कला दिली ही हरिनें जगाला।
करीतसे तन्मय पाहत्याला॥
देवूनिया भोग-सुखा-लवाला।
लावीत जीवासि नवा भवाला" ॥२०॥

ही सर्व साधारण कला सर्व जगास भक्तां अभक्तांस श्रीहरीनें दिली. तोच श्रीहरी गुरुरूपानें अद्भुत दया करितो, याविषयीं रमादेवी सांगते:-

भुजंग० "गुरूची दया याहुनी फार मोठी।
स्वरूपींच ठेवीत दृष्टीसि दृष्टी॥

पिला माउली साठवी नीज पोटीं ।
कधीं ही न संसार सिंधूंत लोटी" ॥२०॥

पूर्वपद अभंग
सद्गुरुची दया व्यक्तीं आणीत सखया० इ० ॥

इति जगन्नाथ क्षेत्र महात्मे पुरुषोत्तम क्षेत्र दर्शनं नाम
प्रथमा कथा



## २० श्रीजगन्नाथ क्षेत्रमहात्म्ये २ ( यम पराभव )

अभंग- हरि गुरु ज्याचे डोळां । वसे विश्वा तो निराळा ॥१॥
सद्गुरुचे ठायीं । कळि काळा रीघ नाहीं ॥२॥
हरि गुरुचा अंकित । सहज ब्रह्मासी खेळत ॥३॥

काकपक्षी मुक्ती पावला. इकडे यम काक शोधनास निघाला.

ओवी-काकाचें काकत्व सुटें । काळिमा हरपे पहाटें ॥
तेथ कवण कां कोठें भेटे । आटे कवण ? ॥४॥

यम पुरुषोत्तम क्षेत्रांत येऊन कावळ्याचा शोध करीत असतां इंदिरा विमलादेवीचें त्याला दर्शन झालें.

साकी-येत अचानक यम ते ठायीं काकगती हुडकाया ।
वदे इंदिरा विमला माया "हरि पायासि पहा या ॥५॥

विमलादेवीनें यमाचे शंकेचें निरसन केलें.

दर्शनमात्रें चुकावि अपाया, करि चैतन्याचि काया ।
हरिचे दारीं मुक्ती चारी जीवा येति वराया ॥६॥
जगन्नाथ गुरु मुक्ती दाता अर्पि स्वताते भक्ता ।
यमा इथें नाहीं तव सत्ता, फिर यमलोका परता" ॥७॥

नंतर यमानें पुरुषोत्तम क्षेत्राची विशेष मर्यादा विचारिली.

दिंडी- करी संयमनी-पती मम विनंती ।
"दया माउलिची, जिरविली महंती ॥
क्षेत्र पुरुषोत्तम ! नेणत मी कीर्ती ॥
हरीगुरुनें मज दाविली प्रतीती ॥८॥
वसे पुरुषोत्तम जगन्नाथ-नामा ।
तयत क्षेत्राची मला वदा सीमा ॥
सोडुनी मी मग तया सौख्य-धामा ।
अन्य लोकां दंडीन यमा नेमा" ॥९॥

याप्रमाणें यमानें आपला अधिकार कोणते मर्यादेंत चालणार नाहीं असें विचारिले असतां विमलादेवीनें पुरुषोत्तम क्षेत्राची सीमा सांगण्यास आरंभ केला. आधीं रोहिणीकुंड कल्पवट व मार्कंडेय ऋषीस बालमुकुंद-दर्शन यांचें वर्णन केलें. अदमासें दोन गज लांब, एक गज रुंद, दीर्घ वृत्ताकार, अर्धांगुल खोल, असें नील पाषाणाचें रोहिणीकुंड श्री जगन्नाथ क्षेत्रांत मुख्य तीर्थ आहे.

उपजाति रमा वदे:-"एक सखोल बोली ।
अर्धांगुली रोहिणिकुंड खोली ! ॥
जगल्लया लाट इथूनि आली ।
जगत्प्रभातासि इथं निमाली" ॥१०॥

जगत्भान समयीं हें रोहिणीकुंड कोरडेंच आहे. या कुंडांतून जेव्हां झरा उचंबळेल तेव्हां जगाचा लय होईल. आतां अशा कुंडांत स्नान विधी कसा संभवतो, हें रमादेवी सांगते.

"कृपा जलां घालिती विप्र लीला ।
त्या मार्जनें काकांहि मुक्त झाला ॥
हा लेश बिंदू करुणा जलाचा ।
करीतसे नाश मनोमलाचा" ॥११॥

आतां कल्पप्रलयाचा प्रसंग सांगतांत.

" नाथा कृपा जैं भरपूर दाटे ।
त्रिश्वाकृतीची जवनीक फाटे ॥
मार्कंड ऐशा प्रलयीं, पहाटें ।
देखे गुरूनाथ कसा रहाटे ॥१२॥"

प्रलयार्णवाच्या लाटांत स्वतः वाहात असता मार्कंडेय ऋषींनीं अपूर्व व अद्भुत बालक पाहिलें.

साकी-करकमलानें पदकमलातें मुखकमलांतरिं चाखी ।
मनमोहन त्या बालमुकुंदा मार्कंड ऋषी निरखी ॥१३॥
निश्वासासह ऋषी प्रवेशे बालमुकुंदा उदरीं ।
स्तवूं लागला देखुनि तेथें ब्रम्हांडांच्या हारी ॥१४॥

नासदीय सूक्त ऋग्वेद मं.१० अ.११ सू. १२९

इंद्रवज्रा- असत् मुळींचें नुगलेचि कांहीं ।
स्वतंत्र सत्ता नसतां सता ही ॥
सृष्टी कुठें? व्योमचि जेथ नाहीं ।
नाथा! नमो श्रीवटपत्रशायी! ॥१६॥
होतें कुठें विश्व? कुणा अधारा?।
सिंधूहि कोठे गहना गभीरा? ॥
मृत्यू नसे, कां अमृता बढायी?।
दयार्णवा! श्रीवटपत्रशायी! ॥१७॥
रात्रंदिसाचा नुगला सुगावा।
परात्परू अन्य दुजा नठावा ॥
स्वशक्तिनें नांदतसी स्वठायीं ।
श्रीप्राणनाथा वटपत्रशायी! ॥१७॥
तमासि जेथें गिळिलें तमानें ।
प्रमेय नेणां, नसती प्रमाणें ॥

शोभे गुरुत्वें स्वयमेव सांयी ।
सिद्ध स्वयें श्रीवटपत्रशायी ॥१८॥

गुरू तुला आवडि जें उदेली ।
विस्तारिली प्रेम मुळासि वेली ॥
अहं समूळीं वितळूनि जायी ।
तैं पावसी श्रीवटपत्रशायी ॥१९॥

गोडी तुझी भक्तिसि येथ ओढी ।
दोहींकडे ही शिवशक्ति जोडी ॥
भक्तानुरक्ता भव-मोक्ष-दायी ।
तूं मायबापा ! वटपत्रशायी ॥२०॥

सांगा अहो ! संत दयार्द्रदृष्टी ।
कोठूनि झाली कधिं येथ सृष्टी ? ॥
देवादिकांना न पडेल सोयी ।
कृपासुधाब्धी वटपत्रशायी ॥२१॥

ही सृष्टि जेथूनि भवासि आली ।
केली तुवां ही अथवा न केली ॥
तूं जाणसी ब्रह्माणि-नाथ-मायी[१] ।
कीं नेणसी, श्रीवटपत्रशायी ॥२२॥

विमलादेवी यमास क्षेत्राची सिमा सांगते.

साकी- "मार्कंडेया बालमुकुंदें दाखविला निजमहिमा ॥
हा वट, तेथुनि प्रलयसमुद्रा या क्षेत्राची सीमा ॥२३॥
शंखाकार असे ही जागा. शंखनाभिचे भागां ॥
प्रणवरूप पुरुषोत्तम श्रीहरि कल्पवटातळिं जागा ॥२४॥

---

१ मायी—मायानियंता.

अष्ट भैरवींचीं नांवें.

अनुष्टुप्- विमला, मंगला, शर्वा, अर्धांशी, कालरात्रिका ।
चंडा, मरीचिका, लंबा, भैरवी येथ अष्टका ॥२५॥

अष्ट भैरवांचीं नांवें.

साकी—कमाल-मोचन, रुद्र, यमेश्वर, मार्कंडेश्वर, शंभू ।
नीलकंठ, ईशान, वटेश्वर, भैरव आठ स्वयंभू ॥२६॥
जगन्नाथ गुरु मुक्तीदाता आर्पि स्वतातें भक्ता
यमा इथें नाहीं तव सत्ता, फिर यमलोका परता" ॥२७॥

यम जगन्नाथास व देवीस नमस्कार करून परतला.

यापरि धाडि यमा यमलोका, रमा वारि भवशोका
माय साहजी दावी सद्गुरु पुरुषोत्तम, अवलोका ! ॥२८॥

इति श्री पुरुषोत्तम क्षेत्रे यम—पराभव नाम द्वितीय कथा ॥

---

## २१ जगन्नाथ क्षेत्र ३ विद्यापति यात्रा

अभंग—कास बांधुनी बळकट । धावा हरी सन्मुख नीट ॥
ठेवा पुढें एक पाय । धावत येइल सद्गुरु माय ॥१॥
येथ आर्तीचीच चाड । सहज ब्रह्मानंदीं जोड ॥२॥

ब्रह्मदेव इंद्रादिक देवांसह जगन्नाथाची पूजा करीत होता, त्याची माहिती जगास पुढें इंद्रद्युम्नराजाकडून झाली.

साकी- इंद्रद्युम्न अवंती नृपती, निशिदिनिं करि हरि भक्ती।
निज आचरणें प्रजाजनातें लावितसे नय नीती ॥५॥

श्रुति-स्मृती-परिशुद्ध पद्धती हरिगुणिं रंगलि वृत्ती
विनवी राजा संतसमाजाः-"दावा जी हरिव्यक्ती" ॥६॥

इंद्रद्युम्नराजा विद्वत्सभेंत प्रार्थना करितो.

पद-"कोठें सांगा हरि, भुवनीं? । दावा पुरुषोत्तम नयनीं ॥ध्रु०॥
साधन शम-दम-संपत्ती । तार्किक नैय्यायिक युक्ती ॥
हो कां अणिमादिक शक्ती । किंवा निष्क्रियता मुक्ती ॥
जोंवरि हरि न दिसे व्यक्तीं । पोषटपंचांच्या उक्ती ॥
हरिविण ओस दिसे अवनी । दावा पुरुषोत्तम नयनीं"॥१॥७॥

इतक्यांत राजसभेंत श्रीशंकर जटिल वेषानें प्रगट झाले.

दिंडी- आर्त वाणी परिसुनी जटामौली ।
नृपा सान्निध प्रगटला तये काळीं ॥
म्हणे " ऋषिकुल्या तटीं सिंधु कूलीं ।
असे पुरुषोत्तम देव याचि वेळीं " ॥८॥

जगन्नाथाचें वर्णन

" हरी सखयाची प्रणवरूप मूर्ती ।
नीलमणि-सान्निभ धवल हास्यकांती ॥
कृपादृष्टीनें तूर्ण देत मुक्ती ।
वरी निर्हेतुक हृदयिं देत भक्ती " ॥९॥

श्री शंकर अंतर्धान पावले

साकी-यापरि सांगुनि अदृश्य झाला, चटक मनीं रायाला ।
विनवी नृपति उपाध्यायाला:-"या पाहुनि देवाला" ॥१०॥

इंद्रद्युम्न राजाचा विद्यापति नामक पुरोहित श्री जगन्नाथाचें दर्शनास निघाला. त्याला वाट माहित नसतांही सरळ श्रीजगन्नाथाकडे धावला.

आर्या-हरि देखण्या पदाती विद्यापति धावला पवन-वेगें ।
पाइक असा असावा ! नामासरसाचि जो स्वरूपा घे ॥११॥

नसतां ही नभिं सडका, निज-नीडा विहग ओळगे तडका ।
कीं प्रेमाचा धडका, दावाया मार्ग घेइना अडका ॥१२॥
अडकाठि भूमिकेची हरि-सन्निध यावया कुणा नाहीं ।
भक्त पथातें नेणों, परि हरि ओढीत आपुले ठायीं ॥१३॥
ज्याचें उरिं हरि दाटे, त्याला गुरु नेतसे सुलभ वाटें ।
विद्यापति-श्रम-हरणा पंथीं विश्वावसू शबर भेटे ॥१४॥

जगन्नाथक्षेत्राचा मार्ग जाणणारा विश्वावसु शबर विद्यापतीस वाट दाखवीत, ब्राह्मण थकला असें पाहून म्हणतो.

दिंडी- म्हणे विश्वावसु " द्विजा ! घे विसावा ॥
सेवि मेवा. मी करिन चरण सेवा " ।

त्यावर विद्यापति म्हणतो.

येरु बोले :-"हरि नयनिं मज दिसावा ।
जीव हरि पायातळीं मग बसावा " ॥१५॥

विद्यापति म्हणतो. पद–चाल पहिली.

"हरिची भूक मला लागे । काय ती पक्वान्नें भागे ? ॥
न्या मज हरिसंन्निध वेगें । इतुकें काज तुम्हा जोगें ॥
हरि मज पाहिल अनुरागें । निवतिल माझीं सर्वांगें ॥
मातापितावंधुबहिणी ! । दावा पुरुषोत्तम नयनीं " ॥२॥१६॥

---

वसंत० नीलाचला शबर ने द्विजसत्तमाला ।
बोले :-" पहा ! हरि हरीत रजातमाला " ॥
नीलेंद्र-संन्निभ महापुरुषोत्तमाला ।
देखूनि शीण पथिचा अवघा निमाला ॥१६॥

विद्यापति शबरास वंदन करितो.

मालिनी- हरिसम शबराचें विप्र वंदी पदातें ।
नयनिं हरि दिसाया पाय जे दीप-दाते ॥

हरिपद सुरभाचें दावितां कौतुकासी ।
उतरलि तुळसी ही श्रीहरीचें तुकासी ॥१९॥

विश्वावसु शबरानें विद्यापतीस श्री जगन्नाथाचा प्रसाद दिला.

पृथ्वी- प्रसाद हरिचा मिळे, दुरित मोह चिंता गळे ।
प्रपंच पट मावळे, मन हरी-पदाब्जीं वळे ॥
निमे विषय-क्षुल्लता, हृदयिं भक्ति-विद्युल्लता ।
समाधि सहजीं सता-सह कथेमधें डुल्लता २०

॥ इति विद्यापति-यात्रा नाम प्रस्थान तृतीय कथा ॥

## २२ श्री जगन्नाथ महात्म्य ४ इंद्रद्युम्न प्रस्थान

अभंग- तेची धन्य पाय । सदा हरीकडे जाय ॥
तेची धन्य वाणी । रमे हरिगुण गानीं ॥
तेची धन्य वृत्ती । हरीला जे निवेदिती ॥
ब्रह्मानंद बीज । वेली उगवली सहज ॥

विद्यापति जगन्नाथ-दर्शन घेऊन उज्जयनीस परतला. इतक्यांत वाहटूळ येऊन जगन्नाथ पुरुषोत्तम आच्छादित झाले.

साकी- विद्यापति पुरुषोत्तम-दर्शन घेउनि परतुनि आला ।
तोंचि गलबला अद्‌भुत झाला, वाहटुळ जाय अभाळां ॥५
हिरण्यरज अमरांचे नयनीं, हरिसि न देखति कोणी ।
बोले धन गंभिरा वाणी आइकत्याचें कानीं ॥६॥
" अतउत्तर हरि न दिसे कोणा, निमुटचि वंदा स्थाना ।
निशिदिनिं भजतां, देइल दर्शन पुनरपि इंद्रद्युम्ना " ॥७॥

इकडे उज्जयनीचें वर्तमान

वसंत— विद्यापती त्वरित उज्जयनीस आला ।
अर्पी नृपासि हरिदत्त-प्रसाद-माला ॥

पावूनि विष्णु हृदयस्थित-सौरभाला ।
प्रेमांबुधींत नृप निश्चलसा निमाला ॥८॥

साकी-हरि देखाया भूप भुकेला, पीळ पडे हृदयाला ।
म्हणे भाग्य आलें उदयाला, हरी दिसे कीं डोळां ! ॥९॥
ऐशा उल्हासाचें वेळीं, वीणास्व करिं चिपुळी ।
नाचत हरिगुण-गण-कल्लोळीं, नारद मुनि ये जवळीं ॥१०॥

नारदमुनि इंद्रद्युम्नाचें सभेंत येतांच सर्वांस आनंद झाला.

शालिनी- इंद्रद्युम्ना थोर आनंद झाला ।
वेळोवेळीं वंदुनी नारदाला ॥
बोले-"दावा सद्गुरू ! पंथ सोपा ।
हातीं द्या जी भक्तिमार्ग-प्रदीपा" ॥११॥

नारदमुनि भगवद्दर्शनाचा उपाय सांगतात.

आर्या-नारद राया बोधाः-"हरिपदिं निश्चय तिला म्हणू बुद्धी ।
श्रीहरिला आराधी ती विद्या, इतर त्या कळा, व्याधी ॥१२॥
भावें हरिगुण गावे, हरिविण इतरा जगा न देखावे ।
दास्यत्वीं विचरावे, हरिभक्ता हरि समान लेखावे ॥१३॥
भक्तीच एक ऐसी पंच-क्लेशा समूळ ही नाशी ।
दुष्कर तपासि दुर्लभ तो हरि वश होत हीन दीनाशीं" १४

इंद्रद्युम्न नारदमुनीस प्रश्न करितो.

दिंडी— पुसे नृपतीः-"नारदा ! कवण काळां ।
नाथ पाहिन मी जिवाचा जिव्हाळा ?"॥
म्हणे नारदः-"सुमुहूर्त हीच वेळा ॥
याचि देहीं बघ हरी याचि डोळां" ॥१५॥

इंद्रद्युम्नानें सर्व प्रजेस निघण्याची आज्ञा केली.

साकी-"चला प्रजाजन, माल खजाना द्या संचित क्रियमाणा ।
गुंडाळा बिस्तरा बिछाना, आळस हरितो प्राणा ॥१६॥

जगन्नाथ होइल संतुष्टी, पाहिल दयार्द्र दृष्टीं ।
चला करूं सखयासह गोष्टी. राहो जावो सृष्टी !" ॥१७॥

तेव्हां श्रीजगन्नाथ दर्शनास सर्व अवंतीचे प्रजाजन निघाले.

पद–चाले नारदमुनि सामोरी। हरि हरि हरि वाचें ललकारी ॥धृ०॥

जेष्ट शुद्ध पंचमि बुधवारीं । पुष्य सुलग्नीं होत तयारी ॥
दुमदुमींत भजनाचे गजरीं । नाचत जाय नृपाची स्वारी ॥
राजाज्ञेची दौंडी नगरीं । वाजति नौबद मृदंग भेरी ॥
"चला प्रजाजन पाहुं मुरारी। वसूं सदा हरिचे सेजारी" ॥१॥१८

क्षत्रिय वैश्य वणिज बाजारी । पुराणीक हरिदास पुजारी ॥
गायक नट नर्तक सहकारी । सुतार शिंपी पट-रंगारी ॥
गौंडी पाथरवट वंजारी । स्वैपाकी वाढपि पाणेरी ॥
जी जी ज्यांची वृत्ति चाकरी । बिनचुक कीजे हरि-दरबारीं ॥
२॥१९॥

शेतकरी तेली पिंजारी । पाटिल रामोशी पटवारी ॥
सुखवस्तू नौकर सरकारी । भंगी न्हावी भांड भटारी ॥
मूक आंधळा पंगु भिकारी । हरिविण कोण सखा कैवारी ? ॥
कुटिल असो कीं खळ अविचारी। देत हरी सकलासि सिदोरी ॥
॥३॥२०॥

कोळी गारोडी डोंबारी । वकील वेश्या मैंद जुगारी ॥
वाटवधा भुरटा खाणोरी । शीघ्र चला हो हरि सामोरी ॥
बुरी भली कीं लहान थोरी । हरिला दावा कला हुशारी ॥
खरा परीक्षक दाता भारी। शीण तयाविण कोण निवारी? ४-२१

———

दौंडी ऐकुनि नगरी सारी । निघे सत्वरीं नील पर्वती ॥
सहजीं आपआपली वृत्ती । हरिसी निवेदण्यातें जाती ॥

हरिची ठेव हरीला देती । निष्ठा तैसें फळा पावती ॥
सद्गुरुनाथ जया पाचारी । भाग्याचा सहजचि अधिकारी ॥
॥५॥२२॥

---

पृथ्वी- प्रजाजन ! चला चला, त्यजुनि संपदा चंचला ।
सुजात नर तो भला हरि पदांबुजीं पोंचला ॥
हरी न मिळतां जरी पथिंच प्राण हा वेंचला ।
करील करुणा हरी सदय संपदें संचला ॥२३॥

॥ इति श्रीजगन्नाथ यात्राया। इंद्रद्युम्न प्रस्थान चतुर्थी कथा ॥

## २४ हरिहर अभेदरूप भुवनेश्वर वर्णनम् ५

अभंग- पाहू जातां हरी । साक्षी शिव हा सामोरी ॥१॥
वंदूं आधीं या शिवाला । मग पावूं केशवाला ॥२॥
हरिनाम संकीर्तनीं । डोलतसे शूलपाणी ॥३॥
हरीहराची जी भेट । सहजीं ब्रह्म मूळपेठ ॥४॥

---

अवंती नगरापासून प्रजेसह इंद्रद्युम्न राजा पुरुषोत्तम जगन्नाथ क्षेत्राकडे जात असतां त्यास वाटेंत भुवनेश्वर क्षेत्र लागलें.

---

ओवी-उत्कल देशाची सीमा । रक्षिते चर्चिका भीमा ॥
देवी रुंडधारिणी शामा । इंद्रद्युम्नें वंदिली ॥५॥
पुढें पातलें धातुकंदर । चित्रोत्पला महानदी तीर ॥
कटका पैल भुवनेश्वर । एकाम्रवनीं गुप्त काशी ॥६॥

अनु० भुवनेश्वरीं सदा पूजा, तेथें जंगट वाजती ॥
नाद तो श्रवणीं येतां पातकें सर्व भाजती ॥७॥

साकी-भुवनेश्वरिं हरिहर एकांगे विलसाति कीर्तन रंगें ।
सज्जन संगें मन हें गुंगे, दश-इंद्रिय-गति भंगे ॥८॥

भजन पूजनाचा नाद राजास ऐकूं आला.

दिंडी— ध्वनी रुणु झुणु ऐकुनी राव बोले:-।
" नाथ पदिंचे हे वाजताति वाळे! " ॥
वदे नारदः-"हें क्षेत्र गुप्तकाशी ।
येथ भुवनेश्वर हरिहरा प्रकाशी " ॥९॥

ओवी-इंद्रद्युम्न पुसे वृत्तांत । "न कळे गुप्तकाशी हा संकेत ॥
कैसा हरिहर प्रकाशे येथ?" । कथा सांगे मुनिराज ॥१०॥

भुवनेश्वर क्षेत्र कसें स्थापित झालें याविषयीं नारदमुनि इतिहास सांगतात.

साकी-करी काशिपति उग्र तपासी, तोषविलें सांबासी ।
परि रायाची बुद्धि तामसी, मागे पाशुपतासी ॥११॥

श्री विश्वेश्वर वर देत असतांना काशी राजास म्हणाले.

इंद्रवज्रा प्रसन्न बोले शिव काशिराजा ।
" घेवोनिया पाशुपता घरा जा " ॥

त्यावर काशीराजा म्हणतो

राजा वदे :-" पाशुपतास्त्र देवा ॥
दिलेंसि मी जिंकिन वासुदेवा ॥१२॥
कृष्णासवें युद्ध करीन थोर ।
पाचारुनी दानव दैत्य घोर ॥
निर्दाळुनी निर्बल संत सारे ।
लुटीन विश्वासि घनांधकारें" ॥१३॥

विश्वास घातानें काशीराजा पाशुपतास्त्र घेऊन श्री कृष्णांशी युद्ध करण्यास प्रवर्तला तेव्हां श्री विश्वेश्वर म्हणाले.

साकी-सांब म्हणे :-" वरिलेसी दारुण, त्याचें फल तूं भोगी ।
फकीर मी फक्कड वैरागी, तुझिये राज्या त्यागी " ॥१४॥

दिंडी "वरी पूजा केलीस फार राया।
परी मम हृदया काय रे! चिराया॥
हाय कृष्णा! तुज तोंड कसें दावूं ?।
तुला नाचि बघतां विरह कसा साहूं ?" १५

काशी सोडून श्रीशंकर जगन्नाथपुरीजवळ एकाम्र वनांत श्रीकृष्णाचें ध्यान करीत रेहिल. त्याक्षेत्रास भुवनेश्वर संज्ञा आली. श्रीशंकर म्हणतात.

पद— गुप्तही काशी, ही प्रकाश अविनाशी।
हरीहर येती एक रसीं ॥ध्रु०॥
सदाशिव बोले :–"हरि सखया घननीळा!
कहर हा तुजवरि मी केला॥
सत्व तव ध्यातां, तुज ध्यातां मी धवळा
मम गुणें कृष्णा! तूं काळा॥
पशुप मी भोळा, तूं पशुप नंदवंशीं"
हरीहर येती एक रसीं ॥ध्रु०॥१॥१६॥

ओवी- वैतागें सांब निघाला। एकाम्रवनीं विश्रामला॥
तोंचि हाहाकार झाला। काशी माजीं अकस्मात् ॥१७॥

इकडें काशीराजानें श्रीकृष्णाबरोबर, युद्ध आरंभिलें व प्रथमच द्वारकेवर पाशुपतास्त्र सोडिलें.

शार्दूल० सोडी पाशुपतास्त्र काशिनृपती रेखूनि कृष्णावरी।
तें जाणूनि निघे सुदर्शन, जशी विद्युल्लता अंबरीं॥
तेव्हां काशिपुरी जळे धगधगा. वर्णूं कुणें वैखरी ?।
श्रीकृष्णा शमवावया निघतसे शाकंभरी घाबरी ॥१८॥

तेव्हां पार्वतीनें विचार केला.

मालिनी- असुरगण भवाचे भक्त पैं क्रूर मोठे।
स्मरत मानें आपणा मागिले सर्व तोटे॥

हरिसि शरण जातां तोषुनी सांब भेटे ।
त्वरित सति निघाली द्वारकेच्याचि वाटें ॥१९॥

भुजंग-हरी द्वारकेसी वसे पश्चिमेसी ।
मती ते सती आत्मदृष्टीं तपासी ॥
परी आंतला भक्तिभावा भुकेला ।
पुरी सन्मुखीं साक्षि गोपाळ ठेला ॥२०॥

पार्वती श्रीशंकराचा शोध लागावा म्हणून जगन्नाथपुरी व भुवनेश्वर याचे मध्यभागीं साक्षी गोपाळ नामक क्षेत्रांत आली. पार्वती देवी म्हणते.पद चाल-पहिली.

“ हरी हुडकाया पश्चिमेसि मी गेले ।
पुरी सन्मुख पूर्वें आले ॥
भुवन ईश्वर हें, ईश्वरीं भुवन बुडलें ।
कानिं हरिहर हरिहर पडले ॥
हरवले मज मी, हरवले करू कैसी ? ।
हरीहर येती एकरसीं ” ॥ ध्रु० ॥१॥२१॥

साक्षी गोपाळा सन्निध भुवनेश्वरांत सांबास पाहिलें. श्रीकृष्णास पाहतांच गौरीस आनंद झाला.

आर्या-गोपाळासह सांबा पाहुनि गौरीसि दाटला पान्हा ।
तें गौरीचें प्रेमदुग्ध गौरीकुंडांत भरून वाहूं लागलें.
गौरीपय पानाते सरसावे धुंडिराज तो तान्हा ॥२२॥

अनु०- अन्नपूर्णा हरि प्रेमें चित्सुखें पूर्ण पाझरे ।
हेरंब पीतसे पूर्ण, परि पूर्णाचि तें उरें ॥२३॥

गणपतीनें तृप्त होईपर्यंत दूध पिऊन ही तें गौरीकुंड आज मितीस परिपूर्ण राहिलें आहे. विघ्नराजास गौरी म्हणते.

आर्या-गौरी म्हणेः-“गणेशा ! गोविंदासाठिं चित्त पाझरलें ।
बाळा ! हें तुज पुरलें, वरि या सर्वा जगासि ही उरलें” ॥२४॥

यांप्रमाणें महादेव, पार्वती व गजानन भुवनेश्वरास आले.
नंदी ही सांबास शोधीत हिंडत तेथें आला.

साकी–नंदी हिंडे सारी अवनी, साठावि तीर्थें वृषणीं ।
पवित्रतर क्षेत्रातें उकरुनि, रजरज ठेवि विषाणीं ॥२५॥

नंदिकेश्वर आपला अनुभव सांगतात. पद. चाल–पहिली.

वृषभ मग बोलेः–"धुंडितां सांब अवनीं ।
सुदर्शन पाठीं चहुकडुनी ॥
अखिल ही तीर्थें, हरि–पादोदक–झरणीं ।
भूमि वामन–पदरजश्रेणी ॥
शंभु गिवसेना, गुंग मी श्रीनिवासीं ।
हरीहर येती एक रसीं ॥ ध्रु० ॥ २ ॥ २६ ॥

भुवनेश्वरीं नंदीनें सदाशिवाला नमस्कार केला. त्या–
सरसें श्रृंगावरील रजांचें लिंग तेथें झालें.

साकी–भुवनेश्वरिं तीर्थें तीं गळती बिंदु सरीं पुष्करणीं ।
श्रृंगींचे ते रजकण झाले कोटिलिंग मग धरणीं ॥२७॥

याप्रमाणें भुवनेश्वराची कथा नारदांनीं इंद्रद्युम्नराजास
सांगितली.

ओवी–नृपें रुद्रीय अभिषेचन । विष्णुनामें तुलसी-अर्चन ॥
करितां होई सुप्रसन्न । भुवनेश्वर ॥ २८ ॥

हीच अर्चनपद्धति या क्षेत्रांत आहे. भुवनेश्वर प्रगट होऊन
राजास वर देतात.

पद– प्रगटला शंभू पीतांबर घननीळा ।
मस्तकीं चंद्रकोर धवळा ॥
चतुर्भुजिं डमरू धरि शंखशूळकमळा ।
जटेमधिं जान्हवि वेल्हाळा ॥

हरी कीं हर हा, न कळे तें वृषभासी ।
हरीहर येती एकरसीं ॥ ध्रु० ॥ ४ ॥ २९ ॥

वदे भुवनेश्वर सुप्रसन्न मग रायाः— ।
"धरी दृढ नारद-गुरु-पाया ॥
दावि गुरु तुजला श्रीघननीळा सदया ।
तेथ मी नीळकंठ सखया ॥
सद्गुरू सहजा करि ब्रह्माचि नयनासी " ।
हरीहर येती एकरसी ॥ ध्रु० ॥ ५ ॥ ३० ॥

इति हरिहर अभेदनाम पंचमी कथा.



## २५ जगन्नाथ यात्रा कथा ६ ( मंत्रराज साक्षात्कार )

अभंग— गुप्त आहे पुरुषोत्तम । प्रगट कीजे हा उद्यम ॥१॥
अक्षराचें अनुष्ठान । जप, यज्ञसंतर्तण ॥२॥
गिळुनी जाय कळिकाळा । ब्रह्मानंदाचा सोहळा ॥३॥
भजन करावें अचाट । सहज करुणेनें प्रगट ॥४॥



इंद्रद्युम्न प्रजासह नीलाचला जवळ आला. फटाव.

शेवट येत निकट नीलाचल. ऋषिकुल्या नदि वाहे झुळ झुळ-
ताड माड कोविदार पाटल-देवदारु सरु सीसम संदल-
हिरडा पळस भिलावा हेकळ-औदुंबर वट तरटी टाकळ-
लिंब आवळी चिंचा बाभुळ-फणस जांब नारंगी जांभुळ-
अशोक आंबे केळी नारळ- महाळुंग नीपक सीताफळ-
लवंग एळा बोर जायफळ—पीचू लीचू काजू पोफळ-
खिरणी तूत सपोटा मुंजल. सर्व जनासी खाया तळमळ-
करीं न येतां करिती हळहळ. अभिलाषाची होत प्रवृत्ती-
कबजासाठीं कज्जा करिती,—दंगामस्ती कुस्ता कुस्ती ! ॥५॥

याप्रमाणें देव न दिसतां सृष्टीच दिसली त्यामुळें प्रजेंत अभिलाष बुद्धी व कलह माजला.

भुजंग० जसा पातला लोक नीलाचलाला ।
दिसेना तिथें वाण पुष्पाफलाला ॥
परी ती फळें येत नाहींत ओठीं ।
म्हणूनी वृथा जीभ ती लाळ घोटी ! ॥६॥

सुपीक प्रदेशासि देखूनि सारे ।
म्हणूं लागले :-"येथ बैसूनि खा रे" ॥
मिया पाहिलें शेणं तें जेवि माझें ।
प्रवासा इथें येति, ते होति राजे ॥७॥

दिसेना हरी, कोणती तेथ नीती ? ॥
अरत्रा परत्रासि कोणी न भीती ।
बळी निर्बळीला गिळी, हीच रीती ।
वधायासि येरा जनां येथ जीती ॥७॥

बहूता प्रवासीं हरीला पहाया ।
इथें लोक आला परी हाय हाया ! ॥
जशी येथची पाहिली सृष्टि शोभा ।
बने दास बंदा गडी राग लोभा ॥९॥

वसंत० झाला निमग्न जन देखुनि सृष्टि शोभा ।
कामासि आगर बने मद राग लोभा ॥
सृष्टी दिसे परि न दृष्टिद नाथ लोका ।
कष्टी असा बहु करी नृपवर्य शोका ॥१०॥

साकी—कष्टद दीर्घ प्रवासा अंतीं हरि न दिसे ही खंती ।
गडबड लोळे धरणी वरती, रडूं लागला नृपती ॥११॥

---

१ शेण गोळा करितांना आधीं पाहील तो हक्कदार.

इंद्रद्युम्नाचा शोक व हरिविरह. पद. चाल—धाव विमो०

हाय हरी नीलाचलवासा ।
आलों सोसित बहुत प्रवासा ॥ ध्रु० ॥
आधीं लोचन देउनि देवा ! ।
कां मग लपविसि दर्शन मेवा ? ॥
जन हें आतां करिती हेवा ।
नाहिसि तूं म्हणती उपहासा ॥१॥१२॥
दुरुनी आलों गा ! तव ठाया ।
कांहीं बोल तरी लवलाह्या, ॥
नाहीं काय दया तुज माया ? ।
फासुनिया मज नाडिसि वाया ॥२॥१३॥
विद्यापतिला दाविलि काया ।
आळसलों तेव्हांचि निघाया ॥
गेलें जीवित, वय ही वाया ।
तळमळतों पाण्याविण मासा ॥३॥१४॥
सद्गुरु नारद ब्रह्मानंदा ! ।
शरण तुला मी, दावि मुकुंदा ॥
तोडी भवदुःखाचे फंदा ।
काय पाहसी सहज तमासा ? ॥४॥१५॥

नारदमुनी इंद्रद्युम्नाचें सांत्वन करितात.

वसंत० बोले मुनीः—"कपट नाटकि हा मुरारी, ।
विद्यापतीसि दिसुनी, बनला फरारी. ॥
बांधूनि अक्षर अखंडित भक्ति दोरीं ।
आणूनिया करि उभा जगता समोरीं ! ॥१६॥

यावर इंद्रद्युम्न आणि नारद यांचीं प्रश्नोत्तरें.

आर्या—राव म्हणेः—"हरि लपला. पापी मी. जीव फार हो ! थकला"
मुनि बोलेः—"हरि टपला. भेटी आधींच देत भक्ति-कला"१७

राव म्हणे "दिक्कालीं गिवसेना, तो कसा मला गवसे?"
मुनि बोले "दिक्काला दीपउनी तो सदा समोर वसे" ॥१८

नारदांनीं मंत्रराजचा व नृसिंहतापिनी विद्येचा उपदेश केला.

अनुष्टुप्० "उग्रं वीरं महाविष्णुं ज्वलंतं सर्वतोमुखम् ।
नृसिंहं भीषणं भद्रं मृत्युमृत्युं नमाम्यहं" ॥१९॥

---

नृसिंह तापिनी विद्या दिधली नारदें नृपा ।
प्रणव-प्रकाश करुनी, भाकिली हरिची कृपा ॥२०॥

नारद इंद्रद्युम्नास गुरुखूण सांगतात.

दिंडी- मंत्रराजें स्वतनूसि गाठ मारी ।
दुजें टोका फैलावि निराकारी ॥
घालि फेरी. आपणा लपट दोरी. ।
गुप्त दामोदर प्रगटतो समोरीं ॥२१॥

अनुष्ठान करित असतां मंत्रराज स्वरूप श्रीनृसिंह साक्षात् झाला.

शार्दूल० निष्ठा देखुनि उत्कटा, प्रकटला काढूनिया दिक्पटा, ।
ज्वाला-माल नृसिंह हास्यविकटा, भीमासटापिंगटा. ॥
दंष्ट्रा उग्र दटावि दानव भटा, संदीप्त नेत्रच्छटा, ।
फाटे ब्रह्म कढाह उच्च भृकुटा आंदोलती वेंकटा ॥२२॥

---

घनाक्षरी-प्रणवपीठ तेजाधिष्ठान । अभय वरदमूर्ती भवभीषण ॥
देखुनिया नृप झाला लीन । आनंदीं दंग ॥१॥२३॥
लोकोत्तर नरहरिची पूजा । सिद्ध मांडिती संतसमाजा ॥
नभीं दुमदुमे अनुहित बाजा । वीणा मृदंग ।२॥२४॥
वेणु पणव किन्नरी किंकिणी । जलतरंग सारंग तुंतुणी ॥
सनई अलगुज चंगाचे ध्वनि । समरसले चांग ॥३॥२५॥

डमरू सेवळ शंख तुतारी । धागरघुंवा नौबद भेरी ।
झांज सरोदा मुरज खंजिरी । भजती श्रीरंग ॥४॥२६॥
ठेका रेखा शाखा पल्लव । राग तान लय मूर्छा अनुरव ।
एका प्रणवाचा हा गौरव । चहु वाचा गुंग ॥५॥२७॥
सुमनाचा देवासि फुलवरा । जाइ जुई शेवंति मोगरा ।
केशर कापुर अगरा तगरा । निवडेना पांग ॥६॥२८॥
दिव्य तेज देखुनिया अद्भुत । दिव्य वाद्य ऐकूनी अनुहत ।
आमोदें झाला पुलकांकित । नृपती अष्टांग ॥७॥२९॥
सद्गुरु बोले:-"नाथ स्मरावा. । रसास्वाद हा गिळुनी जावा. ।
सहजा धरिजे उरिं ओलावा । वरिजे सत्संग" ॥८॥३०॥

प्रणवरूप नरहरीचे[1] दर्शनानंतर राजानें अनुष्ठानाचें ठिकाणीं श्रीनरहरीची स्थापना केली.

वसंत० सच्चित् सुधासरिं निवे नृप मज्जनाला ।
मृत्यूसि मृत्यु, हरि दे सुख सज्जनाला ॥
बद्धांजली नृप वदे भवभंजनाला ।
नाथा ! सदा प्रगट होइ प्रजा जनाला ॥३१॥

सर्वत्र प्रजाजनास सतत दर्शन होण्याचा उपाय सांगून श्रीनरहरी वरदान देतात.

पृथ्वी- हरी ! प्रथित मी जपीं, मथित दारु[2] माझीं हरी. ।
परी नुदित, सद्गुरू मुदित जों न चित्तांतरी. ॥
करी हयमखा सहस्र, वरि पूजि संतां घरीं. ।
तरी सुजनसांगिं मी प्रगट दारु-रूपा धरी. ॥३१॥

इति मंत्रराज साक्षात्कार षष्ठी कथा



१ नृसिंह. २ अग्नि.

## २५ जगन्नाथ दारुरूप जगदीशावतार ७

अभंग- यज्ञीं संगम संतजना । आळवीती जगज्जीवना ॥
आनंदाचिये कल्लोळीं । होत अवभृत आंघोळी ॥२॥
जगन्नाथाचा जो भात । विश्व पसरीतें हात ॥३॥
संत समरसती जेथ । सहजीं प्रगटे जगन्नाथ ॥४॥

जनकपुरामधें श्रीनरहरि सन्मुख इंद्रद्युम्नराजानें सहस्र अश्वमेधाचा संकल्प केला. तेव्हा इंद्र घाबरला.

साकी- जनकपुरीं श्रीनरहरि सन्मुख सहस्र हयमेधा कीं !।
नारद करविल ! पदवी हरविल ! इंद्र पडे या धाकीं ॥५॥

इंद्रद्युम्नानें नारदाचें आज्ञेनुसार इंद्राचें समाधान केलें.

आर्या- हयमेध प्रस्तावीं इंद्रातें मग नृपेंद्रवर विनवी :-।
"मज नलगे तव पदवी प्रगटो हरि हीचि आस पुरवि नवी."
सुरवर आज्ञा देती:-"हरिला सन्मूख आणि बा! नृपती।
स्वर्गी दुर्लभ भक्ती ती घडण्या अमर मानवीं-लपती"॥७॥

इंद्रद्युम्न अश्वमेध आरंभतो.

रथोद्धता- पूजुनी हरि गुरू द्विजा जनां ।
पांघरे नृप शुभा मृगाजिना ॥
बद्ध कंकण समाहितांतरीं ।
ध्यातसे हरिसि. मौन वैखरी ॥८॥

अश्व पृथ्वीवर सोडला.

साकी- वाजि शिरीं पत्रिका निमंत्रण वाहत सर्वा लोकां ।
"याजी! लोकालोक निवासी. या जी! हरि अवलोका!॥९॥
अश्वापाठीं भननानंदीं हरिचे[2] पाइक जाती ।
विनविति विश्वाः-"यागा या गा! या, गा अठरा जाती १०

१ यजमान. २ देवाचें किंवा अश्वाचें.

कोणीं नाहीं अश्व रोकिला, आला फिरुनी अवनी।
त्या अश्वा देवासि निवेदुनि, सोडिति धर्मारण्यीं ॥११॥
याप्रमाणें पशू न मारितां अश्वमेध सुरू झाले.

साकी- यक्षोरग नर दानव किन्नर, सोपायन सुर आले।
हिंसा विरहित यज्ञें तोषुनि, हुतशेषामृतिं धाले ॥१२॥
या यज्ञामध्ये शीघ्र इष्टफल झालें तें असें.

अनुष्टुप-हरि सन्मुख नामाचें हरि प्रेरित याग ते।
तृप्त संत तिथें झाले, श्रीकृष्णार्पण सांग तें ॥१३॥

---

पद- दाटला संताचा मेळा।
संतचरणरज हें दिव्यांजन वसलें कीं डोळां ॥ध्रु०॥
वार्ता जाय दिगंतासी,।
येति देव दानव, नर, किन्नर, विश्वांतरवासी.॥
पातले जन-पद-रहिवासी,।
शाक्त, शैव, गाणपत्य, सौवर, हरिचे उपवासी.॥
उतावेळ हरि देखायासी,।
योगी, त्यागी, मुनी, दिगंबर, साधू, सन्यासी.॥
श्रीहरी प्रगट ये वेळा। संत चरणरज० ॥ ध्रु० ॥ ॥१४॥
यज्ञशेष प्रसाद सेवनास संत बसले तेव्हां नारदांनीं वाढिलें.

पद-( चाल-धांव विभो )

सुरवर ही भक्ति रसा सादर.। नारदमुनिचा आग्रह नादर.॥ध्रु०॥
हिंग मिरें जिरें, आलें लवणा[1]। भजा भजा वाढिया गुरुचरणा॥
सेवाया सेवा! परमान्ना। दिव्य कायरस हरि हो रुचिकर १-१५
राधा-विलास मोहन भोगा। सुधारसा घ्या! पात्रीं जागा!॥
कुरवंडी सांड या विभागा। घे कथिका मधुकल्या सत्वर! २-१६

---

१ लवलें असतां तात्काल अहंकार जिरतो.

भरित हरभरां, पूरण खाजी । शिरापुरी ही परवर भा जी ॥
रामरसातें भाकर राजी । सेवी सारा, मागुनि घे वरं ॥३॥१७॥
परब्रह्म हें अन्न रसायन ! । दाता भोक्ता हरिनारायण ॥
मधुसूदन मुर-कैठभ-भंजन । रसने हृदयीं नयनीं पाझर ॥४॥१८॥

नारदांनीं याप्रमाणें पक्वान्नांचें नावांत ब्रम्हानुसंधान दाखविलें.

साकी-सहस्र हयमख यापरि होती, अखंड माधव हृदयीं ।
वैकुंठातें निरखी नृपती पूर्णाहुतिचें उदयीं ॥१९॥

राजास पूर्णाहुतीचें सुप्रभातीं वैकुंठ दर्शन झालें.

अनु०-अविद्या सरली निद्रा, जागा नाहीं जगा तरी ।
निमालें कल्पना स्वप्न, पाहिला हरि हो हरी ! ॥२०॥

———

पद- दाटला संतांचा मेळा । संत चरणरज० ॥ध्रु०॥
पाहिलें मोहन घननीळा ।

शंखचक्रयुत मंदस्मित धृत-कौस्तुभ-वनमाळा ! ॥
शेष तो चारु-हास्य धवळा ।
फणा-मुकुट-मणि-कुंडल-मंडित, धरि लांगल मुसला ! ॥
अभयवर-दायक अति-विमला ।
कुंकुमारुणी गुणगण-खाणी देवी वेल्हाळा ! ॥
सुदर्शन लोपावि दिक्काला! ॥ संत० ॥ध्रु० ॥१॥२१

मौन सोडून राजा एकदम श्रीहरिचें स्तवन करूं लागला.

दिंडी- मौन सरलें देखुनी जगन्नाथा ।
वेळवेळां ठेविला पदीं माथा ॥
"हरी सखया दिसलासि मला आतां ।
ठेवि माझें संतृप्त शिरीं हाता" ॥२१॥

———

१ प्रत्येक ठिकाणीं व्याप्त. २ नामसार सेव आणि वर मागुन घे.

राजानें हा साक्षात्कार श्रीनारदमुनीस सांगितला.

साकी- नारद बोलेः—"साक्षात्कारीं प्रत्यय येत समोरीं ।
अवभृत स्नाना होत तयारी, तव कथिलें परिचारीं:—॥२३॥

राजास दूतांनीं एक अद्भुत तरु समुद्रांत वाहात येत असल्याचें सांगून त्या ठिकाणीं आणिलें.

दिंडी- दूत सांगति तैसेचि राव पाहे ।
शंख-चक्रांकित तरू जलधिं वाहे ॥
मूळ लहरींवरि, अग्र तळीं भासे ।
सर्व अवनीं घमघमें ज्या सुवासें ॥२४॥

शंख चक्रांकित सुवासयुक्त अदृष्टपूर्व तरूस पाहून नारदमुनी राजास म्हणतातः—

दिंडी- म्हणे नारद हा याग सुफल झाला ।
तुझे भक्तीनें नृपा नाथ धाला ॥
तुला हा तरु निजरोम पाठवीला ।
भक्तवत्सल दावीत जगा लीला ॥२५॥

आर्या- "दृढवद्ध धर्ममूलो वेदस्कंधो पुराण शाखाढ्यः ।
क्रतुकुसुमो मोक्षफलो मधुसूदन पादपो जयाति [१]" ॥

सर्वं विष्णुमयं जगत् अशी राजाची दृष्टी दृढ झाल्यामुळें सर्वांस तीच प्रचीति आली.

दिंडी- विष्णुरूपचि नृप तरूसी निरिक्षी ।
चतुर्भुज ऐसी संत देति साक्षी ॥
हरी प्रत्यक्षचि नव्हे जी ! परोक्षीं ।
तेथ वाणी गर्जेली अंतरिक्षीं:— ॥२६॥

सर्वांनीं आकाशवाणी ऐकिली ती अशीः—

साकी—"अंतर्वेदीमधिं ठेउनि तरु, झांका न करा घायी ।
वृद्ध बढायीं [२] घडविल तेव्हां, होय प्रगट जलशायी" ॥२६॥

---

१ गरुड पुराण. २ सुतार.

जनकपुराचें यज्ञशाळेंत अंतर्वेदींत तरु ठेविला.

अंतर्वेदीं तरू ठेवितां वृद्ध बढायी आला ।
म्हणे नृपाळाः-"तव ध्यानींचा हरि दाविन सकलाला" २७

वृद्ध सुतार अंतर्वेदींत बसला. बाहेर हरिनाम गजरयुक्त अखंड भजन नारदांनीं आरंभिलें.

साकी- वाजति कहाळ मृदंग टिपरी जंगट नौबद भेरी ।
रात्रंदिन धरिली एकसरीं हरिनामाची फेरी ॥२८॥

ही नामसप्ताह पद्धत श्रीनारदानीं घातली, ती अद्याप आहे.

मालिनी- निशिदिनिं भजनीं जैं या परी पक्ष गेला. ।
मुनि उघाडि कपाटा वेदिच्या. तेथ ठेला ॥
निरखिति जन सारे नाथ विश्वंभराला. ।
घटक घडुनि मूर्ती, मूर्तिमाजीं विराला. ॥२९॥

ज्या वृद्ध सुतारानें मूर्ती घडली तो सुतार मूर्तीतच अदृश्य झाला.

---

पद- दाटला संताचा मेळा। संतचरणरज हें दिव्यांजन० ॥ध्रु०
चतुर्धा स्वरूप देवाचें ।
हलधर, देवि सुभद्रा, कृष्ण, सुदर्शन-चक्राचें. ॥
रूपडें कौतुक नयनाचें, ।
मौक्तिक, माणिक, मरकत, पुष्कर सुंदर वर्णाचें.॥
धारणा ध्यान समाधीचें ।
तुरीय सुख, वदवेना वेदा चतुरा चहु वाचें॥
प्रगट तें प्रेमळ भक्ताला । संतचरणरज० ॥ध्रु०॥२॥३०॥

इकडें ब्रह्मदेवाला श्रीहरी नीलाचलीं प्रगट झाल्याची वार्ता लागली. तेव्हां तो इंद्रादिक देवांस म्हणतोः—

पद- वदे विधि इंद्रादिक देवाः- ।
"गुप्त तुम्हां तो प्रगट मानवां प्रेम तरू मेवा. ॥

जरा तरि निज मनीं पस्तावा! ।
मनुजा दिसतो हरि, तुम्हि स्वर्गी धरिता सुस्तावा.॥
हरीला पूजा. या धावा! ।
मृत्युलोकिं लागला सुगावा पुरुषोत्तम-गांवां ॥
पहा हरि-करुणेची लीला! ॥ संत चरण० ॥ ध्रु० ॥३॥३१॥

---

मालिनी- स्वतनुचि जगताला श्रीजगन्नाथ दावी, ।
जगरहित तयाची वस्ति कोठें वदावी ? ॥
तरुवर हरि झाला. तूर्ण तो सांपडाया, ।
सुरवर गुरुपासीं येति पाया पडाया. ॥३२॥

नीलाचलास इंद्रादिक देवांसह ब्रम्हदेव आला.

भुजंग० त्वरें पातले देव नीचाचलासीं ।
स्वयें विश्वकर्मा रची राउळासी. ॥
कशी वर्णिजे त्या विधीची कळासी ? ।
युगांतीं नव्हे तें घडीतां पळासी ॥३३॥

देवाला सर्वांनीं रथांत बसविले.

साकी-सोळा चाकी रथ गोविंदा, चवदा चाकी रामा, ।
बारा चाकि सुभद्रेचा रथ, ओढिती गर्जुनि नामा ॥३४॥
जनकपुराचें वेदीपासुनि नीलाचल प्रासादा ।
आणुनि स्वकरें विधी प्रतिष्ठी सिंहासनिं गोविंदा ॥३५॥

तेव्हां मूर्तीनें सिंह-गर्जना केली.

"गुरु गुरु गुरु गुरु!" नरहरि गर्जे, मंत्रराज उच्चारीं ।
नृसिंह-रूपा स्तविती विधि, हर, अठरा, सहा, चारी ॥३६॥

श्रीकृष्ण, सुभद्रा, हलधर, सुदर्शन हे चतुर्व्यूहरूप एकाच प्रणवाच्या मात्रा आकारास आल्या; व चारी मिळून नृसिंहरूप विग्रह; असें सर्वांनीं पाहिलें. तेव्हां ब्रम्हदेवानें त्याची उपपत्ति राजास सांगितली.

पद- विधी मग गूज कथी राया:- ।
"प्रणवरूप[1] पुरुषोत्तम हरि, धरि दारुमयी काया ।
शब्दमय[2] होत ब्रम्ह सदयां ! ।
शब्दार्थाचें अगम्य नातें भेद-मती वाया. ॥
ऋचा,बलराम अकारें या ।
यजू उकार सुभद्रा, नरहरि साम नीळ छाया ॥
अथर्वण दावी चक्राला. ॥ संत चरणरज० ॥ ध्रु० ॥४॥३७॥

---

अनु० अरूप रूप पाहोनी नृपाला प्रेम दाटलें ।
नारदा पुसतो तेव्हां एक आश्चर्य वाटलें ॥३८॥

---

देवास हात, बोटें नाहींत. असें पाहून राजा विस्मययुक्त नारदास प्रश्न करितो :—

वसंत० "दावीत रूप, हरिचें बहु प्रेम मोठें. ।
पै कां जनासि हरि दावित हात थोटे ? ॥
नाहींत काय हरिला मुनि हात बोटें ? ।
कीं आमुचें दुरित हें विपरीत खोटें ! ॥३९॥

त्यावर नारदमुनी समाधान करितात.

बोले मुनी:-"प्रभुदयाचि दिसें जना ही ।
नाथासि-भक्त मिळणीविण काज नाहीं ॥
भक्तासि एक हरि हो ! हरि सर्व कांहीं. ।
देतो स्वतांसि हरि हो !"हरि हो"दया ही॥४०॥

साकी-नाहित कर या द्याया घ्याया, पसरी भुज भेटाया ।
ब्रम्ह पहा या. समरस व्हा या. नलगे सहज कराया ! ॥४१॥

॥ इति दारुरूप जगदीशावतार देवभक्त-सामरस्य नाम सप्तमी कथा ॥



---

१ प्रणवरूप- नृसिंह. २ ॐकारच ब्रह्माचें व्यक्तरूप.

## २६ शैखफरीदाचा शिष्य निजामुद्दीन आणि घट.

अनु० निजामुद्दीन संपादी विद्या, नित्य नव्या कला, ।
संसारीं दक्ष राहूनी संपत्ती थोर वाढवी. ॥१॥

दारावर एक भिकारी आला.

उपजाति- हिशोब तो नित्य स्वतां तपासी. ।
फकीर दारांत उभा उपासी. ॥
गेली घडी. तिष्ठत तो भुकेला.
निजाम खात्यांत गढूनि गेला. ॥२॥

कंटाळून भिक्षू म्हणतो.

शार्दूल० बोले भिक्षुः–"तुझे जीवासि अवघे हे वेधिती आंकडे. ।
केली ओरड मी. तुला न अवधी यायासि दीनाकडे. ॥
तूझा जीव अणूंअणूंत अटके. अंतीं बहू सांकडें, ।
जेव्हां निर्दय दूत खेंचिति, कुठें सीधें, कुठें वाकडें!"॥३॥

उप० निजाम बोलेः–"मिळण्यासि पैसा, ।
वाग्बाण हे! तूं मरशील कैसा?" ॥
भिक्षू वदेः–"देख! सुखेंचि ऐसा. ।
सांभाळि हा जीव जगन्निवासा!" ॥४॥

असें म्हणून भिकारी मरून गेला.

निजाम तेव्हां करि खेद चित्तां. ।
वाटीत दीनांसि समस्त वित्ता. ॥
टाकूनिया मंदिर आणि कांता, ।
धुंडी गुरू तारक, मुक्ति-दाता. ॥५॥

सूफी संतांचें मंडळांत निजामुद्दीन फिरून अनुग्रहार्थ प्रार्थू लागला. बहुश्रुत विद्वान असल्यामुळें त्याच्यावर अनुग्रह करण्यास कोणी सिद्ध झाला नाहीं.

पद— अनुतापें तो निजाम विनवी संतांना आदरें:—।
" कसा हा खट सांगा उद्धरें. " ॥१॥६॥

त्यावर एका संतानें त्यास सांगितलें.

"पढिक मनस्वी तेज तुझें या लघुतपियां नावरे. ।
शरण जा षेख फरीदा त्वरें. " ॥२॥७॥

यमुनातीरीं पाकपट्टनांत षेख फरीदाचें आश्रमास निजामुद्दीन आला.

येत फरीदाश्रमीं. तेथले म्हणती:—"परता फिरे ! ।
पुरातन आम्ही. जागा नुरे. ॥३॥८॥
षेख समाधीं सदा. निरविती गुरुवारीं अवसरें, ।
जयावरि महत्कृपा अवतरे. ॥४॥९॥
महत्कृपेची वेळा निरखित आम्हि हजारों खरे. ।
कळेना वय राहे, ओसरे ! ॥५॥१०॥
भाग्याचा परि, गुर्वाज्ञेनें येथें साधक ठरे. ।
अभागी जगिं सैरा वावरे. " ॥६॥११॥

निजामुद्दीन चिंतातुर आश्रमाबाहेर उभा राहून म्हणतो:—

"हाय कसें या महा खटाला गुरु पतकरिती बरे ! " ।
सहज हा श्रमला, वरि घाबरे. ॥७॥१२॥

गुरुवार नव्हता तरी गुहेचें दार उघडून षेख फरीद बाहेर आले.

भुजंग— गुहाद्वार वाजे. वदे शिष्यमेळा:— ।
"गुरूराज आले. नसे वार वेळा ! ॥
कुणा चातकाची तृषा चिद्घनाला ? ।
उदेला सुखेंदू चकोरा कुणाला ? " ॥१३॥

उपजाति—फरीद बोले:—"दमला प्रवासीं, ।
त्याची तृषा या मज चातकासी. ॥
गेली अमा. चंद्र नवा उदेला, ।
तद्दर्शना हा चकवा भुकेला. " ॥१४॥

श्रीगुरुसमोर निजामुद्दीन प्रणाम करून उभा राहिला. आतें पाहून त्याच दिवशीं शिष्यत्वाची दीक्षा, व सर्व आश्रमास पुरेलसें यमुनाजल भरण्याची सेवा मिळाली. आला तोंच दर्शन! दर्शनाबरसीच दीक्षा व सेवेची आज्ञा! या भाग्याचें इतर पुरातन शिष्यवृंदांना आश्चर्य वाटलें. दोन हजार शिष्यांस लागणारें पाणी एकटा निजामुद्दीन पुरवूं लागला.

**शार्दूल० लुंगी, पैरण पोटरी वरि रुळे. कानीं. शिरीं टोपरी.।**
**सोडायासि उपास अंबिल बरी लाभे कटोरा भरी. ॥**

निल्यरोजा, व रात्रौ पारण्यास एक कटोरा अंबिल नेमस्त होती.

**ठेवी माठ शिरीं सदा. जल भरी. आणी गुरूमंदिरीं.।**
**पंथीं लोटि दिनासि नामगजरीं. जाती निशी जागरीं. १५**

दोन तपें गेलीं. दिवसा पंथक्रमण व उपास, रात्रौ जागरण, निजामुद्दीन यास स्वदेहाकडें पाहाण्यास अवकाश नव्हता. एकदां दोनप्रहरीं किंचित् विसावा घेण्यास यमुनातीरीं बसला.

**साकी–यमुना तीरीं, भरदोप्रहरीं निरखी स्वप्रतिबिंबा.।**
**पहिला फक्कड, आतां जख्खड, देखुनि होत अचंबा. ॥**
**आला तनु भावां.। स्मरला निज नावां गावां. ॥१६॥**

निजामुद्दीन स्वत:स अनुलक्षून म्हणतो:–

**"फकीर आजीं, अमीर काजी शिकवी तो इतरांना !।**
**जें जें शिकलों त्यातें मुकलों. नाठवि मी पितरांना ! ॥**
**केली जरी सेवा। करुणा नाहीं गुरुदेवा ! ॥१७॥**

**शार्दूल०–गेलीं दोन तपें. परी गुरु कृपें मातें न पाचारिती,।**
**जो जो मागुनि ये, तया गुरुदयें, तात्काल उद्धारिती. ॥**
**संसारा विटलों, इथें न पटलों, दोहींकडे दुर्गती.।**
**आतां काय करूं? कुठें तरि मरूं? नाथा पडे विस्मृती!" १८**

**दिंडी– ठेवि घट तीरीं, जसा रिघे रानीं,।**
**" पलट माघारी ! " ध्वनी पडे कानीं. ॥**

निजामुद्दीन विचार करितो :—

"नेणुं निर्जनिं हटाकिले आसरांनीं !"।

पण पहातो तोंच—

घटा आंतुनि येतसे स्पष्ट वाणी. ॥१९॥

घट म्हणतो:-

दिंडी- "कुठें जासी तूं संशयीं गुमानीं ?।
करुनि माझ्याशी अशी बेइमानी !॥
गुरू दरबारीं ठेवि मज ठिकाणीं.।
ऐक माझी एकदां तूं कहाणी." ॥२०॥

निजामुद्दीनानें विचारिलें, तेव्हां घट स्वकथा सांगतो.

शार्दूल० "मद्देहा खुणुनी कुलाल मिरवी बीदींत गध्यावरी.।
झालों कर्दम, तैं निवांत सडवी, धिक्कार माझा करी.॥

मी लवकर सडेना. कुंभार नाक मुरडून जात असे.

झालो मेण तरी खुशाल तुडवी. चक्रावरी भोंवरी.।
मारी थाप, चपेट. आकृति करी, त्या मानवे ती बरी! २१
देई ताप उन्हांत. जाळित पुन्हां केरांत होळीपरी.।
कच्चा, तापट, तो धरी न परवा; फोडीतसे ठोंकरीं.॥
माझें मोल छदाम घेउनि, मला ओपी फरीदा घरीं.।
आतां संत मला शिरीं कवाळिती सप्रेम दोनीं करीं!" २२

निजामुद्दीन विचारतो:—" तूं कोण आहेस ?" घट पूर्वयुगाची आपली कथा सांगतो.

दिंडी- "मला नेणसि. मी पूर्व युगीं राजा.।
देश जिंकित मिरवीत क्रूर फौजा.॥

देश जिंकित जिंकित हरिद्वारपाशीं आलों तेव्हां:—

एक मुनि दावी स्वर्ग नरक मौजा।
नरकिं देखे मी शूर बाप आजा." ॥२३॥

निजामुद्दीन विचारतो "त्या नंतर ?"

" कुरुक्षेत्रीं, मी त्यजुनि राज्य भाजा, ।
जला पुरवी गुरुकुलीं सत्समाजा. ॥
पडे रानीं तो जरठ देह माझा, ।
दया हरिची ! परि येत पूर्व काजा." ॥२४॥

निजामुद्दीन विचारतोः– "तुला आज कशी वाचा फुटली ?"

घट म्हणतोः–" षेख फरीदाचें सामर्थ्यानें !"

भुजंग० "गुरू सर्वकालीं स्वदासा पहातो. ।
मला सर्व पूर्वस्मृती आजि देतो. ॥
मुकासा जरी मी बहू काल होतो; ।
तुला उद्धराया मला बोलवीतो." ॥२५॥

उपजाति " चैतन्य मी. तूं जडसा निजामा ! । *
कां वाहसी संशय रे रिकामा ? ॥
जया घटा लाविति संत कामां ।
आकल्प चैतन्य निजात्म धामां ॥२६॥

साकी–तुझी मृत्तिका सद्गुरु सडवी, मग तो बडवी, तुडवी, ।
फिरवी, थापी, तापी, जाळी, तुजला बहुताचि रडवी. ॥
पुरता धीर धरी ! । होणें घट तें बहुत दुरी ! ॥२७॥
सत्सेवेची गोडी माझ्या बाणलि रोमीं रोमीं; ।
दया हरीची ! आजहि हा घट पडतो संतां कामीं. ॥
चल ! ये नीर भरी, । झडकरि मजला घेइ शिरीं. ॥२८॥

निजामुद्दीन आश्रमास आला. तोंच षेख फरीद दार उघडून बाहेर आले.

उपजाति भरी घडा चालतसे भरारा ।
फरीद बोले उघडूनि दारा :–॥

---

* तुला स्वदेहाभिमात म्हणून तूं जड. मी निरभिमान चैतन्य.

"या जी त्वरें!" कंप सुटे थरारा. ।
निजाम सर्वांगिं स्वेद झरारा. ॥२९॥

निजामुद्दीनास शेख फरीद म्हणतात:-

शार्दूल०-"ठेवा आम्हि अपूर्व योग्य समयीं देणार होतों, परी ।
देतो आजि अकालिं. संशय तुझें धीरासि हा कातरी." ॥

निजामुद्दीनास करीं धरून शेख फरीद गुहेंत गेलें.

चातुर्मास गुहेंत ठेवुनि गुरू घेऊनि शिष्यां करीं, ।
आलें बाहिर एकरूप! गुरुचें देणें न ये वैखरीं. ॥३०॥

श्रीगुरूनीं शिष्यास गादीवर बसवून आपण बाजूस बसले.

भुजंग० गुरू बैसवी योगपीठीं निजामा. ।
म्हणे शिष्यवर्गाः-"करा या प्रणामा! ॥
नसे आंत बाहेर तो भेद आम्हां. ।
पुढें या वरी सोंपिलें सर्व कामा." ॥३१॥

नंतर निजामुद्दीनास श्रीगुरु म्हणतात :-

दिंडी- "तुझी सेवा निर्मला! गोड प्यारी. ।
दिली तुज आतां पूर्ण ठेव भारी. ॥
समाधानें धरि आपुली सिदोरी. ।
नांद अजरामर! आर्त जनां तारी." ॥३२॥

दीन निजामुद्दीन साश्रुवदन गुरुस लोटांगण जाऊन म्हणतो:—

साकी-दयाघना! तव अगाध देणें! वर्णु कसें? गुरुदेवा! ।
हाय अधूरा अधीर हा घट! अंतरली तव सेवा. ॥
नाहीं घट झालों! । जरि कां योगपटीं आलों. ॥३३॥

इति निजामुद्दीन घटाख्यान.



# चतुर्थ प्रवाह, कल्प-कदंब.

श्रीकृष्ण गोकुळांत आल्यापासून गोकुळ म्हणजे विश्वच. विश्वांतील सर्व वस्तूंची समृद्धी गोकुळांत. त्यांत एकदां सौभाग्यदायक संक्रांतीचा सण आला, तेव्हां—

## १ यशोदा संक्रांतीचे आवे लुटविते.

उपजाति- संक्रांतिचा थाट अपूर्व झाला. ।
म्हणे यशोदा व्रज-गोपिकाला:-॥
" लुटा लुटा! आवड जी जयाला, ।
घ्या जें रुचें, पथ्यहि जें तुम्हांला. " ॥१॥

आली हळू सत्वर राधिका सती, ।
म्हणे :-" मला श्रीहरि आवडे अती. ॥
नेते अतां मी सखया महाप्रती. " ।
मती जशी, त्यासि मिळे तशी मती. ॥२॥

रडे हरी ओरड ओरडूनी. ।
राधा तया देखत मूरडूनी. ॥
राधेसि देखूनि निवांत झाला. ।
नेत्रांतुनी जीव हरींत आला. ॥३॥

राधेच्या निवडणुकीची सर्व गोपींस महती वाटली. "जैशी दीप-कळिका धाकुटी । बहु तेजातें प्रगटी ॥ तैशी सद्बुद्धि हे थेकुटी । म्हणूं नये ॥ ज्ञानेश्वरी ॥ गोपी राधेचें अनुकरण करूं लागल्या. परंतु एकीचा पती हरि-द्वेष्टा होता. तिची हकिकत:-

## २ गोपीचा मृत्यु व पुनर्जीवन.

अनु० नंद-द्वारीं उभी गोपी मुकुंदासि पहावया. ।
देव-द्वेषी पती तीचा, नावडे रीति ही तया. ॥१॥
म्हणे :-" नंदकिशोरानें गोकुळीं बंड मांडिलें, ।
देवभोळे महामूढ! भजनीं सर्व नाडिले. ॥२॥
माजलें अवताराचें खूळ, स्वातंत्र्य ही घटे. ।
हरि-भक्तीमुळें आली गोकुळावरि संकटें." ॥३॥

साहसें ताडुनी तीतें, लादिला फास ही गळा. ।
प्राणांतीं बोलली गोपी, चिंतूनि हरि सावळा:-॥४॥
" सद्धर्म आमुचा हा जी! तुम्ही मारा, अम्ही मरूं, ।
वाचवूत परी तुम्हां. हरिला हरिला स्मरूं. ॥५॥
मारूनि टाकितां मातें, तुम्ही वाचाल कां तरी? ।
शवा माझें हरीपायीं ठेवा हो! हरि हो हरी." ॥६॥
यापरी बोलुनी साध्वी मृत्यू तत्काळ पावली. ।
नारदें आर्त ही वाणी भिंती आडूनि ऐकिली. ॥७॥

हातीं कडी, पदीं बेडी, रक्तमाळा बहू गळां ।
बैसला आत्महत्यारा उंच सिंहासनीं, सुळां ॥८॥
थुंकूनि बोलती सारे:-" थोर हा आत्म-घातकी ।
सद्‌बुद्धी ती सती यानें मारिली, घोर पातकी!" ॥९॥
बोले नारद:-" रे गोपा! कोण वाचविता तुला?" ।
दीन वाणी वदे तेव्हां अंतिचें सति-हेतुला. ॥१०॥
श्रीकृष्ण चरणीं जेव्हां गोपीचें शव ठेविती, ।
जीवंत होउनी तेव्हां वाचवी आपुला पती. ॥११॥

"तैसें ईश्वरावांचूनि कांहीं । जियें आणिक लाणी नाहीं ॥ ते एकचि बुद्धि पाही । अर्जुना जगीं ॥ ज्ञानेश्वरी. हीच संसारबंधनांतून मुक्त करिते.

श्रीकृष्णास सांसारिक गोपानें मनुष्य लेखिलें त्यांत नवल नाहीं. तपोनिष्ठ दुर्वास मुनीही असेंच समजत.

## ३ दुर्वास मुनी व गोपी

दुर्वास शिष्यांसि कथीतसे वनीं :-।
“ कोणा दिसेना कधिं ईश लोचनीं. ” ॥
गोपी वदे त्यासि स्वपंथगामिनी :-।
“ नंदाचिया खेळत ब्रम्ह आंगणीं ! ॥१॥
तुझा करंट्या नुघडेचि डोळा, ।
तूं बैससी संतत अंधखोळा. ॥
देखे हरी गोपसमाज भोळा. ।
भानू नसे दैवहता घुडूळा. ” ॥२॥

गोपीचें वाक्शल्य त्या तपोनिष्ठास सहन न होऊन त्यानें ब्रम्हदेवाचें अनुष्ठान केलें.

## ४ दुर्वासास दृष्टांत.

उपजाति— मुनीस दृष्टांत वनांत झाला ।
“ वैकुंठिचा देव व्रजीं उदेला. ” ॥

मुनी गोकुळांत नंदगृहीं आला.

मुनी वदे नंदयशोधनेला :-।
“ देवासि दावा; बहु मी भुकेला. ” ॥१॥
मुनीसि तें देवघरांत नेती. ।
शोभे कुळस्वामिनि आदि-शक्ती. ॥
मुनी म्हणे:-“ थोर हिची प्रचीती, ।
उपासका दे धन धान्य संतती. ॥२॥
कोठें असे तो अवतार दावा, ।
जो पाहतां होत जिवा विसावा ! ॥

शब्देंचि देतो मनुजासि मुक्ती ।
देतो कटाक्षेंचि अलभ्य भक्ती. ” ॥३॥

नंद यशोदा स्तब्ध बसले.

निराश होऊनि मुनी निघाला. ।
दारीं हरी आडवितो तयाला. ॥
“ अहो तुम्ही कोण ? कुठूनि आला ? ।
कोठें कुणां जात पहावयाला ?” ॥४॥

मुमुक्षूस सद्‌गुरुचे हेच प्रश्न होत.

प्रश्नेंचि या बोध मुनीसि झाला ।
वैकुंठिचा नाथ समोर आला ! ॥
कृष्णासि वंदूनि मनांत धाला. ।
अगाध ही बालमुकुंद-लीला. ॥५॥

श्रीहरीची बाल-लीला पाहात दुर्वास मुनि गोकुळांत राहिला.

एकदां दुर्वासानें मनांत चिंतिलें, ईश प्राप्तीचा उपाय काय ? नंदांगणीं पाहतो.

## ५ गोपी श्रीकृष्णास यशोदेकडे नेतात.

उपजाति— मातेशि भीऊनि हरी पळाला. ।
माता वदे “ गे ! पकडा तयाला.” ॥
चौफेर घेरा धरिताति गोपी, ।
मातेकडे ठेविति वाट सोपी. ॥१॥

---

दाही दिशा कोंडुनि, एक वाटे ।
बसे यशोदा. हरि तीस भेटे. ॥
ही युक्ति दावी हरि त्या मुनीला ।
बोधी असे श्रीहरि बाळलीलां ॥२॥

मुनीस वाटलें दशेंद्रियनिरोधनानें श्रीहरि आपलेकडे वळतो पण पुन्हां पाहतो तों पेंद्याचे खांद्यावर हात ठेऊन श्रीकृष्ण प्रेमकथा सांगत आहेत.

## ६ दुर्वास व पेंदा.

उपजाति– दुर्वास पेंद्यासि हळूं विचारी :-।
" प्रीती तुशी कां करि वेणु धारी." ॥
येरू वदे :-" गाय पळ खुकारी।
ती नेत मी जेथ बस मुरारी " ॥१॥

दुर्वास उमजला. चपल मनांस हरि सन्मुख करावे म्हणजे हरीची दया होते. पेंदा गायी कसा वळवितो ही मौज पाहण्यास दुर्वासमुनी गोपाळावरोबर वनांत गेला.

## ७ पेंदा गायी वळून कृष्णा समोर आणतो.

उपजाति– ओढाळ नाठाळ कुटाळ लातरी।
पंचाळ धेनू पळते दिगतरी ॥
पेंदा तिला हाकि हरी समोरी।
आणी जिथें मोरमुगूटधारी ॥१॥

पेंदा म्हणतो:—

" सांभाळ कान्हा! तव धेनु आतां!
दिल्या हिनें आज बहूत लाता!" ॥
हरी वदे:-" तूं श्रमलासि ताता!"
मी रक्षितों साहजिं गीत गातां ॥२॥

गायीच्या पाठीमागें लागलें तर गाय दूर पळत होती. पेंदा तिच्या समोर जाऊन श्रीहरि सन्मुख नुसता उभा राहिला, तेव्हां गाय श्रीहरिकडें वळली; असें दुर्वासास दिसलें. पुढें ती गाय हरिचे स्वाधीन करून पेंदा स्वस्थ हरिगीत ऐकत बसला. श्रीहरि पेंद्यास म्हणतात:–

"'मी नाहिं मी नाहिं' वदूनि पक्षी, ।
मैना कसी स्वादु फलास भक्षी! ॥
'मी मी' म्हण त्यास कृतांत लक्षा. ।
त्या बोकडाला न कुणींच रक्षी!" ॥३॥

मनाचा निरोध निरहंकृतींत व्हावा.

---

सर्व गाई शांत वृक्षातळीं रवंथ करीत बसल्या तेव्हां गोपालांची आंधळी कोशिंबीर दुर्वास मुनी पाहूं लागला.

## ८ एकाचि कृष्णा धरिलें सख्यानीं

उपजाति—
पेंद्या, सुदामा, श्रुतिकर्ण, वांकडा, ।
योगी, जपी, कर्मठ आणि तकंडा, ॥
बांधूनि डोळे करितात्ति खेळा, ।
जाती धरायास तमालनीळा. ॥१॥
दाही जणे धावाति दाहि वाटें; ।
सर्वां करां येउनि शाम भेटे. ॥
धरूनि त्याला आणितात्ति नेटें, ।
जेथें बसे तो बळिभद्र थाटें. ॥२॥
"मी आणिला मीच हरी धरूनी" ।
दाही जणे बोलति निश्चयांनीं. ।
खोलूनि नेत्रा बघतां तयांनीं, ॥
एकाचि कृष्णा धरिले सख्यांनीं. ॥३॥

बळिरामदादा म्हणाले:—"बघारे गड्यानों! तुम्ही सर्व सारखे. सर्वांचें मनोरथ श्रीहरि पुरवितो." दुर्वासास वाटलें:—"सर्व शास्त्रांचें अंतिम ध्येय ईशप्राप्ति आहे." इकडे त्यांचें शिष्य शोधीत आले. मथुरेजवळ राजाश्रयांत दुर्वासाचें गुरुकुल व विद्यापीठ सुरू झालें. यमुना स्नान करून एकदां मथुरेकडें दुर्वास सर्व शिष्यांसह चालले.

## ९ दुर्वास व लमाण

शार्दूल०-विद्यामेरु, तपोनिधी मधुपुरा दुर्वास चाले मुनी,।
शिष्यांचा जयघोष त्रासवि जगा, जायी नभा भेदुनी.॥
खेटे त्यासि लमाण निर्भयपणे हाकी खरा आडवें.।
चेले ओरडती :-"अरे! मुनिवरां हीं खेटतीं गाढवें"॥१॥

तेव्हां शिष्य लमाणास म्हणतात :-

"ब्रम्हंडासि पळांत जाळि मुनिची कालाग्निसी वैखरी।
केला हा अवमान! नेणसि कसा तूं आपुली पायरी?"॥

तेव्हां लमाण उत्तर देतो:-

बोले येरु:-" उगे बसा! न मुनिला एका खराची सरी।
ब्रह्मांडासि अनंत नेति खर हे ब्रह्मांड ही मोहरी!"॥२॥

असें म्हणून लमाणानें एक मोहरी दुर्वासाचें हातावर ठेविली.

दिंडी- करी घेई दुर्वासमुनी राई।
लावि त्राटक. मग आंत जसा पाहो,।
दीन अनवाणी घोर वनीं जाई;
व्याघ्र धरि त्याला, आडवी अपायीं. ॥३॥
एक कैकाडी संकटांत तारी।
म्हणे:-" सुंदरि! मज होसि फार प्यारी."॥
तेथ दुर्वासा होत शीघ्र नारी.।
रुची घरवातिची सोवि गोड खारी. ॥४॥

शार्दूल० गेले जन्म कितीक. योनि फिरला दुर्वास नाना परी.।
जोडूनी कर संपुटासि विनवी:-"तारी मला श्रीहरी!"
देखे राइ करीं. परी न दिसती तीं गाढवें, जीं खरीं.[१]।
हासे नारद, गातसन्मुख विणा ठेवूनि खांद्यावरी. ॥५॥

---

१ खरोखर, खरांत.

नारद:–“तपोनिधी दुर्वास ! बहुत केला प्रवास !”

भुजंग० “बहू योनिमाजीं जगीं सैर केली, ।
दिसे तेथ दुर्वासनेचीच वेली.” ॥

दुर्वास:–“खाद्यावर काठी घेतलला तो लमाण कोठें ?”

नारद:–“माझे खांद्यावरची विणा ती काठी, व मी लमाण, दिसलों एकुण !”

दुर्वास:–“आणि गाढवे ?”

इतक्यांत एक शिष्य ओरडतो:–“स्वर चुकला गाढवा !”

इतर म्हणतात:–“चुकुं दे सात गाढवा !”

दुर्वासाचें छात्रवर्गात मत भेद, लाथाळीं सुरू झाली.

नारद:–“तपोनिधी ! शोधीत होता तीं आपलीं गाढवें सांभाळा !”

“उरीं काय वाहे कळेना नराला. ।
खरा सारिखा लेखितो पैं पराला !” ॥६॥

दुर्वास:–“पण राईमध्यें ब्रम्हांड दिसलें कसें ?”

नारद:–“कुठें ती राई ?” दुर्वास हातांत पाहतो तों राईसुद्धां नाहीं.

नारदः– धरी कोटि ब्रम्हांड जो रोमरोमीं, ।
वसे राम संपूर्ण तो रामनामीं. ॥
तया नेणुनी, घोकणी जी रिकामी ।
खरांची असे धावणी बेलगामी. ॥७॥

---

तेव्हां पासून दुर्वासांचें विद्यापीठांत शब्दार्थांची चर्चा सुरू झाली. रामायणाचें सार्थ पारायण आचार्यांनीं केलें. गोकुळांतल्या गोपी मथुरेस दहि दूध विकण्यास जात. त्यापैकीं एक दुर्वास-आश्रमांत येत असे. रामायणाचें समाप्तीच्या थाटांत राम नाहीं असें पाहून गोपी म्हणते:—

## १० गोपी व दुर्वास रामायण.

उपजाति- वाल्मीकि रामायण ग्रंथ बोले,।
आचार्य तें सांगति सार्थ डौलें ॥
गोपी म्हणेः–" राम इथें न आले।
रानीं बहू कोकलताति कोल्हे !" ॥१॥

शार्दूल० "ताताचें वचनीं, वनीं विचरतां, तारी जटायू खरा;।
तारी खोडिल वानरां, शबरिचीं बोरेंहि चाखी जरा;॥
मारी सर्व निशाचरासि, हरितां जो जानकी-सुंदरा;।
भेटे जो भरतासि; भूषवि अतां नंदाचिया मंदिरा. ॥२॥

" बापू ! असी पोथी वाच, कीं राम भेटे साच."

गोपी गोकुळास परतली. रामायणास महानैवेद्य व आरती होणार, इतक्यांत कंस-दूत म्हणतात. "राजास व्यथा होत आहेत. आरोग्याकरितां अर्धे राज्य देत आहे."

शिष्य:–"याचें नांव पारायण. प्रत्यक्ष फल राज्य. चला तपोनिधी ! राज्य घ्या. सर्व निघाले तोंच नारद येतात.

नारद:–"धन्य तुमचें पारायण ! ऐका जनकराजाची बैठक."

## ११ जनकराजाची बैठक.

जनकराजावर त्याचें ऐश्वर्यामुळें याज्ञवल्क्य प्रेम करितात, असा तात्कालीन कांहीं विप्रांचा गैरसमज होता. याज्ञवल्क्यानीं राजसभेंत चर्चा काढिली.

अनु०- "कोठार सांचिलें वित्तें, न देई सुख संचलें;।
देते दृष्टादृष्ट फला भोगी, दानार्थ वेंचलें ॥१॥

"त्यागेनैके अमृतत्व मानशुः" श्रुति सांगते, त्यागानें मोक्ष मिळतो.

**भाग्यवंत त्यजी वित्ता; संपादी भाग्य थोरलें.।**
**अभागी न जगा त्यागी; क्षणोक्षणिं विकारलें. ॥२॥**

---

आयुष्य हा जीवांचा जन्मसिद्ध संचय आहे. व त्याचा नित्य व्यय होतो. पण त्याचें व्ययाचा निरोध जीवाचें हातीं नाहीं. फक्त विनियोग आहे.

**आयु संचय जन्मींचा, सदा आमृत्यु पाझरे;।**
**विनियोग विचारावा, द्यावें नश्वर, कीं खरें." ॥३॥**

इतक्यांत याज्ञवल्क्यांनीं योगबलानें नगर पेटविलें.

**सांगती दूत राजासी :–"नगरा आग लागली,।**
**न शमेचि उपायांनीं; राजवाड्यांत पांगली." ॥४॥**

---

**पळाले विप्र त्या काळीं, गवाळीं हुडकावया.।**
**सावधान बसे राजा, न वेंची नश्वरीं वया. ॥५॥**

आग शांत झाली. आपआपल्या गवाळ्यांसह विप्र परतले. याज्ञवल्क्य (जनकास):– "राजवाड्यास आग लागली तरी तूं उठला नाहीस. आपआपलीं गवाळीं हे विप्र किती दक्षतेनें सांभाळितात!"

**जनकः– "त्रैलोक्य राज्य तें येवो, किंवा जावो लया क्षणीं;।**
**वसो हरिपदीं वृत्ती. सद्गुरो ! हीच मागणी." ॥६॥**

---

शिष्यः–बरें ! राज्य मिळाल्यावर अशीच बैठक करूं. तपोनिधी ! नारदाचें ऐकूं नका.

दुर्वासः–राज्य हस्तगत करूनच परतेन !

मथुरेस शिष्यासह दुर्वास मुनी आले. राजसेवकांनीं अत्यंत आदरानें त्यांना कंसाजवळ नेले. राज्य घेण्यास पुढें हात करून दुर्वास मुनी सरसावले. इतक्यांत ब्रम्हपुत्र नारदमुनि तेथें दत्त ! म्हणून उभे झाले.

## १२ कंसाच्या राज्याची किंमत.

शार्दूल० होता मूत्र-निरोध, कंस म्हणतो:-" वैद्यासि आणा कुणी.।
आणी जो मज मूत्र, अर्पिन तया राज्यार्ध याच क्षणीं. "॥
बोले नारद :-" राज्य येथ विकतें मूत्राचिया सारणी; ।
त्याला काय करूं? स्मरूं आम्हि सदा गोपाल-चूडामणी." १

---

गायी नारद :-"कृष्ण विष्णु हरि रे! तूं धांव नारायणा! "।
कंसा मूत्र सवेग होत डचकें. निर्मूळली यातना. ॥
बोले नारद :-"हा उपाय बरवा तापत्रया वारणा ! "।
तेव्हां कंस म्हणे :-"पुरे भजन हें! संगीत कांहीं म्हणा! ॥२॥

---

कंसास आरोग्य झालें. तपोनिष्ठ परतले.

कंस नारदास म्हणतो:—

## १३ कंसाचें वैराग्य.

आर्या-कंस म्हणे:-"नारदजी ! वैराग्याचा समुद्र तूंचि खरा.
सांडुनि सकल भोगा, फिरसी ब्रह्मांडिं गात एकसरा" १
नारद बोले:-"कंसा ! आम्हाहुनि थोर तूंचि वैरागी.।
त्यजिलें नश्वर आम्ही. शाश्वत तूं त्यागिसी महात्यागी !२
शाश्वत वस्तूसाठीं नश्वर कुणि सांडिती, नवल काय ?।
हरिवैरें नश्वर तूं जोडिसि. व्याली! खरी! तुझी माय."॥३॥
कंसासि धन्यता ही वाटे, म्हणुनी त्यजी निजार्थाला,।
परमार्थ सार अर्था टाकुनि जोडीतसे अनर्थाला. ॥४॥

हताश दुर्वासमुनी परतले. व वैतागून एकांतांत बसले. महानैवेद्य समर्पण करावयाचा तो कोणी ? " स्वयं धीराः पंडितंमन्यमानाः" असे प्रत्येक वर्गांतील शिष्ट उभे राहिले. प्रत्येक म्हणतो:-"मी श्रेष्ठतम आहे. मलाच सर्वांनीं आपापलीं मतें द्यावीत."

इतक्यांत नारदमुनी आले व म्हणतात.

## १४ मान कुणाचा ?

"सीतेचा शोध एक महिन्याचे आंत लावण्याकरितां सुग्रीवानें सर्व वानरास आज्ञा केली होती. त्या अवधींत शोध लागला नाहीं.

शार्दूल० सीता शुद्धि न लागली. कपिचमू व्याकूळ चिंतातमीं।
केली थोर चिता, जळन म्हणतो आधीं हनूमंत मी. ॥
"मी मानाधिक" जांबुवंत वदला, "पोरा न वृद्धा समी." ।
बोले मारुति. "वृद्ध त्यासि अवधी राहे जगाया कमी. ॥१॥
गेली संपत ज्या नरा जवळिची, कैसा गणावा धनी ? ।
नाही तोय, म्हणेल कां कुणि तरी त्या ओहळा स्वर्धुनी ?
ज्याची वृत्ति बहिर्मुखीं विखुरली, पावे कसा उन्मनी ? ।
गेला श्वास जया न राम भजतां, तो कायसा जन्मुनी ?" २

"बडा भायी बडा, क्या छोटा भायी बडा ?"

" मतमतांचा गलबला । कोणी पुसेना कोणाला " ॥

नारदांनीं दुर्वासास इत्थंभूत कळविलें.

दुर्वासः—"आलात का पुन्हां! निघा इथून !"

## १५ नारद कां फिरतो ?

शार्दूल०-दुर्वासा मुनि नारदासि पुसतोः-" धुंडूनि लोकत्रयां ।
कज्जा लाविसी. लाभ काय तुजला ? तूं हिंडसी कासया ?" ॥
बोले नारदः-" लाभ हानि सहजा नाहीं इथें आत्मया. ।
सत्संगीं रुचि देत सद्गुरु मला. हो काय थोडी दया !" ॥१॥

दुर्वास मुनी शांत झालें व म्हणतातः– " जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती ! नारदा ! माझा हा आश्रम केवल लोक-कल्याणासाठीं आहे. "

नारदः-जी ! हां ! मी गोकुळास चाललो. तेथेंच भगवद्भक्त संत आहेत. क्षुधित आपल्या आश्रमांत आज रामायणाचा प्रसाद मिळेल म्हणून आलों. येथें युद्ध-कांड चाललें आहे. व आपण म्हणतां “ निघ इथून ! ”

दुर्वास (सखेद):-“नारदा ! नैवेद्य समर्पण कोणी करावयाचा ?”

नारदांनीं तें काम स्वतः पतकरिलें. नैवेद्याची स्थाली भरून नारदांनीं दुर्वासास दिली व गोकुळाकडें चालले. प्रमुख शिष्ट त्यांचें मागोमाग निघाले. तों तेथेंही एक मौज दिसली.

## १६ फल कृष्णार्पण. ठुमरी.

**फल बेचन हारि चली व्रज में. ।**
**व्रजराज खडे इत संग खिलारी. ॥**
**गल मौक्तिक-हार दियो हंसिके,**
**फिर छीन लिये फलको सब डारी. ॥**
**कछु झोंक दिये जमुनाजलमें,**
**कछु फेकत भूमि मचावत रारी. ॥**
**बडभाग उदेजत वा फलको,**
**जिन्ह चाखत माखन-चोर मुरारी. ॥**
**कहे बालु गवालनः-“ वो मैय्या !**
**अति दुर्लभ हो कुइ नाथकि प्यारी !” ॥१॥**

नारदः–अगाध दातृत्व प्रभूचें ! कर्मफळाला मुक्ताफळाची माळा ! वैकुंठ-नाथा ! हा रामायणाचे समाप्तीचा महानैवेद्य शर्कराखंडखाद्यादि दुर्वास आपणास समर्पण करीत आहेत. ग्रहण करावा. ”

नैवेद्याकडें न पाहतां श्रीहरि दूर गेले.

नारदः–“ तपोनिधी दुर्वास ! व प्रमुख शिष्ट हो ! माळिणीची पाटी कौतुकानें श्रीहरिनें ग्रहण केली. भक्तांचें पत्र, पुष्प, फल, तोय श्रीहरि स्वीकारितो, कारण तें श्रीविष्णु प्रेरणेनें श्रीविष्णु प्रीत्यर्थ असते.

शिष्ट थाळी घेऊन आश्रमाकडे परतले.

नारदः–“ दुर्वास ! ठीक आहे ही आपली आचार-पद्धति ! अतिथीस कोसभर लांब आणून सोडून द्यावें, व आपण परत जाऊन जेवावें. ”

दुर्वासः–“माझा आश्रम लोककल्याणार्थ आहे. अधिष्ठान माझें आहे खरे. आश्रमाकरितां जे राबतील त्यांना योग्य वेतन मिळते. भंडारे करून आम्ही निरुद्योग वाढवीत नाहीं.”

नारदः–“मग चार आश्रमांपैकीं आपला आश्रम कोणते वर्गात मोडतो ? प्रपंच व संन्यास याची कथा ऐका.”

## १७ प्रपंच आणि संन्यास.

**प्रपंच कैसा मनुजें करावा ? ।**
**संन्यास कोणें मनुजें वरावा ? ॥**
**शिष्यें असा प्रश्न गुरूसि केला. ।**
**शिष्यासि घेऊनि गुरू निघाला. ॥१॥**

एका नगरींत दोघे आले. तेथील राजाची एकुलती एक कन्या गजराजाच्या शुंडादंडांत माळ देऊन, अंबारींत बसून, वर वरण्यास निघाली होती. गजराजानें एका तरुण यतीच्या गळ्यांत माळ घातली. तोच राजकन्येचा पति व राज्याचा मालक झाला. यतीनें जंगलांत धांव टाकली. श्रीगुरु म्हणतात.

**साम्राज्य संपत्ति, तरूण कांता, ।**
**टाकी तया येत विराग हातां. ॥**

शिष्यासि बोले गुरुः- "देख ताता !।
वैराग्य ऐसें धरि नीज चित्तां. ॥१॥

राजकन्या दासीसह त्या यतीच्या मागें जगलांत पळत निघाली. यति वनांत अदृश्य झाला. गुरुशिष्य त्या कन्येच्या पाठोपाठ गेले. रात्र झाली. राजकन्या दासीसह एका झाडाखालीं बसली. त्या झाडावर पक्ष्यांचें जोडें पिलासह राहत होतें. अतिथि सत्कार करावा म्हणून त्यांनीं चोंचीनें इंधन आणून अग्नी पेटविला, व अतिथि-क्षुधा-शमनार्थ स्वदेहाची सहपरिवार त्यांत आहुती दिली.

शिष्यासि बोधी गुरु :-"देख राया ! ।
आतिथ्य कर्मी झिजवीत काया ॥
तो योग्य संसार इथें कराया; ।
नाहीं तरी सर्व प्रपंच वाया." ॥२॥

नारदः—अतिथि विन्मुख गेला तर सर्व सुकृताची हानि, असी शास्त्राज्ञा आहे.

दुर्वासः-माझे आश्रमांत यथाकाल मी सागेन त्याप्रमाणें सर्वांनीं वागावें.

इतक्यांत श्रीकृष्णापुढें एक प्रकरण न्यायार्थ आलें तें असें:—

## १८ सोनार, शिंपी, भटजी व सुतार.

उपजाति- सोनार, शिंपी, भटजी, सुतार ।
वनांत गेले करण्या प्रचार. ॥
प्रत्येक देतो आपुला पहारा. ।
सुतार आधीं करितो विचारः- ॥१॥
वाया न न्यावी कधिं वेळ सारी, ।
म्हणूनि काष्टें घडि एक नारी. ॥

शिंपी तिला लेवावि वस्त्र भारी. ।
सोनार लेणें करुनी सुधारी. ॥ ॥२॥
प्राणप्रतिष्ठा करितां मुनीनें, ।
काष्ठाप्सरा नाचुनि गात गाणें. ॥
तिला वरावें कुणि ? कोणी नेणें. ।
चौघे बहू भांडति ते शहाणे. ॥३॥
ते मांडिती न्याय जया समोरी, ।
म्हणे " वरी, द्या मज नार प्यारी. " ॥

---

व्रजांत दाटी बहुता प्रकारीं ।
सांगे तिथें न्याय हरी मुरारीः- ॥४॥
"पूर्वील वृक्षातळिं हीस ठेवा; ।
सांगे तरू, तो वर हीस द्यावा. " ॥

---

तरू तळीं त्या पुतळीसि नेलें, ।
फाटूनि वृक्षें उदरीं ठिवीलें. ॥५॥

---

अंशासि पूर्व-स्वरूपींच जागा; ।
सिद्धांत दावी हरि या प्रसंगा. ॥
शुद्धार्थ हा टाकुनि शीण भागा ।
द्यावें कशाला ? कुणि येथ सांगा ? ॥६॥

नारदः-तपोनिधी ! आपली ' लोककल्याणाची संयुक्त संस्था ' चौघांनीं घडविलेली कष्टाची पुतळी. तिचें अधिष्ठान आपणच कल्पतरु! बरें वाईट कोणी केलें, तरी त्याचा समारोप शेवटीं आपणांतच.

दुर्वासः-हाय ! म्हणूनच तर छात्रवर्गांत कोणीही प्रमाद केला तर मी अन्नत्यागाचें प्रायश्चित्त करतों.

नारदः—हा संगतीचा परिणाम आहे.

## १९ संगतीचा परिणाम.

उपजाति— पिसाळला श्वान तरूसि बांधिला. ।
तरूसि तो ओरखडूनि चावला. ॥
तेव्हां तरू तीन दिसांत वाळला. ।
तोडूनिया कोणि चुलींत जाळला. ॥१॥
तो धूर ज्याच्या नयनांत गेला, ।
तो तो पिसा होउनिया निमाला. ॥

---

श्वानामधें राहत येथ शक्ती, ।
शक्ती किती थोर असेल भक्तीं ? ॥२॥
मला मिळो संतपदीं निवास. ।
पावेन सत्संगतिनें सुखास. ॥
हे संत आहेत खरे परीस. ।
हे भेटवीती मजला हरीस. ॥३॥

नारदः—श्रीहरिचे लाडके भक्त गोप व गोपी यांचे चरणधूळींत लोळण्यांत माझें देह-साफल्य आहे. ॥ जया भक्तीची येतुली प्राप्ती । जे कैवल्यातें परते सर म्हणती । जयांचे लीलेमाजि नीति । जियाली दिसे. ॥ कीर्तनाचेनि नटनाचें । नाशिले व्यवसाय प्रायश्चित्तांचें । जे नामचि नाहिं पापाचें । ऐसें केलें ॥ म्हणून श्रीहरि म्हणतातः— तयापासी पांडवा । मी हारपला गिवसावा । जेथ नामघोष बरवा । करिती माझा ॥ ज्ञानेश्वरी ॥

---

दुर्वास परत जातात. इकडे त्यांचा आश्रम शाखोपशाखासह जिथल्या तेथें बेपत्ता झाला. आश्रित वैतागानें हिंडूं लागले.

## २० निकामा वैतागी (अर्थवाद)

अनुष्टुप— निकामा एक वैतागी नारदापासि पातला ।
म्हणे "मुने! तुम्ही कांहीं सांगावी कीमिया मला". ॥१॥
वदे नारदः—"घे आधीं गोपीचंदन मृत्तिका, ।
न्हाउनि यमुना डोहीं, सर्वांगावरि सारवी. ॥२॥
उभा कुंजवनीं राही. हरिला आळवी सदा. ।
चातुर्मास असे कीजे. काया परिस होतसे." ॥३॥
ऐसें अनुष्ठितां त्यानें चातुर्मासहि लोटला; ।
शुभार्थ सिद्धिचा दाता सावळा कृष्ण भेटला. ॥४॥
भजनीं लाउनी नेती श्रीहरीपादुकाकडें, ।
हरिचे लाडके भक्त त्रैलोक्यामधि फाकडे. ॥५॥

---

श्रीहरीची कृपा झाल्यामुळें दुराशा सोडून वैतागी आपले पूर्वीचे उद्योगास लागला. अशा रीतीनें नारदांनीं कैक पांगलेल्या दीन जनांस हरिभक्तीनें आपापले स्ववर्णाश्रमोचित कामधंद्यास लाविले. इकडें लोकाचें मनांत दुराशा व महत्त्वाकांक्षा वाढवावी म्हणून दुर्वासांचा प्रयत्न विशेषतः ग्रामस्थ लोकांत सुरू झाला.

## २१ कुणबी व स्वकर्म—निरत निरिच्छ भजन.

आर्या—कुणबी कुटुंब—भरणा लाकुड फोडीत जाय नित्य वनीं ।
बोले दुर्वास तयाः—"शिणसी देहें, तसा बहूत मनीं. ॥१॥
पृथ्वीचें मोलाचा लाल तुला देत मी, धरी हातां; ।
पुरवील अन्नवस्त्रा याची किंमत तुझ्या पिढ्या साता." ॥२॥
कुणबी मोळी सांडुनि आनंदानें जसा घरां जात, ।
तों एक घार लाला घेऊनि उडे नभीं अकस्मात. ॥३॥
सकुटुंब उपासी तो कुणबी, निःशक्त दूसरें दिवसीं ।
फोडी वनांत लाकुड. वैभव आशा रिघे मनीं त्रिवशी ॥४॥

**पृथ्वीसि जिंकण्याचा देतो दुर्वास त्यासि एक हिरा, ।**
**मार्गीं नदीसि लोंढा येउनि कुणबी वहात जात पुरां. ॥५॥**
**पूरांत हिरा हरपे. सायासें ठेंच खात येइ घरां. ।**
**रडती पोरें:-"बाबा! काय तुम्ही आणिलेत या उदरां?" ॥६**
**तिसरे दिनिं दुर्वासें पाच दिला, घट्ट बांधिला गांठीं. ।**
**मार्गीं तस्कर लुटिती. उरली त्याला कुऱ्हाड लंगोटी. ॥७॥**

नारदानीं भगवद्भक्त गांवोगांवीं ठेविलेंच होते.

**करि सांतवन तयाचें, बोले मग एक वृद्ध शेजारीः- ।**
**"देतें सरपण रोटी, लाल, हिरे, पाच साच बेजारी. ॥८॥**

तरी लोकांची धवळारें । देखूनिया मनोहरें । असती आपलीं तणारें । मोडावीं केवीं ? ॥ज्ञाने० ॥

**जा फोडि नित्य सरपण, घावा घावांत आठवी रामा, ।**
**निजकर्म निरत भजतां संपत्ती देत राम निष्कामा." ॥९॥**

कुणबी रामनाम स्मरण करीत पूर्व वृत्तीस लागला.

**तोडी सुकलें झाडा. घरटें वरि रिक्त तेथ घारीचें. ।**
**दाणें त्यांत कशाचें? सान तरी ते म्हणूं जवारीचें. ॥१०॥**

वृद्ध शेजाऱ्यास ते दाणे दाखविले. तो कुणब्यास नारदाजवळ घेऊन आला.

**बोले तयासि नारदः-"हे मोतीं. घारि त्या घुले खाती. ।**
**निजकर्मीं हरि भजतां, मुक्ताफळ लाधलें तुझे हातीं." ॥११**

नारदः-"सहजं कर्म कौंतेय सदोषमपि न त्यजेत्" जन्मादारभ्य प्राणिमात्रास ओघानुसार जें कर्म आवश्य कर्तव्य, तें त्याचें सहज कर्म होय. आपापलें सहज कर्म करितो, व श्रीहरीस भजतो, त्यास इहलोकीं सुख, व अंतीं मोक्ष लाभतो.

कुणबी:-सरपण न फोडतों तर मला रोटी व मोती मिळालें नसतें.

नारद:-सरपण तोडण्यानें तुला रोटी मिळते, व भजनानें मुक्ती. सृष्टिकर्त्याची सर्व प्रजेस अशी आज्ञा आहे:- तुम्हा वर्ण विशेष वसे। आम्ही स्वधर्म विहिला असे। याते उपासा, मग आपैसे। पुरती काम॥ तैसें सर्व सुखेंसहित। दैवेचि मूर्तिमंत। येईल देखा काढत। तुम्हापाठी॥

स्ववर्ण विशिष्ट धर्माचरणांत ईश्वर संतुष्ट होतो, म्हणून अदृष्ट फलदायक दैव सहायास येऊन दुःख निवारण करिते. याचें विरुद्ध, अग्निमुखी हवन। न करील देवता पूजन। प्राप्त वेळें भोजन। ब्राह्मणाचें॥ विमुख होईल गुरुभक्ती। आदर न करील अतिथी। संतोष नेदील ज्ञाती। आपुलिये॥ तया मग अपावो मग थोर आहे। जेणें तें हातीचें सकळ जाये। देखा प्राप्तही न लाहे। भोग भोगूं॥ हे पहा दोघे.

## २२ भाविक बसाप्पा आणि खंडोजी झटाळ.

**झटाळ, भाविक, पंथा क्रमिती. भाविक भजतो हरी,।**
**तयाची कुटिल करी मस्करी. ॥१॥**
**पथीं शिवालय येतां, भाविक पूजी शुद्धांतरीं.।**
**पारसा कुटिल खात भाकरी. ॥२॥**
**पूजा सारुनि परते भाविक. पदिं कांटा कातरी.।**
**मिळाला होन झटाळा करीं. ॥३॥**
**झटाळ हिणवी:-"शिव भजनें ही होत दुखापत खरी.।**
**न भजतां धन दौलत मज वरी." ॥४॥**

कांट्यापेक्षांही या बोलाची जखम भाविकाचे उरांत सलं लागली

**उरीं सुरी ही. मूर्छित भाविक धरणी-शय्या धरी,।**
**तयाला नारदमुनि सावरी. ॥५॥**

नारदांनीं भाविकास उपचारानें शुद्धिवर आणिलें. वादाचा विषय भजन, व मूर्छेचें कारण कुटिलोक्ती, असें समजलें. नारदांनीं प्रत्यक्ष निर्णय दाखविला. कंटकस्थानीं भुजंग व होनाच्या ठिकाणीं निधी, हे दोघास दाखविलें. नारद म्हणतातः—

**" कंटक तेथें सर्प, देख हें मरण भाविका ! परी ।**
**सदाशिव टाळी कांट्यावरी. " ॥६॥**

कांटा न टोंचता तर पुढचें पाउलात सर्पदंश झाला असता.

**" होन तिथें हा निधी झटाळा ! भाग तुझा ने घरीं. " ।**
**कुटिल मग सत्वर हडपी भरी. ॥७॥**
**संत-छलाची त्वरित प्रचीती. दिसलें सोनें तरी, ।**
**कोळसे झाले कुटिला करीं. ॥८॥**

---

**भाविक बोलेः–" नकळत भजतां दुरित पळालें दुरी, ।**
**लाभली सहज संत-पायरी " ॥९॥**

भाविक बसाप्पा:–( नारदास साष्टांग नमस्कार करून ) मुनिवरा ! मी मूढ, फिरतीवर हिंग जिरे विकणारा, नुस्ता रस्ता कटावा म्हणून भजन म्हणत होतो. आईनें सांगितलें " वाटेवरच्या देवास डावलूं नको !" म्हणून शिवदर्शनास गेलो. मृत्यू टळला, व आपली दया, दर्शन दिलें.

नारदः–आकल्प दीर्घ यात्रेंत हरिनामच सर्व सहायक सोईची संपत्ती आहे. मातापितराशा क्षेमकारक आहे. श्रद्धाच डोळा आहे.

श्रद्धया लभते ज्ञानं.

खंडोजी झटाळः–माझें प्रारब्ध सोन्याचें, त्याचे तुम्ही कोळसे केलेत. माझे सोनें द्या.

नारदः–तुझें प्रारब्धास आम्हीं कांहीं केलें नाहीं. मी आतांच देतों माझं सर्वस्व. हा तंबोरा घे, कर भजन !

कुणबीः– तुझें प्रारब्ध सोन्याचें म्हणून नारदाचे दर्शन झालें. अजून तरी त्याचें कोळसे करू नकोस. ॥ निधानाचि निदैवा । होय कोळसियाचँ उडवा । जे असते आपण पै जीवा । नाही झाले ॥ ज्ञा०

खंडोजी झटाळः–माझा जन्मसिद्ध हक्क सोन्याचा हंडा मिळाल्या–शिवाय मी येथून जाणार नाहीं.

कुणबी व भाविकः–आमचा जन्मसिद्ध हक्क आईबापगुरूंची सेवा व हरिभजन आहे. आम्ही आपले कामास जातो. ( जातात )

आठ दिवसानीं नारदमुनि कुणबी व भाविक बसाप्पासह, खंडोजी झटाळाच्या शोधार्थ आले. खंडोजी होनाच्या घटाजवळ आसन्न मरण पडला होता. सावध करून विचारल्यानंतर आपली हकीकत सांगतो.

## २३ होनाचा घट आणि समंध.

**शार्दूल०–होनाचा घट नित्य तो मज दिसे, मी जाय घेऊं त्वरें ।**
**कुंथूनी उचली घटासि, मन हें लाचावतें हावरें ॥**
**" घे सोनें ! " म्हणुनी समंध सडकी. अंगीं शिरें कांपरे ।**
**जागा होत तरी, न अर्थ पदरीं. पै संसृती नावरे. ॥१॥**

नारदः– ॥ आग्रहाचा पाइक । विचंबे वाया ॥ ज्ञाने० ॥

अर्थेऽह्यविद्यमानेऽपि संसृतिर्ननिवर्तते । ध्यायतो विषयान्पुंसः स्वप्नेऽनर्थागमो यथा ॥ खंडोजी ! तुला त्रिदोष झाला आहे. दुराचार, दुरभ्यास, आणि दुर्वासना. पहिला दोष दुराचार. तूं स्नान देवतार्चन न करिता, हवे तेथें हवे तेव्हां हवें तें खातोस. ॥ जे देहचि आपण पै मानिती । आणि विषयातें भोग्य म्हणती । या परते न स्मरती । आणिक कांहीं. ॥ हे यज्ञोपकरण सकळ । नेणतसांते बरळ । अहंबुद्धि केवळ । भोगूं पाहती. ॥ इंद्रियरुची सारिखे । करविती पाक निके । ते पापिये पातकें । सेविती जाण ॥ ज्ञाने० ॥ पापांचे योगानें रोगोद्भव आहे. आरोग्याची युक्ती अयोध्यावासी रामभक्तास माहित होती ती ऐका.

## २४ अयोध्यैंत धन्वंतरी.

शार्दूल०-सेवा-भाव बिभीषणें रघुपुरी धन्वंतरी धाडिला. ।
झालीं वर्षशतें न रोग गवसे. रामापदीं बोलिलाः-॥
" सेवा व्हावि म्हणूनि येथ वसलों. कोणी पुसेना भला. ।
आयुर्वेद समूळ मी विसरलों. आतां रजा द्या मला. ॥१॥
बोले मारुतिः-" रीत येथ बरवी या रामभक्तां असे; ।
शब्द-स्पर्श-रसादि अन्न बहुसें कोणी न चाखीतसे. ॥
अन्ना नामसुधेंत राम करितां पीयूष तें होतसे. ।
ऐसें अन्न भुकेसि स्वल्प मिळतां, तें रोग कोठें वसे ? ॥२॥
बोले वैद्यः-" वृथाचि शास्त्र अवघें निःसार मीं घोकिलें. ।
जें तापत्रय वारि नाम हरिचें, कर्णी न तें ऐकिलें. ॥
शास्त्रांचा मज घोर रोग बहुता जन्मांतरीचा पहा, ।
सद्बोधें गुरु माउले ! सहज तो गेला लयाला अहा !" ॥३॥

नारदमुनिः-गुरुगोत्र अग्नि पूजी । अवसरीं भजे द्विजीं । निमित्तादिकीं यजी । पितरोद्देशें. ॥ तें सुखें आपुले घरीं । कुटुंबेसी भोजन करी । कीं भोग्याचि तें निवारी । कल्मषपातें ॥ ज्ञा० नाम घेता ग्रासोग्रासीं । जेविला तो उपवासी ॥तु०॥ तें यज्ञाविशिष्ट भोगी । म्हणोनि सांडिजे तो अघीं । जयापरी महारोगी । अमृतसिद्धि ॥ स्वधर्में जे अर्जे । तें स्वधर्मेचि विनियोगिजे । मग उरें तें भोगिजे । संतोषेसी ॥ज्ञाने० ॥

---

नारदाज्ञेनें खंडोजीस शिवालयांत नेऊन ठेविलें. शिवदर्शन व तीर्थ प्रसादानें त्यास आरोग्य झालें. तीन दिवसांनीं प्रातःकाळीं नारदमुनि तेथें आले. भाविक बसाप्पा, खंडोजी आणि कुणबी नामस्मरण करीत यमुना-

---

१ अयोध्येस.

स्नानास आले होते. त्रिवर्गांनीं नारदास नमस्कार केला. कुणब्यानें कुऱ्हाड झाडाचे फांदीस लटकावली.

खंडोजी:-आपले आशीर्वादानें देहरोग राहिला. अद्याप माझा शत्रू पाठीस लागला आहे. मी रात्र जागूनच काढतो.

नारद:-कोण कुणाचा शत्रू! ऐका वृक्षकुठार संवाद.

---

## २५ वृक्ष कुठार संवाद.

**शार्दूल०-बोले वृक्ष कुऱ्हाडिला :-"मजसवे निष्ठूर कां वागसी ? ।**
**रानीं वास्ति मसी. भुईत तुजला. निर्वैर तूसी मसी " ॥**
**बोले तेथ कुऱ्हाड :-" दांड बनुनी माझें उरा भोंकिसी. ।**
**तूझें वैर तुला. नरा परि परा कां दोष तूं लाविसी ? " ॥१॥**

नारद:-म्हणोनि आपणया आपणाचि रिपू । जेणें वाढविला संकल्पू ॥ खंडोजी ! तूं दांडपणाचा संकल्प करून दुरभ्यास केलास. त्याचीच आवृत्ती स्वप्नांत करितोस, तुझा समंध तूंच आहेस. आग्रहाचा पाइक । विचंबे वाया ॥ ज्ञाने० ॥

इतक्यांत झाडाखालीं एक निद्रित इसम फाड फाड आपले गालांत मारून घेऊं लागला. त्यास जागे करून विचारितां, तो आपली कथा सांगतो.

## २६ चोर आणि मी.

**शार्दूल० अंधारीं भ्रमलों, परी क्रमितसे पंथासि मी तातडीं. ।**
**मार्गीं गाठित चोर एक मजला देखूनिया सांकडीं. ॥**
**केली कुस्ति तयासि पाडुनि भुई, मी मारिली थापडी. ।**
**माझा गाल सुजूनिया ठणकतां मी जागलों ते घडी ॥१**

नारद:-कां महाशय! आपणास अंधकारांत मार्गक्रमणाची बरीच

प्रगति आहे! धनिकास लुटून आपण साव झालात. आपणांस लुटणार मात्र आपला शत्रु, चोर! ॥ व्यामोहाचिये सेजें। वळिया अविद्या निद्रित होइजे। ते वेळीं दु:स्वप्न हा भोगिजे। जन्ममृत्यूचा ॥ज्ञा०॥

जागे व्हा पुरते! नाहीं तर स्वत:स खंजीर माराल. ॥ आपणचि आपणया। घात कीजत असे धनंजया॥ देखा स्वप्नीचेनि घायें। कीं मरे साचे॥ ज्ञाने० ॥

चोर:– माझा चोर मीच.

खंडोजी:–(नारदास) प्रभो! उमजलों. माझा समंध मीच. हा दुरभ्यास जाण्यास उपाय काय?

नारद:–सदभ्यास. सत्संग. हा अखंड पाहिजे. आतां तिसरा तुझा दोष दुर्वासना. ही जीवास जडलेली अनिष्ट खोड आहे. एकदां अंगिकार केला तर ही अनंत प्रवाहांत पाडते. हें पहा.

इतक्यांत यमुनेंत वाहात असलेला प्रवाही ओरडतो. "घोंगडें सोडीना!"

## २७ घोंगडें सोडिना!

शार्दूल० वाहेसें यमुनेंत भासत. मला तें कांबळें आवडे।
तें मी घेउं जसा जलांत सरलों, माझें उराशीं दृडें. ॥
तीरस्थां विनवूं तरी म्हणति:–"ये! सोडूनि तीराकडें"।
सोडी मी. कवळी रिसापरि मला, हें सोडिना घोंगडें. ॥१॥

नारद:–अरे मोठ्यानें नामघोष करा:– श्रीगुरुदेवदत्त!

सर्वजण व प्रवाही:–श्रीगुरुदेवदत्त!

या नामघोषासरसे अस्वल प्रवाह्यास सोडून वहात चालले. प्रवाही पोहत तीरावर आला. नारदास साष्टांग नमस्कार करून स्वकथा सांगतो:—

प्रवाही:-माझी संसार कहाणी दीर्घ व निःसार आहे. इत्यर्थ, पितराज्ञा अव्हेरून एका घोर प्रवाहांत पडलो, तों इकडें सर्व नष्ट झालें. पुन्हां संसार उभारावा म्हणून बालमित्र राजापाशी वित्तार्थ गेलो.

## २८ राजाच रंक.

**शार्दूल०-राजा सन्निध हात जोडानि उभा, गेलों करूं याचना. ।**
**राजा ध्यान करी. नमूनि विनवीः-"देवा! मला दे धना!"॥**

ध्यान प्रार्थना विसर्जन करून राजेसाहेब मला विचारतात; तुला काय पाहिजे?

**बोले मी :-"नसतां तुलाचि पुरतें, मी काय मागूं कुणा ? ।**
**जातो मी गुरुदत्त देत इतुकें, जेणें नुरे कामना. ॥१॥**

प्रभो नारदा! गुरुदेवांच्या शब्दांत मी सुखी होतो; पण घोंगड्याचे दुराशेनें पुन्हः घोर प्रवाहांत पडलो. आपण सद्गुरुची स्मृति न देतां तर मेलोंच असतो.

नारदः-खरोखर पूर्व-वासना घोर प्रवाहांत पाडिते. प्रत्यक्ष भगवंत म्हणतात.

जैसी सकामा न जिणवेचि वनिता । तैसी मायामय हे सरिता । न तरवे जीवा॥ येथ एकचि लीलां तरले। जे सर्व भावें मज भजले । तया ऐलीच थडी सरलें । मायाजळ ॥ जया सद्गुरु तारू फुडें । जे अनुभवाचें कासे गाढे । जया आत्मनिवेदन तराडें । आकळिले ॥ येणें उपायें मज भजले । ते हे माझी माया तरले । परि ऐसे भक्त विपाइले । बहुवस नाहीं ॥ ज्ञाने० ॥ या मनाचें एक निकें । जे देखिलिया गोडीचिया ठायीं सोके । म्हणूनि अनुभवसुखचि कवतिकें । दावीत जाइजे ॥ अनुभवसुखाची सतत स्मृति होण्यास सत्संगच उपाय आहे. म्हणूनच मी सतत गोकुळात फिरतो.

प्रत्येक आपापले कष्ट आठवून सुस्कार टाकूं लागला. इतक्यांत वृक्षही कंपायमान झाला. त्याचें कारण नारद विचारतातः–

## २९ वृक्ष कां हालतो.

**शार्दूल०–" रे वृक्षा ! बहु हालसी स्थिर पदीं कां रे ! असा कांपसी ?"**
**बोले वृक्षः–"उभा स्वधर्म भजतों वाताशनी तापसी. ॥**
**कोणी तोडिति, साल काढिति कुणी, हे जाळिताती मसी. ।**
**सारे लोक इथें खटाळ बघुनी मी होत कासाविसी. " ॥१॥**
**नारदः-ब्रह्मा तो कमळांत जाउनि बसे भीऊनि दैत्या कुणा. ।**
**शंभू राखजटाभरीं, मिरवतो वेडा असा दुर्जना. ॥**
**विष्णू वंचक टाळण्यासि निजला शेषाचिया आसनां. ।**
**ब्रह्मायी गुरुवीण कोण सहजा नाशी तुझी वासना ? ॥२॥**

नारदः–अरेरे ! मासी आपणातें गिळवी । आणि पुढिलातें शिणवी ॥ अशी स्थिती कैक मानवांची आहे.

**आर्या–भूतें तरुपक्ष्यादिक निजधर्मी वर्तुनी हरी भजती. ।**
**त्यजुनि स्वधर्मा,करिती धर्मच्छल त्या नरासि कोण गती ? ३**

खंडोजीः–(अनुतापानें) प्रभो ! मी त्यापैकींच खटाळ झटाळ आहे. मला तारा !

नारदः–(त्याचें मस्तकावर हात ठेऊन) तूं आतां खटाळ नाहींस. अनुतापानें शुद्ध आहेस. भाविकाचें सत्संगांत कल्याण आहे.
"कल्पनेची बाधा न हो कोणे काळीं. । हे संत मंडळी सुखी असो. ॥
अहंकाराचा वारा न लागो राजसा । माझिया विष्णुदासा भाविकासी."

नारदास सर्व नमस्कार करून आनंदांत गेले. नारद ही नित्याप्रमाणें गोकुळांत प्रभु–दर्शनास आले. त्यांचें मनास वृक्षाचे बोल सलत होते. तों बळरामदादा श्रीकृष्णास समजावीत होते.

## ३० श्रीकृष्णबळराम–संवाद.

श्रीकृष्णः–अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधंच संश्रिताः । मामात्मपरदेहेषु प्रद्विषंतोऽभ्यसूयकाः ॥ तानहं द्विषतः क्रूरान्संसारेषु नराधमान् । क्षिपाम्यमजस्रमशुभानामासुरीष्वेव योनिषु ॥

॥ सती आणि सत्पुरुष । दानशीळ याज्ञिक । तपस्वी अलौकिक । संन्यासी जे ॥ कां भक्त हन महात्मे । इये माझीं निजांचीं धामें । निर्वाळलीं होमधर्में । श्रौतादिकीं ॥ तयां द्वेषांचेनि काळकूटें । बासटोनि तिखटें । कुबोलाची सदटें । सूति कांडे. ॥ मळ जेणें मैळे । ताप जेणें पोळे । जयाचेंनि नांवें सळे । महाभय ॥ पापा जयाचा कंटाळा । उमजे अमंगळ अमंगळा । विटाळही विटाळा । बिहे जया ॥ ऐसे विश्वाचेया वोखटेया । ते ते होती भोगूनिया । तामसा योनी. ॥

सर्व गोपाळ थरथर कापूं लागले. बळिरामदादा म्हणतातः–

**आर्या–"तारिसि भाविक भक्तां, कृष्णा! या माजि कायसी महती?।**
**तारी खटा शठाला. अगतीला तूं कृपाळु होय गती."॥१॥**

" कृष्ण कृष्ण कृपालुस्त्वमगतीनां गतिर्भव." [पांडवगीता]

श्रीकृष्णः–(नारदाकडे पाहून हांसत) मी नाहीं जात खटाशठाकडे हा नारद जाईल.

**नारदः–रामा! खटाशठाचें कंटक रुपतील कोमला पायीं. ।**
**मी झाडपिड्या, कंटक झाडिन, सेवा रुचेल जरि कांहीं. ॥**

झाडूं संताचे मारग । आडरानीं भरलें जग ॥

नारद मथुरेकडे निघाले. कंसाच्या कुशल मंत्रिमंडळांनीं नूतन कलायंत्राचे धर्मध्वंसक, भक्तिभंजक, श्रद्धाखंडक कारखानें काढिले होते. त्यांचा माल स्वधर्मनिरत भाविकांत खपविण्यास अनेक बुद्धिभेदक चार्वाक शास्त्री वेतनें देऊन जागोजागीं ठेविले होते. व्रतनियम, देवधर्म, यज्ञयाग, उपनयनविवाह सब झूट; साधुसंत, भक्त हे धूर्त आहेत;

स्वैरवर्तन हाच पुरुषार्थ; असा उपदेश ते शास्त्री करीत. ॥ गुण ते ते व्यवस्थित । दोषचि मानी ॥

## २१ बुद्धिभेद शास्त्री.

**उपजाति–** **शास्त्री निघाला उदरा भराया. ।**
**आक्रोश मांडी जग उद्धराया; ॥**
**" हे देव भोळे पडताति पाया ।**
**धूर्तांचिया पैं बुडताति वाया. " ॥१॥**

शास्त्रीबुवांचें मुख्य तत्त्व, संतांकडे जाऊं नका. आमचें ऐका.

**दोषांजना लेवुनिया निजाक्षां, ।**
**करूं निघाला जगतीं परीक्षा. ॥**
**बोले तया नारद संत-भक्त :–।**
**" दारां सुधारूनि बसे घरांत. ॥ ॥२॥**
**तूं तर्जनीं लाविसि जें परासी, ।**
**तों तीन बोटें तुझिये उरासी. ॥**
**देखे स्वदोषां, अभिमान सोडी, ।**
**घे सद्गुणा. घे हरिनाम गोडी. ॥३॥**
**तूं पूर्वकर्मा स्वमतेंचि केलें, ।**
**कृतांतवत् जाळित तूज ठेलें. ॥**
**आयुष्य दोष ग्रहणांत गेलें. ।**
**घाणीतले जंत अनंत मेले ! " ॥४॥**

नारदांनीं शास्त्रीबुवांच्या कारस्थानांची झडती दाखविली. जे जे दोष इतरास शास्त्री लावित, ते ते त्यांच्याच अंगांत आहेत, असे त्यांना अनुभवास आले. नारदाचें दर्शनानें बुद्धिभेद शास्त्रीस उपरति झाली.

---

१ स्त्री अथवा इंद्रियद्वारें.

शास्त्री स्वदोषासि जधीं तपासी,।
म्हणेः–" स्वतां घेइन आज फासी. ॥
जाईन पै या स्वमतें तमासी,।
होईल माझीच जगांत हासी. ॥५॥
भेटे उद्या त्यासि गुरू वरीन.।
सांगेल तो तीचि क्रिया करीन. ॥
भेटेल श्रीराम तरी तरेन.।
किंवा गुरूच्या वचनीं मरेन." ॥६॥

नारदानीं कांहीं साथी समागमें घेऊन शास्त्रीस वाटेंत गांठले.

संताळ भेटे कुणि वाटमारा;।
शास्त्री नमी टाकुनि गर्व सारा. ॥
म्हणेः–"गुरूजी! मजलागि तारा.।
श्रीराम दावा. मजला सुधारा." ॥७॥

नारद म्हणतातः—

"संताळ आम्ही नरवीर खारें.।
मारूं तुला, घेउ धनासि सारें. ॥
टाकी मुद्या, कुंडल, अंगलेणें.।
कौपीन देतो तुज मी दयेनें. ॥८॥
बांधूनि पाषाण तुझ्या गळयांत.।
देतो समाधी तुज या तळयांत. ॥
पैं आमुच्या तूं पडलासि पायां,।
म्हणून मी सांगत या उपायाः– ॥९॥
दाबूनि घे नाशिक नेत्र कर्णा;।
तोंडा मिटीं; सोडु नकोचि प्राणा;॥
बैसे उगा, जों तनु-भान आटे;।
किंवा तुझें मस्तक जों न फाटे. ॥१०॥

**श्रद्धा तरी दैव दयाळु भेटे, ।**
**नाहीं तरी कर्म तुझेंचि खोटें. ॥**
**स्वेच्छा जरी सोडिसि तूं सुखास. ।**
**तैं आत्महत्या तुजलाचि खास. ॥११॥**

**कुटाळकीचा मुखिं हा विटाळ. ।**
**नेत्रीं तुझ्या ही परदोष धूळ. ॥**
**कानांत दाटे बहु संत-निंदा. ।**
**कधीं दया येइल त्या मुकुंदा ! ॥१२॥**

**त्वां घातिला आजवरी हमामा, ।**
**रे वंचका ! येइल कोण कामा ? ॥**
**आतां सुखें बैस इथें गुलामा ! ।**
**निर्वाणिच्या तूं जप रामनामा." ॥१३॥**

शास्त्रीबुवानीं लक्षपूर्वक पाहिलें तेव्हां त्याला, लुटारू संताळाचें वेषांत नारद दिसले. हात पाय गळाले.

**संताळ शास्त्रीसि तळयांत टाकी. ।**
**बैसे धुनी लावुनिया तटाकीं. ॥**
**बोले पुन्हां:-"ठेवि मिटूनि तोंडा. ।**
**डोक्यांत हा घालिन देख धोंडा. " ॥१४॥**

याप्रमाणें कांहीं श्रद्धेनें, कांहीं विवश होऊन, निमूटपणें शास्त्रीबुवा तीन दिवस तळयांत बसून राहिले. सद्गुरुनीं जबरदस्तीनें साधन करवून घेतलें.

**दोषासि तो कुंभक पूर्ण जाळी ।**
**वैकुंठिची मूर्ति समोर आली ॥**

सद्गुरुनीं तलावाचे तटाकावर बसून त्याचे समाधीची परिपूर्ती स्वसामर्थ्यानें केली. व दिव्य दर्शन दिलें.

बाहेर त्या सद्गुरु-नाथ आणी।
म्हणेः-"गड्या ! सांग तुझी कहाणी " ॥१५॥
शास्त्री वदेः-"सद्गुरुजी ! दयाळे।
जन्मूनि मी पापचि घोर केलें. ॥
नाथा दयेनें परि या स्वलीलें,।
ऐशा खटाला मज उद्धरीलें. ॥१६॥
जन्मांध होतो न बघे स्वदोषां।
घालूनि दिव्यांजन हें ममाक्षां ॥
श्रद्धेचिया तें उघडूनि डोळा।
हा आणिला सत्यपदीं दयाळा !" ॥१७॥

तात्पर्य:-स्वदोष पाहाणारा अंध आहे. आणि श्रद्धा हाच डोळा आहे. खटाचाही उद्धार दयाळू संत करितात.

शास्त्रीः- प्रभो ! आपण जबरीनें रामनामस्मरण करविलें हा मजवर महदनुग्रह आहे. मी याचें महत्व समजत नसे. ॥ जे जन्म सहस्र ओळगिजे । एक वेळ यावया ॥ज्ञाने॥. माझा एक समव्यवसायी सांगतो रामनामस्मरणादिक वृथा. सर्वांनीं वेदशास्त्रांचा अभ्यास करावा.

नारदः- ॥ नाम जप यज्ञ परम । बांधू न शके कर्माकर्म । नामें पावन धर्माधर्म । नाम परब्रह्म वेदार्थीं ॥ज्ञाने० १०॥ ना तरी एकादें नांव । तेंचि शैव कां वैष्णव । वाचें वसे तें वाग्भव । तप जाणिजे ॥ज्ञा० १७॥ तैसे द्विजासि ब्रम्हसूत्र। येरा शूद्रादिका नाममंत्र ॥ज्ञा०॥ परंतु गुरूमुखानें वेदार्थांचा प्रकाश न झाल्यामुळें नामस्मरणाचें महत्व समजत नाहीं. अरे हें कांहीं नवीन खूळ नाहीं. पूर्वीं रामावतारांत शंबुकादि शूद्र व रावणादिक ब्राम्हण रामनामाची महती समजत नसत.

———

## ३२ शंबुक आणि गुहक.

वेदशास्त्र इतिहास पुराणा ।
घोकि शंबुक अखंड शहाणा ॥
त्यासि आड पडला पाथ ओढा, ।
पूर दाटत. जला बहु ओढा. ॥१॥

तेथें नावेंत गुहक होता. शंबुक नावेंत बसला. रामनाम स्मरत गुहक नाव चालवूं लागला.

रामनामिं गुहका रसवंती, ।
राम तो प्रगट उज्वल चित्तीं. ॥
त्यासि शंबुक वदेः–" पर-तीरा ।
ने त्वरें. रटसि काय गव्हारा !" ॥२॥

धीवरा चिडवि शंबुक बोलेः– ।
"वेद-हीन तव हें वय गेलें ॥
पोसिलें निज शरीर घमेलें, ।
भासलें जरि जितें परि मेलें " ॥३॥

त्यावर गुहक शंबुकास म्हणतो:–

"वेद सर्व कळतोचि वसिष्ठा. ।
देति नामिं मज यापरि निष्ठा. ॥

गुरु वसिष्ठांचा उपदेश असा आहे.

नाव नेत जसि ही परपारीं ।
राम-नाम भव-सागरिं तारी " ॥४॥

हे सात्त्विक मति जया । निर्वाहति होय धनंजया । बागूल नोहें तया । कैवल्य तें ॥ तो न पढो कां ब्रम्हसूत्र । न लोढो सर्व शास्त्र । सिद्धांत न होवोत स्वतंत्र । तयाच्या हातीं ॥ परि श्रुतिस्मृतींचे अर्थ ।

जे आपण होऊन मूर्त । अनुष्ठानें गाजत । वडील जे हे ॥ तयाची आचरती पाउलें । पाऊनि सात्त्विकी श्रद्धा चाले. । तो तेंचि फळ ठेविलें । ऐसें लाहे ॥ म्हणौनी आपुलिया परी । शास्त्र अनुष्ठिती कुसरी । जाणे, तयातें श्रद्धाळू जो वरी । तो मूर्ख ही तरे ॥ ज्ञा०

शंबुकः—अरे ! दुसऱ्याचे वचनावर 'अंधश्रद्धा' काय उपयोगाची ! वसिष्ठानें नामतारक सांगितलें आणि तूं खरें मानितोस ! त्यांना वेद कळला असेल, तुला नको कां कळायला ?

गुहकः—मला नाव चालवितां येते तुला नको कां यायला ? तूंच चालीव.

**तेथ धीवर म्हणेः–" अवलोकी ! ।**
**नाव चालवित मी जगलोकीं. ॥**
**टाकिलेसि मज तूं परि शोकीं. ।**
**घे वल्हें, निमुट मी बसतों कीं. " ॥५॥**

गुहक वल्हें खालीं ठेऊन बसला. शंबुकानें वल्हें हातांत घेतलें, तोंच दाडा उरात आदळला. शंबुक पुरांत गटंगळया खाऊं लागला.

**शंबुकः— "धीवरा ! मरत मी, मज तारी ! " ।**
**गुहकः— " शंबुका ! धरि घमेंड हुशारी. ॥**
**वेदशास्त्र वरि भाष्यहि भारी, ।**
**हीच रे जडशिला तुज मारी. ॥६॥**
**शंबुकः— " धीवरा मज करी करुणा रे ! ।**
**देशि काय शरणा मरणा रे ! " ॥**
**गुहकः- " शंबुका ! करि हरि-स्मरणा रे ।**
**रामनामचि इथें तरणा रे ॥७॥**

शंबुक रामराम म्हणूं लागला. गुहकानें त्यास तीरावर आणिलें.

नारदः—येथ जाणीव करी तोचि नेणे । आथिलेपण मिरवी तेंचि

उणें । आम्ही जाहलों ऐसें जो म्हणे । तो कांहींच नोहे ॥ ज्ञाने०—९
वेद भाष्यकार, भूतावर सत्ता चालविणारा, देवादानवांस अजिंक्य रावणापेक्षां कोण विद्वान ? त्याची हकीकत.

## ३३ वेदज्ञ रावण व रामनाम.

शार्दूल० वेदार्था विखरी, जगा कुसकरी, लावी सुरां चाकरी, ।
कौटिल्या पसरी असंख्य असुरीं, दुर्लंघ्य लंकापुरीं. ॥
रामासी कुमरी दशानन करी. नामें समुद्रावरी ।
नेलें वानररीस, नाम-गजरीं दैत्यासि घेरी मरी. ॥१॥

श्रीरामनामाचें सामर्थ्याची साक्ष श्रीहनुमंत देतात.

## ३४ राम व हनुमंत.

शार्दूल० बोले वायुसुतासि रामः—"सखया! सिंधूसि तूं लंघिले, ॥
लंका जाळुनि बाग सर्व खणिले. तूं राक्षसा मारिले." ।
बोले मारुतिः—" हें कपित्व अवघें स्वामीपुढें आणिले, ।
नाथा! हें रुचले तुम्हां, म्हणुनिया संतांत वाखाणिले. ॥१॥
मी हा मर्कट. अष्ट अंगुल तनू. हें पुच्छ बारांगुलें. ।
झालें जें करुणार्णवा! बहु भलें, श्रीरामनामामुळें. ॥
दास्यत्वीं मज ठेविलें, सदय तूं, मद्भाग्य हें आगळें. ।
माझी वानरता गळे, नर कधीं होईन मी ? ना कळे. ॥२॥

नारदः—हा पराक्रमी हनुमंताचा निरहंकार ! ॥ परी हें मियां केलें । कीं हें माझेनि सिद्ध झालें । ऐसें नाहीं ठेविलें वासनें माझी ॥ तया पाडें देहीं । जया मी आहे हे सेचि नाहीं । निरहंकारता पाहीं । तया नांव ॥ हें संपूर्ण जेथें दिसे । तेथेंचि ज्ञान असे ॥ ज्ञाने० ॥ प्रभु म्हणतात :—॥ म्हणोनि थोरपण पऱ्हा सांडिजे। व्युत्पत्ति अवघि । विसरिजे जैं जगा धाकुटें होइजे । तैं जवळिक माझी ॥ ज्ञाने० ॥

शास्त्री:-वेदशास्त्र मुखोद्गत असून, अक्षरशून्यापेक्षां स्वतास लहान कसें लेखितां येईल ?

नारद:-स्वताचे दोषास डोळे उघडून पाहील, त्याला आपली तुच्छता प्रतीतीस येते. इतर कोणास तुच्छ लेखण्यास कोणा जीवास अधिकार पोंहचत नाहीं. कोण जाणे, राम कोण वेषांत आहे ?

## ३५ राजाराम पाहुणा.

सार्वभौम राजाराम सैन्यासह जात असतां, सैन्याची व त्यांची चुकामुक झाली. अस्तमानीं एका मांडलिकाचे राजभुवनासमोर आले. त्याचें दुर्लक्षामुळें सेवकांनीं राजारामचंद्रास हुसकून लाविलें. तेंव्हां रात्रीं वनांत जात असतां एका हीन चौकीदारानें आग्रहानें ठेवून घेऊन प्रभुचें यथाशक्ति आतिथ्य केलें. अयोध्येस परतल्यानंतर मांडलिकास शिक्षा, व चौकीदारास श्रीरामानें राज्य दिलें.

**शार्दूल० येतां राव घरीं, मदांध धनिकें नेणोनि धिःकारिलें. ।**
**रंकें आसन शाक भाकर जलें नेणोनिया पूजिलें. ॥**
**रंका राज्य दिलें. मदांध धनिका रायें तिथें दंडिलें. ।**
**"नेणोनी घडला प्रमाद!" रडणें हें फोलसें राहिलें. ॥१॥**

माहात्म्य न जाणून प्रमाद घडला, शिक्षा देऊं नये, असा वाद मांडलिकानें केला. त्यावर सुमंतु वसिष्ठादिकांनीं न्याय दिला.

**राया नेणत मांडलीक, तरि तो मोठा गुन्हा तत्वतां, ।**
**पैं त्याहूनि गुन्हा गणीं प्रभु कुणा दीनासि धिःकारितां; ॥**
**नेणोनी भजला कुणी, तरि तया दे नाथ सायुज्यता. ।**
**ब्रह्मार्यी सहजा वदे:-"नमत जा, हो जाणतां, नेणतां. ॥२॥**

नारद:-परमात्मा पावण्याचें साधन प्रभूनींच सांगितलें आहे. वाड धाकुटें न म्हणती । सजीव निर्जीव नेणती । देखलिये वस्तु

उजू लुंठितो । मीचि म्हणोनी ॥ आपले उत्तमत्व नाठवे । पुढील योग्यायोग्य नेणवे । एकसरें व्यक्तिमात्राचेनि नावें । नमूंचि आवडे ॥ अखंड अगर्वता होउनि असती । जयाची विनय हेंचि संपत्ती । जे जयजय मंत्रें अर्पिती । माझ्या ठायीं ॥ नमितां मानापमान गळाले । म्हणोनि अविचिता मीचि जाहले ॥ ज्ञाने० ॥

शास्त्रीः—स्वामी ! आपलें दर्शनानें व उपदेशानें मी कृतार्थ झालो. अतःपर दुसऱ्यास कळत नाहीं, असें कल्पून अव्यापारेषु व्यापार मी करणार नाहीं.

नारदास नमस्कार करून सर्व निघाले. नारदही गोकुळाकडें परतले. इतक्यात स्वकर्मानें चालणारा पण हीन प्रारब्ध वैश्य नारदाजवळ आपलें दुःख सांगूं लागला.

## ३६ प्रारब्ध परिवर्तन.

अनेक धंदे करूनही पोटापुरतें का मिळेना, ही तक्रार त्या वैश्यानें नारदापुढें मांडिली.

**शार्दूल० बोले वैश्यः—"मुने! विधी मज न दे पोटापुरेसें कसा ?।**
**धंदे मी बहु चाळिलें. परि फिरें कंगाल पूर्वी जसा." ॥**
**बोले नारदः—"हा स्वदोष विधिला कां लाविसी ? तूं पिसा. ।**
**खाशीं आजि शिळें. अतां जमविलें खाशील येत्या दिसां. १**
**जें तूं केवल श्रीहरीसि दिधलें ठेवा बने तत्वतां. ।**
**ठेवा अल्प, विधी जपूनि पुरवी तूतें जगाया अतां. ।**
**ब्रम्हा कंजुषिचा धडा गिरवितो जो दाविला तूं स्वतां." ।**

वैश्यः—हा कोणता न्याय ? माझी ठेव तो एकदम कां देऊन टाकीत नाहीं ?

नारदः—तसें रोकड खातें ठेविशील तर सर्व ठेव " इस हात

दे, इस हात ले," या न्यायानें लागलीच परत मिळेल. जा, ब्रम्हदेवाचें ध्यान करून त्याला प्रसन्न कर. व त्यानें "माग" म्हणताच सर्व ठेवा परत माग.

देई तो परिपूर्व दत्त अवघें नेटें तुवां मागतां " ॥२॥

---

वैश्यानें नारदोक्त योगानें ब्रम्हदेवास साक्षात् केलें. व त्यानें "माग" म्हणतांच पूर्वदत्त मागून नारदापाशी निवेदित केलें. नारद विनियोग सांगतात:-

शार्दूल० "तूं जें लाविसि इंद्रियां, पडतसे देहाचिया सर्पणीं.।
दीनासी दिधलें सदन्न परतें रूपापरी दर्पणीं. ॥
भक्तां वाढियलें, अनंत पटिनें, ये अन्न ब्रह्मार्पणीं।
लाभे संचित आजि. लावि अवघें श्रीकृष्णसंतर्पणीं. ॥३॥

वैश्यानें याप्रमाणें तीन दिवस उपोषित राहून श्रीहरि संतर्पण केलें. नित्य परत येऊं लागले. तेव्हां नारदांनीं सांगितलें: असें उपासी राहण्याचें कारण नाहीं.

शार्दूल० अन्यां वंचुनि संचयीं निरय तें लाभे जगीं दानवा.।
सेवावें इतरां स्वधर्मि. हरिची पूजा घडे मानवा. ॥
ऐसें जें हुतशेष पीयुष बने, जाळीत दुर्वासना,।
सत्कर्मी रमुनी भजे अनुदिनीं तो मान्य नारायणा. ॥४॥

असें नुसतेंच उदरंभरण करणारांना, नारदांनीं सत्कर्माकडें लाविलें. नारद गोकुळाकडे वळले असतां वाटेंत दोघें उपासक भांडूं लागले.

## ३७ वैष्णव–शैव वाद.

शार्दूल०–बोले वैष्णवः–"विष्णुहूनि बरवा श्रीमंत कोणी नसे. "।
बोले शैवः–" सदाशिवाविण इथें वैराग्य कोठें वसे ?" ॥

**"श्रीमंती बरवी," "विराग बरवा," ते भांडती जें असे, ।**
**बोले नारद ! :-"वादतां हरिहरां पावाल केव्हां, कसें ?"॥१॥**

नारदः-शिवस्य हृदयं विष्णुर्विष्णोश्च हृदयं शिवः ॥ तुका म्हणे हरिहरा । भेद नाहीं गव्हारा ॥ ——— नारद कथा सांगतात.

पूर्वीं त्रेतायुगांत दोघे बंधु एक शैव व दुसरा शाक्त, आपापले उपास्याचे महतीसंबंधानें नित्य पूर्वपक्ष, उत्तरपक्ष करीत.

**३८ आदि व संपि.** ( पाक्षि तीर्थाचा इतिहास )

**शार्दूल०-"शक्ती थोर !" "न, सांब थोर !" निकरें त्रेतायुगीं भांडती**
**दोघे बंधु सुदीर्घ काल. झगडा सांबापुढें मांडिती. ॥**

वेदगिरिवर[१] शिवशक्ति झोपाळ्यावर भक्ति-रहस्य विचारांत होती. श्वासोच्छ्वासानें नंदी झोके देत होता. अशा समयीं ते दोघे कर्कश भाडत आले. समाधानभंगामुळें सांबास क्रोध आला.

**रोषें सांब म्हणे :-"सुखांत झगडा हा आणितां दुष्कृती ! ।**
**द्वापारांत रहाल पक्षि. भजतां ऐक्यें मिळे सद्गती."॥२॥**

विप्र तात्काळ पक्षी झाले. दोघेही तिर्यक् योनि पावून दुःखानें रडूं लागले.

**साकी-अनुतापें ते विनविति " सांबा ! आतां द्यावी मुक्ती. " ।**

सांब पुन्हां म्हणतातः-

**" जा ! जा ! कलियुग अखेर साधा ऐक्यत्वें मम भक्ती. ॥**
**पूर्वोत्तर पक्षीं । भांडत झाला तुम्हि पक्षी. " ॥**

नारदः-प्रभु म्हणतात ॥ अर्ध नारी नटेश्वरी । जो पुरुष तोचि नारी । तेवीं मी चराचरीं । माताही होय " ॥ हरिहर, शिवशक्ति त्याचीच नावें आहेत. पण क्षुद्रदेवतांचेही उपासनेचें परिवर्तन सद्धर्मयुक्त भक्तींत होतें त्याचें रहस्य ऐका. नारद सांगतातः-

---

१ पक्षितीर्थ.

## ३९ कुंडधारोपासना ( महाभारत शांतिपर्व )

**शार्दूल० चिंती एक मुनीः–"कुणां भजुं? मला दुर्दैन्य हें सांकडें.।**
**मोठे देव अनंत भक्त भजतां, यती न रंकाकडे ॥**
**इंद्राचा छडिदार मेघ बरवा, दीना मला आवडे।**
**माझी भीड कशी तरी लघुतरा त्या कुंडधारा पडे" ॥१॥**

याप्रमाणें छोटासा देव कुंडधार मेघ याची उपासना भक्तिपूर्वक त्यानें आरंभिली. उपास्य दैवत कुंडधार याचे तेजानें तो स्वर्गांतील घडामोडी पाहू लागला.

**उपजाति- मेघें दिलें तेज उपासकाला.।**
**स्वर्गीं घडामोडि दिसे तयाला.॥**
**भक्तेप्सितां मागुनि देव घेती;।**
**एका लुबाडूनि दुजांस देती. ॥२॥**

अनेक देवता आपापलें सज्जन भक्ताकरिता दुर्जनांचीं राज्य–वैभवें मागून घेत; व इंद्राचा कोठारी मणिभद्र त्या प्रमाणें व्यवस्था करीत आहे; असे त्या मुनीस दिसले. पहातो तों तेथें कुंडधार ही मणिभद्रास नम्रपणानें विनंति करीत आहे, व ती स्वतः करितांच !

**शार्दूल० प्रार्थी वंदुनि कुंडधारः–"दुबळा मद्भक्त राहो वनीं;।**
**राज्या देउं नका. स्वधर्म-निरती जागो तयाच्या मनीं." ॥**

मणिभद्रानें मुनीला राज्य देणें योग्य आहे असें पुष्कळ सांगितले तरी कुंडाधारानें मुनीला राज्य व नरक नको, स्वधर्म निरतीच द्या, असा आग्रह धरिला.

**बोले इंद्र "तथास्तु." तैं मुनि म्हणेः–"दुर्दैन्य माझा धनी।**
**वाराया विसरे. स्वधर्म–निरती देऊं कसा टाकुनी ? " ॥३॥**

याप्रमाणें राज्य प्राप्तीचा हेतू सोडून मुनी भक्तियुक्त अंतःकरणानें पूर्ववत् तपश्चर्या करीत राहिला

**शार्दूल० निर्हेतू भजतांचि सिद्धि रिघती रावूं मुनी-वैखरीं.।**
**शब्दें दे इतरांसि राज्य. जडला सद्बोध चित्तांतरीं.॥**

या उपासनेच्या बळानें त्याला दिव्य दृष्टी आली व कानांत दिव्य ध्वनि पडला तो असाः- ॥ आतां आणिकही सांप्रदायें। परि मातें नेणती समवायें। जे अग्नि इंद्र सूर्य सोमा ये। म्हणुनी यजिती ॥ तेंही कीर मातेंचि होये। कां जे अवघें मीचि आहे। परि ते भजती उजरी नव्हें। विषम पडे ॥ तेथ रस तो मुखेंचि घ्यावा। परिमळ तो घ्राणेंचि सेवावा। तैसा मी तो यजावा। मीचि म्हणोनी ॥ याप्रमाणें कुंडाधाररूप परब्रह्माची उपासना तो मुनी करूं लागला. व देव प्रत्यक्ष त्याचे समोर आला.

**दृष्टी देउनि दिव्य देव म्हणताः-"तूं माग कांहीं तरी."।**

राज्य न देतां भक्ति व स्वधर्मनिरति दिली हीच देवाची थोर दया असे जाणून मुनी म्हणतो:-

**"देवा! भक्ति बरी. स्वधर्मनिरती ठेवी मला पायरी" ॥४॥**

वैष्णव व शैव उपासक:--आडि व संपि या बंधूस साबांनीं ऐक्यानें भजन करा म्हणून सांगितलें, तें कसें ?-

नारद:-"हरि-हर! हरि-हर!" एकच. "गौरी-हर! गौरी-हर!" एकच! ऐका एक मौज:—

## ४० शुंभ निशुंभ.

**शुंभ निशुंभे ललिता अर्चुनि, प्रेम मागती तिला.।**
**देतसे देवी अंबा फला. ॥१॥**
**"नका दुभंगूं. दिलें समाइक." देवि वदे चित्कलाः-।**
**"सुखानें नांदा. पावा मला." ॥२॥**

दोघे बंधू झुंजाति निकरें:-" मज दिधलें, नाचि तुला. ।
नारदा ! सांग न्याय तूं खुला."॥३॥
हा मग बोले: "ललितेनें तरि डाव बरा साधिला.
बंधुमधिं झगडा कीं लाविला!" ॥४॥
दैत्य बोलती:-"नकोचि हें फळ, कलागतीच्या खिळा. ।
नारदा ! सत्य न्याय तूं दिला. ॥५॥
खरा हितेच्छू तूंचि नारदा ! सेवि रसा परिमळा. ।
वादियां फेक अम्हा टरफला." ॥६॥
हा तरि सेवी रसा. कोय मग पेरि भुईं निर्मळां. ।
फाकला वृक्ष गगन-मंडलां. ॥७॥
ब्रह्मानंदी सद्गुरुमाता त्या नामामृत फळां, ।
देतसे सहजा अपुल्या मुला. ॥८॥

उपासक प्रेमानें एक झाले. " राधा कृष्ण ! गोपाल कृष्ण ! राधाकृष्ण गोपालकृष्ण!" असें भजन करीत नारद गोकुळांत निघाले.

देवर्षि नारद श्रीकृष्णाचीच विभूती. त्यांना कोठेंच प्रतिबंध नसे. ते थेट देवी राधेच्या मंदिरांत प्रवेश करून पायाजवळ दबून बसले, त्याना राधेंत श्रीकृष्ण दर्शन झालें.

## ४१ राधेंत श्रीकृष्ण दर्शन.

शार्दूल० यावा नाथ असाचि तो नवविधा शृंगार राधा करी. ।
दारीं, माजघरीं, पुन्हा निरखिते ती आरशा भीतरीं ॥
धिःकारी तनुला. म्हणे:-"हरिविना ही कासया चातुरी?"
शून्यागार, नसे हरी. विरहिणी ती आळवी सुंदरीः- ॥१॥
"हे नाथा! गुणसुंदरा! भिउ नको ये माझिया मंदिरा. ।
तूझे आवडिवीण कांहिं न वसे या शुद्ध चित्तांतरां.॥
सेवा मी तुज योग्य नाहिं रचिली. पूर्णा! परेच्या परा!।
नाहीं देखियलें यथाविधि तुला, लावण्यपूर्णागरा!" ॥२॥

राधा आळवि या परी. निजमुखां सन्मूख घे आरसा.।
राधा हारपली. हरीच प्रकटे बिंबामधूनी ठसा.।
ब्रह्मानंदचि राधिकेसह तिथें प्रत्यक्ष ये सौरसा.।
मी पायां लपलों म्हणूनि सहजी सांगे तुम्हासी असा. ॥३॥

जीव परमात्मा दोनी । बैसले एक एकासनीं । जयाच्या हृदयभुवनीं । विराजती ! ॥ आंत बाहेर योग । निर्वाळलेयाही चाग । तरी माझा अनुराग । सप्रेम जया ॥ अर्जुना तो भक्त । तोचि योगी तोचि मुक्त । तो वलभा मी कांत । ऐसा पढिये ॥ ज्ञाने० ॥ सन्मुख प्रगटलेली मूर्ती राधेशी संवाद करूं लागली.

## ४२ राधादामोदर संवाद.

शिख० बोले श्रीकृष्णः-"राधे! बघुनि मज तुझें कार्य सिद्धीस आले.
राधा बोलेः-"दयाळा! अझुनि निरखणें नाहिं संपूर्ण झालें.॥
जों जों त्वद्रूप देखूं, अधिकाचि उरलें रूपडें देखण्याचें.।
तें तें जें जाय देखूं, अनिमिष सरलें हालणें पापण्याचें ॥१॥
ऐसा तूं राहि आतां. निरखिन तुज मी वर्ष कोट्यानुकोटी.।
वर्षाचें मास कोटी. उगवाति, निमती मासिं ज्या भानुकोटी.
दीसाचे तास कोटी. चुटकि चुटकिसी जैं महायूग आटी.।
ऐसाही काळ लोटी अजुनि निरखिजें ही वसे आस पोटीं." २

दिक्कालाद्यनवच्छिन्नानंत चिन्मात्रमूर्तये । स्वानुभूत्यैक मानाय नमः शांताय तेजसे ॥ इतक्यात चंद्रकला दार खटखटते. समाधी विसर्जन करून राधा देहभानावर आली. दार उघडून चंद्रकलेस आंत घेतले.

## ४३ चंद्रकला-राधा संवाद.

शार्दूल० बोले चंद्रकलाः-"धरूनि हरिला मी मंदिरीं आणिला,।
सौगंधें उटिला, फुलें सजविला, कस्तूरिनें रेखिला,॥

नाना काव्यकलापचातुरिकलां मी वर्णिला सेविला ।
राधे! लाभ मला असा. तरि तुला तो कोणता जाहला? १

राधा उत्तर देतें:—

"बाई! धन्य तुझी परी, मम घरीं येई न जाई हरी ।
कुंजीं एकसरीं धरी मज करीं, नेणों निशीं वासरीं ॥
नेणें मी कुसरीकला, कशि तरी मी आहिरी पामरी. ।
जें जें नाथ करी, स्मरी न विसरी, दासी तयाची खरी.॥२॥

तात्पर्य–कलाचतुर अर्चेपेक्षा राधेचाच अध्यात्मयोग श्रेष्ठ.

इतक्यांत नारदमुनी प्रगट होऊन श्रीराधादेवीस नमस्कार करून विचारतात. " मलाही कांहीं श्रीहरिची लीला सांगा."

## ४४ नारद–राधा संवाद.

शार्दूल० राधा सांगत नारदाः–"मुनिवरा! घेऊनि मी घागरी, ।
आणाया जल जात, तोंचि यमुना दाटूनि आली पुरीं. ॥
गेले वाहत मी घटासह. भरे कालिंदि बाह्यंतरीं. ।
सांगूं काय? मला उरी नुराविली. ऐसा सखा श्रीहरी!" ॥१॥

---

"राधे! सांग कसा असे तव सखा?" ऐसा पुसे तो मुनी।
राधा बोलतः–"निर्गुणा कवणते रीतीं कथूं निर्मनीं ॥
त्या नाथें मज मारिलें, तनमना प्रेमाग्निसी भस्मुनी ।
चौ देहा मज राख हो! बनविली. कैसा उठे जी! ध्वनी? २

नारदः–गुरु माउले! आपले शब्द समजण्यास आपणच अनुभव डोळा द्यावा. भक्तिप्रेमाचें कांहीं रहस्य मला येथेंच मिळते.

राधाः–(नारदास वंदून) माझी कसली भक्ती? व मला कसचें प्रेम? प्रीतीची रीती पतंगास माहीत.

---

## ४५ पतंगाची भक्ती.

शार्दूल० प्रीतीची सरणी पतंग शिकवी. ती घेइजे साधुनी; ।
जीवासी मुकला, परंतु तिळही त्यानें न केला ध्वनी. ॥
'आम्ही भक्त,' अशी पिटूनि टिमकी, भक्ती न जाणों कुणी. ।
जो देखे हरिचे पदा, फिरुनि तो सांगों न आला जनीं. ॥१

यत् गत्वा न निवर्तते तद्धाम परमं मम ।

नारदः—ज्योतीवर कोणाचें मन लुब्ध होणार नाहीं? सर्वांच्या चित्तांत प्रकाश पाडणारी दिव्य शक्ति तिच्यात आहे.

राधादेवी:—तें खरेंच आहे. पण ज्योतीची जोड पतंगाशीच घातली आहे. टोळासी नाहीं. ——— राधादेवी सांगतेः—

## ४६ टोळ व पतंग.

शार्दूल० आला रामसभेंत टोळ. म्हणतोः—"न्यायासि रामा! करी ।
ज्योती माझि वधू, पतंग परि तो झेपे कसा तीवरी?" ॥
बोले रामः—"कितीक जोति नगरीं आहेत तें सत्वरीं ।
लावूनी गणती वदा उभयतां; न्यायासि सांगूं तरी. ॥१॥

टोळ नगरातील दीप मोजून परतला. पतंगाचा शोध मारुतीरायांनीं आणला. तो पहिल्याच दीपाजवळ जळून पडला होता.

आला टोळ करूनि दीप-गणती. बोले सभे भीतरींः— ।
"कोटी तेहतिसासि मी निरखिलें. आहेत त्यांही वरी." ॥

श्रीरामांनीं न्याय सांगितला.

"जा टोळा! गणती करी सतत तूं चौऱ्यांशि लक्षाघरीं. ।
ज्योतीसी मिनतां पतंग नुरला; त्याला वधू ती खरी." ॥२

———

द्यावें सद्गुरुमाय! प्रेम मजला जेथें कधीं मी नुरे; ।
माझें मीपण जीव देह समुळीं तूझें पदाब्जीं विरें; ॥

**तूं माझा, वरि मी तुझा, गुरुवरा! हा बोल ही ओसरे;।**
**नांदे तूंचि अखंड; येथ सहजा ही आस मातें पुरे. ॥३॥**

शरीर वाचा मानस । पियालीकृत निश्चयाचा कोश । एक मी वांचूनि वास । न पाहती आन । किंबहुना निकट निज । जयाचें जाहालें मज । तेणें आपणया सेज । एकी केली ॥ मिळोनि मिळतचि असे । समुद्रीं गंगाजळ जैसे । मी होऊन मज तैसे । सर्वस्वें भजती ॥ ज्ञाने० ॥

नारदः–साराश पतंगाच्या एकनिष्ठतेची व प्रेमाची धन्य आहे.

राधाः–अहो ! पतंगाची काय थोरवी गाता. सर्व थोरवी माझ्या नाथाची आहे. प्रेम त्याचीच देणगी आहे. ऐका पतंगदीप संवाद.

## ४७ पतंग दीप संवाद.

**उपजाति– पतंग दीपासि म्हणेः–"कठोरा!।**
**मी भाजलों. तूं बसलासि कोरा." ॥**
**बोले दिवाः–"मीचि जळूनि सारा।**
**आणीतसे चित्तिं तुझें उबारा. ॥१॥**
**अरे पतंगा! जरि मी प्रकाशीं।**
**जगासि, पैं कोण मला तपासी?।**
**जळूनि मी आचरितो तपासी.॥**
**तुझें विना फारचि मी उपासी." ॥२॥**

तात्पर्यः–प्रभू अत्यंत प्रेमी म्हणून त्यांचें दर्शनानें भक्तांत प्रेम उत्पन्न होतें. व प्रभुलाही भक्ताचे प्रेमाची हुरहुर आहे. प्रभु म्हणतातः–

म्हणोनि तिहीं जें प्रेम धरिलें । तेंचि आमुचें देण उपायिलें । परी आम्ही देयावें तेंही केलें । तिहीं म्हणिये ॥ लळेयाचिया बाळका किरीटी । गवसणी करूनि स्नेहाचिया दिठी । जैसी खेळतां पाठोपाठीं माउली धांवे ॥ तें जो जो खेळ दावी । तो तो पुढें सोनयाचा करूनि

ठेवि । तैसी उपास्तीची पदवी । पोषित मी जाये ।। पै भक्तासि माझें कोड । मज तया अनन्य गतिची चाड । कां जे प्रेमळाचें सांकड । आमुचिया घरीं ।।



राधादेवीच्या सद्बोधनानें कृतार्थ नारदमुनी गोकुळांचें बीदींत सगद्‌गद " राधा-कृष्ण ! राधा-कृष्ण ! " भजन करीत निर्विकल्प समाधिसुख अनुभवीत चालले. त्यांचा प्रभाव सर्वत्र पसरला. सर्वांचें कानीं मुखीं तेंच महावाक्य गर्जू लागले. ।। यद्यदाचरति श्रेष्ठ तत्तदेवैतरोजनः ।। येथ वडिल जे करिती । तया नाम धर्म ठेविती । तेंचि येर अनुष्ठिती । सामान्य सकळ ।। परंतु, ज्या भजनानें गोकुळवासी जनास अष्टसात्त्विक भाव उपजत, तेंच दुर्वासमुनीच्या विकल्पास व क्रोधास निमित्त झालें. ।। औषधाचेनि नावें अमृतें । जैसा नवज्वर आंबुथे । कां विषचि होऊनि परते । सर्पा दूध ।। तैसा सद्‌गुणीं मत्सर । व्युत्पत्ती अहंकार । तपोज्ञानें अपार । ताठा चढे ।। दुर्वासानीं चिडून या भजनाचा निषेध केला. तों तों तें, विशेषतः बालगोपालांत, अधिक बळावलें. दुर्वास दिसले कीं पोरांनीं "राधाकृष्ण ! राधाकृष्ण ! " असा गजर करावा. कंटाळून सती राधादेवीचीच खबर घ्यावी म्हणून ते त्या देवीच्या मंदिरांत आले. सतीनें यथाविधि आसनअर्घ्यपाद्यादि निवेदन केल्यावर दुर्वास मुनी विचारितातः-

## ४८ दुर्वास व राधादेवी.

**शार्दूल० "राधे ! आचरिलें तपासि अथवा पापासि केला ठसा ?"**

श्रीराधादेवी दुर्वासांचे क्रोधाविष्ट मुद्रेकडे पाहून स्तब्ध झाली. अधिक निकरानें दुर्वास पुन्हां विचारितात.

**"ऐसे ते यमदूत तूज पुसतां तूं जाब देसी कसा ?" ।।**

निरुपायास्तव श्रीराधादेवी नम्रपणानें उत्तर देतेः-

**राधा बोलतः—"तापसा! मम ठसा त्या श्रीहरीला पुसा!।**

भक्तांचा जाब यम कोण घेणार ? ॥ यम म्हणे काय यमावें। दम म्हणे कोणा दमावे। तीर्थे म्हणती काय खावे। दोष औषधासि नाहीं॥ ——————— दुर्वास दुर्मुखले पाहून राधादेवी म्हणतेः—

**"माझा लेख असा तसाहि सहसा कामासि येई कसा?" १**

दुर्वासाचे फेरतपासणीचे प्रश्नावर राधा उत्तर देते.

**माझी रीत? जसी हरीसि रुचली तैसीचि आहे बरी.।**
**नाथावीण भली बुरीहि मजला कोणी कसा हो! करी?।**
**नाथाचे गुण सोडुनी मम गुणा चिंतूं कशाला तरी?।**
**मी आहेच बुरी. परी बहु भला आहे सखा श्रीहरी! ॥२॥**

इतक्यात नारद मुनी प्रगट झाले.

नारदः—तपोनिधी! परब्रह्ममूर्ती बालकृष्णासंबंधानें भलताच सशय आपल्या विशाळ हृदयांत उद्भवला. आणि सतीचा छळ करण्यास आलात. ॥ साच आणि लटिकें। विरुद्ध आणि निकें। संशयीं तो नोळखे। हिताहित॥ म्हणूनि संशयावीण थोर। आणिक नाहीं पाप घोर। हा विनाशाची वागुर। प्राणियासी॥ हृदयीं हाचि न समाये। बुद्धितें गिवसूनि ठाये। तेथें संशयात्मक होये। लोकत्रय॥

दुर्वासः—( ओशाळून ) हो! अद्याप श्रीकृष्ण कैशोर आवस्थेंत आहेत! मग नारदा! आपणच ही निराधार चुगली सर्व जगांत फैलावतां. याचें काय वर्म ?

नारदः—वर्म नाहिं ठावें! त्यानें ब्रम्ह कसें व्हावें ? ॥ तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया॥ "राधा—कृष्ण, राधा—कृष्ण" या महावाक्याचें वर्म समजण्यास, ॥ तनु मन जीवें। चरणासि लागावें।

आणि अगर्वतां करावे । दास्य सकळ ॥ मग अपेक्षित जें आपुलें । तेंही सांगतील पुसिलें । जेणें अंत:करण बोधिलें । संकल्पा नये ॥ तपोनिधी ! असे भिगुळवाणे डोळे करून विचारल्यानें वर्म समजत नसतें.

दुर्वास:—तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व । तपो ब्रम्हेति ॥ मी समाधि-प्रश्नेनें जाणेन.

---

दुर्वास मथुरेजवळ शून्याश्रमांत समाधिस्थ बसले. इकडे श्रीरामकृष्णाचें उपनयनाचा काल आला. वसुदेवदेवकीस कंसाचे कारागृहांत या विषयीं अत्यंत व्याकुळता झाली. त्यांना बंधमुक्त करून उग्रसेनास कंसाचें राज्य दिलें, व ईशावतार प्रभू रामकृष्ण सांदीपनी गुरूचे सुश्रूषेंत राहिले. नंतर उग्रसेनाचे दरबारांत श्रीकृष्णप्रभु छडिदार झाले. या अवसरांत दुर्वासांचें कांहीं वर्तमान लागले नाहीं, म्हणून नारदमुनी त्यांचे शोधार्थ शून्याश्रमांत आले. व सवयीप्रमाणें “ राधा—कृष्ण ” भजन करूं लागले. दुर्वास समाधींतून दचकून उभे राहिले.

दुर्वास:—(सक्रोध) बस करो ये चुगली ! शाप दूंगा !

नारद:—तपोनिधी ! आपला शाप सुद्धां अनुग्रहच आहे; पण आपले समाधीचें व्युत्थान सत्यबोधांत न होतां मिथ्या क्रोधांत मात्र झालें. ऐका.

## ४९ पूर्व—वासनेंत समाधि—व्युत्थान.

राजाश्रित एका बहुरूप्यानें पुष्कळ खेळ केले. राजा बहुरूप्यास ओळखीत गेला. शेवटीं त्यानें गायनाचा अभ्यास करून गवैय्याचें सोंग आणिलें. राजा बहुरूप्यास ओळखून म्हणतो:—

भुजंग० “ बहुरूपिया ! सोंग घेतोसि नाना ।
गवैय्या नव्हेस . तुझा हा बहाना ॥

कळूं येसि आम्हां, तुला हें कळेना.।
वृथा स्तोम हें तोम ताना तनाना. ॥१॥

खरा नाटकी तोचि, मांडूनि खेळा,।
कधीं ओळखूं येत नाहीं कुणाला. ॥
नटे विश्वरूपें, लपे सर्व डोळां,।
कला एक सर्वज्ञ नारायणाला." ॥२॥

बहुरूप्यास ही ईशस्तुति आवडली नाहीं. ॥ अभिमानाचेनि मोहें । ईश्वराचेंही नाम न साहे ॥ ईर्षायुक्त बहुरूप्यानें हिमालयांत योगाभ्यास केला. ॥ अभ्यासाचेनि बळें । एका गति अंतराळें । व्याघ्र, सर्प प्रांजळे । केले एकीं ॥ विष कीं आहारीं पडे । समुद्रीं पायवाट जोडे । एकीं वाग्ब्रम्ह थोकडें। अभ्यासें केलें ॥ शिष्य जमा करून बहुरूपी एका जुन्या गुहेंत समाधिस्थ बसला.

उपजाति० गुहेचिया बंद करूनि दारा,।
शिष्या-मुखीं हा करवी पुकारा:-।
"प्राचीन येथें मुनि गुप्त राही।
बाहेर येत्या दसऱ्यास येई" ॥३॥

प्रचारकांनीं सार्वजनिक चर्चा केली. लोमेशऋषीच गुहेंत बसले आहेत असे सप्रमाण सिद्ध केले. दूरदेशींचे खेळ, नाटकें चार सहा महिने आधींपासूनच राजधानींत या योगप्रदर्शनास आले. राजानें महोत्सव जाहीर केला.

प्रचारकानीं पसरूनि जाळी,।
आरंभिली नित्य तिथें दिवाळी. ॥

इतक्यांत परचक्र आलें. खेडींपाडीं सर्व ओस पडल्यामुळें परचक्रास सुलभ झालें. राजधानीच जाळली म्हणजे सर्व राज्य ताब्यांत येतें !

येऊनि शत्रू नगरासि जाळी. ।
राजा प्रजा पेटाति एक होळीं. ॥४॥

सारांश या युद्धाच्या धांदलींत तें योगप्रदर्शन तसेंच राहिलें. ही कृतायुगांतील गोष्ट. त्रेतायुगांत पुढें:—

कालांतरें राज्य नवीन झालें. ।
बांधावया कोट मजूर आले, ।
पाया खणीतां पडलें भुयार; ।
योगीश्वरा देखुनि भीति फार. ॥५॥

ही वार्ता त्या नवीन राजापर्यंत गेली. प्रधान आमात्यादिकां-सह राजा बहुरूपी योगीश्वराच्या दर्शनास आला. त्या बहुरूप्याच्या समाधीचें व्युत्थान केलें. राजानें बहुरूपी योग्याची सर्वोपचार पूजा केली. सेवाअनुग्रहार्थ हात जोडून राजा उभा राहिला. तेव्हां बहुरूप्यास वाटलें, हा आपला धनी पहिलाच राजा आहे. तो उठून मुजरा करून राजास म्हणतो:—

"हा दाविला खेळ तुम्हासि ताजा. ।
नाहीं मला ओळखिलेचि राजा ! ॥
द्यावी मला जागिर, शालजोडी, ।
कंठी, बसायासि लहान घोडी ! " ॥६॥

तात्पर्य. जो हेतु ठेवूनि बसूं समाधी ।
व्युत्थानिंही तोचि बने उपाधी ॥
हेतूचि देहांत जिवासि बांधी ।
निर्हेतु वैदेहि समाधि साधी ॥७॥

नारद:—आपण काय हेतूनें समाधिस्थ बसला होता तें आपणासच माहित ! आतां मथुरेंत श्रीकृष्णाचें छत्रांत उग्रसेन राज्य करीत आहे. व जरासंध मथुरेवर सैन्य घेऊन जवळ आला आहे. म्हणून आपले समाधिव्युत्थान करणें भाग पडलें. क्षमा असावी.

दुर्वास:-नारदा! आपले मजवर उपकार आहेत. मला यापुढें जिकडें आदरातिथ्य होईल तिकडेंच गेले पाहिजे. येथें बसण्याची सोय नाहीं.

---

जरासंधाचें त्रासानें श्रीकृष्णांनीं यादवांची राजधानी जगांतील सर्व व्यापाराचें केंद्र द्वारका नेमस्त केली.

श्रीकृष्णाचे आज्ञेनुसार विश्वकर्म्यानें एका रात्रींत द्वारका रचून सुधर्मा सभा तयार कली. तेथें श्रीकृष्णाचे अध्यक्षतेंत नित्य सच्छास्त्र व भागवत धर्माचा विचार होत असे.

## ५० विश्वकर्मा व श्रीहरीचें चित्र.

उपजाति-

आनंदवी कृष्ण सभा सुधर्मा. ।
तेथें कला-पंडित विश्वकर्मा ॥
गर्वें वदे :-" माझि करा परिक्षा, ।
कांहीं मला द्या, जयपत्र-शिक्षा. "॥१॥

तेव्हां श्रीकृष्ण उद्धवास म्हणतातः-

वदे हरीः-" मांडित द्वारका ही ।
हा शिल्पि एका रजनींत पाही. ॥
द्यावें कसें तें जयपत्र कांही ।
या यादवा माहित रीत नाहीं. ॥२॥
तूं उद्धवा! जाणसि लोक-नीती, ।
लिहावया घेइ दऊत हातीं " ॥

चतुर उद्धवानें श्रीहरिचें मनोगत ओळखिलें.

जाणूनिया वर्म रमाधवाचें ।
बोलूं सरे उद्धव नम्र वाच. ॥३॥

परमात्मास अभिमान आवडत नाहीं. विश्वकर्म्यास उद्धव म्हणतोः—

“ तूं विश्वकर्मा अतुल त्रिलोकीं. ।
सार्श्चर्य त्वत्कर्म विधी विलोकी. ।
सभा सुधर्मा रचिलीस बांकी, ।
उरे परी स्वल्पचि काम बाकी. ॥४॥
केली सभा अद्भुत कल्पना ही. ।
तिथें हरीची तसबीर नाहीं.॥
शृंगार लेणें, परि नाहिं कुंकूः ।
कलेवरीं संत न येति थुंकूं. ॥५॥

कणेवीण सोपटें । कणसें लागलीं घन दाटें । काय करावे गोमटें । ओस नगर ॥ उद्धव म्हणतातः—

आणी हरीची तसबीर ताता !।
देतों तुला मी जयपत्र आतां. ॥

इतक्यांत बळिराम दादा म्हणतातः—

“ पै व्यंग जैं रेखिसि कृष्णनाथा, ।
सोटा पहा हाचि बसेल माथां ” ॥६॥

बळिरामदादाचें धमकीस्तव विश्वकर्म्यानें काळजीपूर्वक नित्य नवीन श्रीहरीचें चित्र आणलें. परंतु सभेस नापसंत ठरत गेलें.

रेखी हरीचें जरि चित्र सांग ॥
कांहीं तरी त्यांत दिसेंचि व्यंग. ॥
घेतो हरी नित्य नवीन रंग, ।
शंभू, उमा, इंद्र, विरिंचि दंग. ॥७॥

निराश होऊन विश्वकर्मा घोर आरण्यांत रडूं लागला. श्रीहरीचें चित्र कसें काढावें अशी थोर चिंता लागली. इतक्यांत नारदमुनी येऊन त्यास म्हंणतात.

रे विश्वकर्म्या ! रडसी कशाला ? ।
सूर्यापरी होति कधीं मशाला ? ॥
घे आरसा हा. हरिपायिं ठेवी. ।
त्याचें जसें रूप तयासि दावी. ॥८॥

नारदानीं दिलेला आरसा घेऊन विश्वकर्मा सुधर्मा सभेंत आला, व श्रीहरीस म्हणाला:—

"त्वद्रूप हें नित्य अपूर्व देखूं,।
चित्सुंदरा ! केवि पटांत रेखूं ? ॥
मी ठेवितों हा तव पायिं ऐना, ।
आहेसि तैसा बघशील नैनां." ॥९॥

तेव्हां उद्धव या श्रीहरिलीलेचें रहस्य सभेस सांगतात:—

"शुद्धांतरावीण त्रिलोकिं कांहीं, ।
नेण्यां प्रभू सन्मुख वस्तु नाहीं. ॥
हा आरसा सद्गुरुनाथ देतो, ।
चित्सूर्य तेथें उदयासि येतो". ॥१०॥

---

या अवसरांत द्रोणाचार्यांनीं कौरव पांडव उभयतांस शस्त्रास्त्र विद्येचें उत्तम शिक्षण दिलें. त्यांत अर्जुनच परिक्षेंत गुरूस पसंत झाला.

## ५१ वेध परिक्षा. (स्रग्धरा)

देवूनी शस्त्रविद्या कुरुकुल तरुणा द्रोण त्यानां परीक्षी; ।
बोले:—"वेधा तुम्ही जो तरुशिखरिं दिसे एक हा भास पक्षी." ॥
धर्मा दुर्योधनात तरु, गुरु, खग ही दीसती तेथ अक्षीं. ।
एका पार्थासि पक्ष्याविण अणुहि तिथें अन्य आला न लक्षीं. ॥१॥

उपजाति— पार्थासि आलिंगुनि द्रोण बोले:- ।
"धनंजया! शिक्षण पूर्ण झाले. ॥

लक्ष्याविना अन्य जया निमाले, ।
त्यानेंचि लक्ष्यावरि वेधियेले." ॥२॥
भासावरीं अर्जुन बाण सोडी, ।
पक्ष्यासि वेधूनि सवेंचि पाडी. ॥

गुरूविना लक्षित जो न आना, ।
प्रत्यक्ष त्या ब्रह्म मिळे सुजाणा. ॥३॥

असो. शंभर अधर्मी कौरवांनीं सर्व तऱ्हेनें पांच पांडवांचा छळ केला. त्याना मारण्याचे अनेक उपाय योजिले, शेवटीं लाक्षाग्रहांत जाळण्याचा यत्न केला, तरी श्रीहरीचें सहायानें पांडवांचाच जय होत गेला. ॥ यतो धर्मस्ततो जयः ॥ मातृ-आज्ञेनें पांच पांडवांनीं द्रौपदीस वरल्यानंतर इंद्रप्रस्थास राजसूय यज्ञ आरंभिला. श्रीहरीस पाचारणार्थ एक ब्राम्हण द्वारकेस पाठविला.

## ५२ श्रीहरीपुढें नेण्यास उपायन.

उपजाति-
हरी पुढें ब्राह्मण दीन आला. ॥
हरी म्हणेः- "काय उपायनाला ? ॥
पोहे, कण्या, सालि, पुरेल पाला. ।
तुकेन एका तुळसीदळाला." ॥१॥
येरू वदेः-" हे जगदेकनाथा! ।
नाहीं तुझें तें न दिसेचि ताता !" ॥
श्रीकृष्ण बोलेः- " बहु गोड बातां ।
स्वामी! मला कां झकवूं पहाता?" ॥२॥

ब्राम्हण म्हणालाः-

" माझा असे, आणिक तूज द्यावा, ।
पदार्थ दुर्मीळ कुठें पहावा ? ॥
माझा नसे पैं, मजपाशि ठेवा, ॥
ऐसा निवेदीन पदार्थ देवा ! ॥३॥

दीनत्व माझें पदरांत आहे, ।
नैवेद्य हा तूं आणुमात्र पाहे; ॥
तूं देसि दीनत्व तुझी कृपा हे. ।
प्रसाद तूझा चिरकाल राहे." ॥४॥

श्रीहरि दीनदयाळू. स्वताचें दीनत्व दिसणें हीच हरीची कृपा. ब्राम्हणाचें विनंतीस मान देऊन प्रभू राजसूय यज्ञास गेले. पण तो राजस याग होता. त्याचा घोर परिणाम झाला.

## ५३ राजस राजसूयाचा परिणाम.

शार्दूल० धर्में राजस राजसूय रचिला जिंकूनि पृथ्वी-पती. ।
लागे अंधसुतासि आग हृदयीं देखूनि ती संपती. ॥
पुढें मयासुरानें रचिलेल्या शिल्पसभेंत दुर्योधन भांबावला.
गर्वें द्रौपदि भीम जैं खदखदा दुर्योधना हासती, ।
या उपहासानें दुर्योधन चिडला.
द्यूतीं जिंकुनि ओढिली फरफरा त्या पांडवांची सती. ॥१॥

## ५४ धर्मास सत्संगामुळें वनवास आनंदप्रद.

शार्दूल० खेळे द्यूत पुन्हा युधिष्टर. रिघे बंधूसवें काननीं. ।
धर्मा संत न सोडिती, स्वतनुची चिंता न त्यांचे मनीं. ॥
पण वनांतही सर्व संतांच्या अन्नाची सोय झाली.
सूर्य-स्थालि अपार अन्न पुरवी. त्या संत-संतर्पणीं ।
आनंदीं वनवास ही परिणमे. श्रीकृष्ण लाभे धणी. ॥१॥

---

धर्माचे आश्रमांत भूतमात्रांना अन्नाची उणीव नव्हती. परंतु दुर्वासमुनीस राजवैभवयुक्त दुर्योधनाचा आदर आवडला. दुर्वासमुनी दुर्योधनाकडे येतांच पूर्ववत् शिष्यही जमा झाले. दुर्वासांचा अनुयायी आहे असें समजतांच अनेक राजसेवक त्याचा यथायोग्य स्थानांत

ठेवून यथायोग्य सत्कार करीत. त्यामुळें शिष्य-समुदाय बराच वाढला. दुर्योधनानें स्वतां दुर्वासमुनीची सादर-सेवा केली. मुनी प्रसन्न होतांच दुर्योधन वर मागतो:—

## ५५ दुर्योधनाचें सत्कर्म व त्याचे अन्नाचा परिणाम.

**शार्दूल०—"आतिथ्यासि सशिष्य पांडव घरीं रात्रौ रिघावें वनीं।**
**सूर्य-स्थालिंत अन्न रात्रि नसतां टाका तयां भस्मुनी."॥**

---

**तात्पर्यः—सत्कर्माचरणाहि दुष्ट मिरवी धर्माचिया मारणीं.।**
**दुष्टान्नें परिपुष्ट तो मुनि निघे धर्मच्छला कारणीं. ॥१॥**

दुर्वासः—(शिष्यांस) मी सत्य-प्रतिज्ञ आहे. चातुर्मास राज्यवैभवाचें सुग्रास नित्य भोजन झालें. आतां धर्माचें घरीं भोजन मिळेपर्यंत सर्वांस उपवास ! धर्मराज आमचें आतिथ्य न करील तर बंधुवर्गासह त्याचा नाश ! चला !

शिष्यः—धर्माचा नाश ! मग अखंड राज्य-विलास ! चला.

---

सायान्हानंतर द्रौपदीनें सूर्यस्थाली धुवून पुसून ठेविली असतां अन्न मिळणें अशक्य असें जाणूनही अयुत शिष्यासह वनात धर्माश्रमीं दुर्वासमुनी आले. पांडवानीं अर्घ्यपाद्यादि सर्वांचें पूजन केलें.

दुर्वासः—दुर्योधनानें राज्यवैभवांत आमचें चातुर्मास आतिथ्य केलें तेव्हां पासून आम्ही सर्व बुभुक्षित आहोत. सत्वर भोजनास पाहिजे.

धौम्यः—बुभुक्षितः किं न करोति पापं। क्षीणा नरा निष्करुणाभवंति ॥

धर्मराजः—बरे, स्नानसंध्या सारून यावें. तों पर्यंत श्रीहरिकृपें पाक सिद्ध होईल.

मुनीगण स्नानास गेले. द्रौपदीस चिंता पडली. तिनें एकांतांत समाधिस्थ राहून श्रीकृष्णाचा धावा केला.

## ५६ शाकपत्रानें विश्वाची तृप्ती.

शार्दूल० "कृष्णा! ये." म्हणतांचि द्रोपदि सती, श्रीनाथ आला त्वरें.
मागें भोजन. शाकपत्र सतिनें देतां म्हणे:-" हें पुरें!" ॥
झाला तृप्त हरी. मुनीगण जलीं संतृप्त त्या ढेंकरें;।
केलें सकट-मुक्त पंडुकुमरां लीलेंचि विश्वंभरें. ॥१॥

तृप्त होऊन पांडवास ही प्रभूनीं दर्शन दिलें.

श्रीकृष्णः—पैं गा भक्तीचेनि नांवें। फूल एक मज द्यावें। ते लेखें तरी म्यां तुरंबावें। परी मुखीची घाली ॥ हें असो कायसीं फुलें। पानाचि एक आवडतें जाहालें। तें साजुक नहो सुकलें। भलतैसें ॥ परी सर्व भावें भरलें देखें। आणि भुकेला अमृतें तोखे। तैसें पत्रचि परी तेणें सुखें। आरोगूं लागे ॥ पैं भक्ती एक मी जाणें। तेथ सान थोर न म्हणें। आम्ही भावाचे पाहुणे। भलतेया ॥ येर पत्र पुष्प फळ। हें भजावया मिष केवळ। वांचूनि आमुचिया लागीं निष्कळ। भक्तितत्त्व ॥

श्रीकृष्ण अंतर्धान पावतात. प्रभू तृप्त होतांच स्थालींतून अपार अन्न निघून पात्रें सिद्ध झालीं. मुनिगणास सहदेव पाचारणार्थ आला.

## ५७ धर्मच्छलाचें प्रायश्चित्त.

शार्दूल०—पाचारी सहदेवः-"सत्वर चला! हा पाक होतो शिळा."।
दुर्वासा वदला सखेदः-"मुनि हो! आलोंत धर्मच्छळा, ॥

इतक्यांत अंबरीषास छळ करून मारण्याकरितां कृत्या निर्माण केली, ती स्वताचेच पाठी लागल्याचें दुर्वासास स्मरण झालें.

कृत्या पाठीसि लागली! विसरलों दुःसंगतीं मी खुळा.।
भक्तांतें छळितां हरी न सुधरीं. आतां पळा रे पळा!" ॥१॥

पळत्या फळाची आज्ञा. सर्व शिष्य अंधकारांत सैराट धावूं लागले. दुर्वास एकटेच वाट चापचीत राहिले. इतक्यांत नारद मुनीचें भजन

दुर्वासाचें कानीं पडलें भजनाचें अनुसंधनानें दुर्वास मुनी नारदाजवळ आले.

नारदमुनिः–कां तपोनिधि! कठिण समय येतां कोण कामास येतो?

दुर्वासः–हरिभक्त संतच अशा कठीण प्रसंगीं कामास आला. माझा एकही साथीदार येथें नाहीं. ——— भीमसेन येतात.

भीमसेनः–दुर्वास मुने ! धर्मराज मार्गप्रतीक्षा करीत आहेत. मी नेण्यास आलो आहे.

दुर्वासः–आतां ! पुढें ?

नारदमुनीः–आतां धर्माश्रमास चलावें. नाहींतर पुढें यमधर्माकडे.

---

दुर्वास मुनि धर्माश्रमास आले. पांडव मार्गप्रतिक्षा करीत जागत होते. त्यांनीं यथाविधि सत्कार केला. इतक्यांत अरुणोदय झाला.

दुर्वासः–( संतोषयुक्त ) पांडवांचा श्रीहरि पाठिराखा आहे. त्याचें कल्याण असो. नारदा ! माझी सर्वत्र फजीती होते. कोठें चुकलों तें सांगा !

नारदः–अत्रिनदना ! दत्तात्रेयानुजा ! आजपर्यंत चुकलें त्याची भरपायी आज तुझ्या या प्रश्नानें झाली. तुझा बंधु दत्तात्रेय स्वताहाची सुधारणा शास्त्रास व इतरांस गुरू मानून करितो, आज जगद्वंद्य आहे. तुझें गुरुविण तप व्यर्थ आहे.

## ५८ गुरुविण हिरण्यकशिपूचें तप व्यर्थ.

हिरण्यकशिपूनें स्वतपोबलानें ब्रम्हदेव प्रसन्न करून वर मागितला.

भुजंग० दिती पुत्र मागेः–" मला ब्रम्हदेवा ! ।
घरा आंत बाहेर मृत्यू नसावा. ॥

न शस्त्रें न अस्त्रें नरें श्वापदें वा, ।
न मारो मला आपुला कीं परावा. ॥१॥

मरावें न मी येथ रात्रंदिसाला, ।
मरावें न मी भूमिं कीं अंतरालां, ॥
असावें अबाधीत मी देशकाला" ।
"तथास्तू !" म्हणोनी विधी गुप्त झाला ॥२॥

---

विधी हीं जरी देत ऐशा वराला, ।
नखाग्रें हरी फाडि दैत्या कराला. ॥
तपाचे प्रयासें नव्हे सिद्धि त्याला, ।
गुरूवीण सायास तो व्यर्थ गेला. ॥३॥

---

गुरु असता तर संधिस्वरुपाचें ज्ञान होऊन कच्चा वर न मागता.

दिवा रात ना आंत बाहेर कांहीं, ।
अबाधीत जो देशकाला सदाही, ॥
नसे व्यक्त अव्यक्त संधीत राही, ।
अशा अमृता माय दे लेकराही. ॥४॥

ना तरि सांडूनि हे सोये । सोडूनि श्रद्धेची बाहे । दुराग्रहाचो त्राये । वाढऊनिया ॥ मग अश्वमेध कोडी कीजे । रत्नें भरोनि पृथ्वी दीजे । एकांगुष्ठींही तपिजे । तपसाहस्री ॥ जलाशयाचेंनि नांवें । समुद्रही कीजती नवे । पारि किंबहुना आघवे । वृथाचि ते ॥ गांठीं बांधली खापरी । येथ अथवा पैलतीरीं । नसरोनी जैसी मारी । उपवासी गा ॥ तैसे कर्मजातें तेणें । नाहीं ऐहिकिचें भोगणें । तथ परत्र तें कवणें । अपेक्षावे ॥ म्हणोनि ब्रम्ह–नाम–श्रद्धा । सांडूनि कीजे जो धांदा । हें असो शीणु नुसधा । दृष्टादृष्टीं तो ॥ ज्ञा. १७ ॥

## ५९ गुरुकृपेनें प्रल्हादास तपावीण अमरत्व.

भुजंग० कसा गर्भश्रीमंत प्रल्हाद झाला, ।
गुरूबोध गर्भीं मिळाला जयाला; ॥
पित्यानें तया मारण्या यत्न केला; ।
जळीं पावकीं नाहिं प्रल्हाद मेला. ॥१॥
म्हणे दैत्यः–"दैवा ! असें काय झालें ? ।
कसें अर्भकें मृत्युला जिंकियेलें ? ॥
तपाचें मला फारसे शीण झालें, ।
तपावीण या अर्भका पुण्य आलें." ॥२॥
तात्पर्य तपावीण सिद्धी गुरू चाकराला ।
न भीती कधीं ते कृतांता कराला ॥
धरी साहजीं आपुलीये कराला; ।
गुरूमाउली जोगवी लेकराला ॥३॥

नारदः–सद्गुरुचा मोहोरशिक्का ज्या जिवावर झाला, तो लोकत्रयांत मान्य आहे. राजाज्ञेची अक्षरें आहाती । तियें चामा एका जया पडती । तया चामासाठीं जोडती । सकल वस्तु ॥ वांचूनि सोनें रुपें प्रमाण नोहे । एथ राजाज्ञाचि समर्थ आहे । तेचि चाम एक जैं लाहे । तेणें विकती आघवीं ॥

धर्मराजः–प्रल्हादापुढें अग्निनें आपलें दाहकत्व कसें सोडिलें ?

नारदः–भक्तिप्रेमांत प्रगट होणारें आत्मतेज सर्व तेजांत श्रेष्ठ आहे. भीषास्मात् वाति वातोऽयं भीषोदेति सूर्यः ॥

## ६० प्रेमाग्नी जडाग्नीस जाळतो.

उपजाति— श्रीराघवें मारुनि रावणाला ।
स्वीकारु इच्छीत विदेहबाला ॥

शुद्धी करायासि शुभाग्नि ज्वाला. ।
सीता वदे हांसुनि पावकाला. ॥१॥
" कायेसि वाचेसि मनासि प्यारा ।
रामाविना कोणि असेल न्यारा, ॥
जळो जळो हा तरि देह सारा; ।
हो पावका! ना तरि गांग-धारा. " ॥२॥

भुजंग० वदे अग्निः-" वैदेहि ! मात! विदेहीं, ।
इथें जाळण्यासी तुला देह नाहीं. ॥
तुला स्पर्शता सर्व मद्दाह जायी. ।
तुझ्या यागुणें राम निर्गुण होया. " ॥३॥

---

तात्पर्य- असे प्रेम प्रत्यक्ष अंगार होळी ।
प्रियावीण जें विश्वमात्रासि जाळी ।
गुरूमाय तें प्रेम देऊनि पाळी ।
गुरूमाउली साहजी ही कृपाळी ॥४॥

धर्मराजः-यतोऽवाचो निवर्तंते अप्राप्य मनसासह ॥ अशी श्रुति आहे. गुरु वाक्यानेंच दिक्कालाद्यनवच्छिन्न वस्तूचा बोध कसा संभवतो ?

नारदः-लौकिक वस्तूंचा बोध सुद्धां हृदयानें हृदयास होतो. वक्ता व श्रोता यांचें हृदयांचें ऐक्य होई तों नुसता शब्दार्थ बोध झाला, तरी वस्तुबोध होत नाहीं. म्हणून लौकिक वस्तूंचें ज्ञानास ही तज्ञ गुरूंची अपेक्षा आहे. सद्गुरू दिक्कालाद्यनवच्छिन्न, व त्यांचा शब्दही तसाच व्यापक आहे. एक शिष्य प्राणिशास्त्रज्ञ गुरूस विचारितोः—

## ६१ गुरुदत्तबोधाचें व्यापकत्व.

शार्दूल०-"प्राणी कोण पिलींच वीति जगती, दे कोण अंडीं किती ?
याची ती गणती करीत बसतां भांबावली मन्मती " ॥

याप्रमाणें गुरूस शिष्यानें प्रश्न केला. त्यावर शास्त्रज्ञ गुरु सांगतातः-

**"वीतो कान जया." म्हणे गुरु तया "दे येर अंडीं अती।
ऐसा सद्गुरु-बोध पूर्ण भरला व्यापूनि विश्वाप्रती.॥**

हें अध्यात्म शास्त्र असेंच आहे. यज्ज्ञात्वा सर्वं विज्ञातं भवति ॥

दुर्वासः—तपसा ब्रम्ह विजिज्ञासस्व। तपो ब्रह्मेति ॥ या वचनाची आपण काय व्यवस्था लावतां?

नारदः—उपनिषदांतील प्रत्येक अनुवाकांत पुनः पुनः तप शब्द प्रयुक्त आहे. त्याचा गुरुमुखानें अर्थ आधीं समजून घ्यावा, व गुरु सांगतील तें तप आचारावें, म्हणजे क्रमाक्रमानें अध्यात्माचें रहस्य प्रकाशतें. सद्गुरुनें सांगितलेल्याच तपानें घट—शुद्धि होते. मनसोक्त स्वैर तप अनर्थास कारण आहे. मी पूर्वकल्पांत दासीपुत्र सद्गुरु सेवेंत होतो, तेव्हांची कथा ऐका. ——— नारद सांगतातः—

## ६२ घटाची शुद्धि.

सद्गुरुनीं तेलानें मेणकटलेला एक घडा देऊन मला आज्ञा केलीः—" जा! निर्मळ कोरा करून आण." तेव्हां, " ज्ञानाग्निः सर्व कर्माणि भस्मसात् कुरुते" या वचनास येथें मी लागूं केले. पहिला प्रयोगः—

**प०— मी अंगणीं चेतावि थोर होळी;।
मेणी जळायासि घटासि जाळी.॥
त्या मेणिची जाय बिंदींत घाणी;।
घडा फुटे, सर्व पुरी दणाणी! ॥१॥**

दुर्वासः—हें माझेंच चरित्र आहे!

नारदः—घटाच्या जळत्या ठिकऱ्या इतस्ततः उडून आसपास गोरगरिबांच्या झोपड्यांचा नाश झाला. मागून फैर ब्रिगेड आली. चौकशी होऊन या अनर्थाला मीच कारण झालो असें ठरलें. गोरगरिबांचा जो नाश या प्रयोगानें झाला त्याची भरपायी करूं शकलो नाहीं. असो.

मिळाल्या तेवढ्या ठिकऱ्या श्रीसद्गुरु चरणीं निवेदन केल्या. सद्गुरु म्हणतात:—

**“आधीं नसे ज्या घटि चित्त-शुद्धी,**
**ऐशा घटा शाब्दिक ज्ञान भेदी. ॥**
**तो भंगतां कोण पडेल खेदीं ? ।**
**पाखंड त्याचें इतरांसि बाधी.” ॥२॥**

दुर्वास:–हें ही आमचेंच चरित्र !

नारद:–पुन्हां दुसरा घट देऊन, सद्गुरुनीं मग घट–शोधनाची रीत सांगितली.

**“ आधीं त्यजावी खरडूनि मेणी, ।**
**तूं आंत बाहेर न ठेवि घाणी. ॥**
**घासी रिठें आणिक उष्ण पाणी, !**
**जो पैं उरे तेलकटा निषाणी. ॥३॥**
**घे मृत्तिका गोमय; लिंप आंत; ।**
**सारांव बाहेर. ठिवी उन्हांत. ॥**
**षण्मास भावें करि नित्य पोरा! ।**
**तेव्हां क्षणार्धात करीन कोरा.” ॥४॥**

सद्गुरु वचनावर विश्वास ठेवून सांगितल्याप्रमाणें आंत बाहेर घट स्वच्छ करून त्यांचें चरणीं निवेदन केला. तेव्हां त्यांनीं आपली करणी दाखविली.

**श्री सद्गुरूची करणी विचित्र, ।**
**रसायना लावुनि नाम-मात्र, ॥**
**दृष्टी घटाच्या हृदयांत स्पर्शी. ।**
**केलें घटा भिंगाचि पारदर्शी. ॥५॥**

याप्रमाणें घट भिंगासारखा झाल्यावर तो पारदर्शी आहे अशी खात्री पटविली.

**नीरांजना नाथ घटांत स्थापी ।**
**त्याची प्रभा अंतरबाह्य व्यापी. ॥**

आणि त्यातले त्यांत विशेष हें:—

**नाहीं घटा छिद्र कुणे ठिकाणीं; ।**
**गुरू घरीं आजि भरीत पाणी. ॥६॥**

नारद:—पहिल्यानें स्वधर्माचरण, नंतर घटशुद्धि, वासना त्यागाचें तप, उपासना, श्रीहरीची दया, सत्समागम, संत सेवा, गुरूची दया, अशी पायरीनें पायरी आहे.

दुर्वास:—एकूण माझें स्वैर तप व्यर्थ आहे.

---

अर्जुन:—सारांश सदाचारशील निर्वासना अंत:करणांत शेवटीं उज्वल ज्ञान प्रकाशतें, हें तरी स्वताचे कर्तबगारीवर अवलंबून आहेना?

देवल:—सर्व कतबगारी गुरूची! अत्यंत दुराचारी जीव सद्‌गुरूस शरण गेला असतां त्यालाही सद्‌गुरू सुधारतात, ही सुधारणा गुरुचेच हातांत आहे. पूर्वीं नारदास एक चोर भेटला, त्याची हकीकत.

## ६३ चोराला उपदेश.

**शार्दूल० "चोरा तूं निगुरा!" म्हणे कुणि तया. ती लाज ये तस्करा. ।**
**गेला नारद पायिं. नम्र विनवी:-"तारा मला लेकरा." ॥**
**बोले नारद त्यासि:-"आधि तरि तूं दे दक्षिणा या करां; ।**
**चोरी नेत तुला सुळावरिं तरी तूं बोल बोले खरा." ॥१॥**
**रात्रीं फोडुनि चोर राजभुवना, ने चार मोठे हिरे. ।**
**कोठारी लपवीत दोन उरले.—चोरींत चोरी जिरे. ॥**
**चोरी सांगत चोर. त्यासि नृपती सन्मूख नेतां त्वरें, ।**
**बोले:—"नाहित दोन ठाउक मला. हे चार नेले खरे." ॥२॥**

**कोठारी झडतींत चोर ठरला. चोरा मिळे चाकरी. ।**
**सत्यत्वें रुचला नृपासि. परि तो आला गुरू मंदिरीं. ॥**
**बोलेः-" स्वामि ! बराच मी सुधरलों देतां तुम्हां वैखरी. ।**
**आतां लोचन, कर्ण, चित्त अवघें अर्पोन या पायरीं. "॥३॥**

नारदः-तो चोरही उद्धरला. भगवंत म्हणतातः-

अगा अंतींचिया मती । साचपण पुढिले गती । म्हणोनि जीवित जेणें भक्ती । दिधले शेखीं ॥ तो आधीं जरी दुराचारी । तरी सर्वोत्तमाचि अवधारी । जैसा बुडाला महापुरीं । न मरत निघाला ॥ ज्ञाने० ॥

भीमसेन:- चालूं द्या वेदांत ! माझें हृदयांत कौरवांचें दुराचरण अहोरात्र सलत आहे. केवढें हें दुःख आम्ही सोसीत आहोंत ! येथें वनवासातही छळण्यास दुर्वासास पाठविले आहे ! कौरवांचा सूड घेऊन मी केव्हां सुखी होईन ? ————

नारद नामस्मरण व भजन करूं लागले. त्यासरसें सर्व पांडव भजनांत दोन घटका लीन झाले.

भीमसेन:-बोला नारदा ! बोला ! माझे प्रश्नांचे उत्तर द्या.

देवल:-बा भीमसेना ! तुला उत्तर मिळालें, पण तूं त्याला ओळखिले नाहींस. विश्वारंभीं नारदांनीं याच युक्तीनें सुखदुःखास शून्य दाखविलें. ब्रम्हदेवानें सुखदुःख निर्मिलें तेव्हां जन ब्रम्हदेवास विनवितात.

## ६४ सुखदुःखाची गांठण.

**शार्दूल०-" वैरानें सुखदुःख भांडति. विभो ! संधी तयांचा करी."**
**लोकांच्या विनतीमुळें विधि जुळे सांधीत पुच्छांतरीं. ॥**
**पाचारीति सुखासि, तोंचि रिघतें हें दुःख त्यांचें घरीं. ।**

विवेक श्रवणें खरपुसें । जेथ व्रताचरणें कर्कशें । करितां जाती भोकसे । बुध्द्यादिकाचे ॥

**या दुःखासि पिटाळितां, सुख पळे दुःखासवें सत्वरीं. ॥१॥**

आले लोक पुन्हां. विधीस म्हणती:-"ही जोड तोडी कशी!"
ब्रह्मा बोलत:-"एकजीव जडली जोडी! सुटेना मसी!" ॥
ती जोडी जन नेति, देथ इतरांही आणिती आपदा!।
त्यांचा विग्रह तो बरा. म्हणुनिया पाचारिती नारदा. ॥१॥

नारद विग्रह करण्यांत कुशल! हें एकत्र असलेलें जुळें वेगवेगळें राहील तरच बरें, असे कल्पून नारदास पाचारण केलें. व रडकहाणीचा प्रस्ताव करणार, तोंच—

तेव्हां नारद नायके रडकथा. "गायी हरी श्रीधरा!।
विष्णू केशव कृष्ण वेणुनिनदा! दामोदरा सुंदरा!" ॥

———

गेलें तें सुखदुःख शून्य ख मधें त्यांचें स्वतांचें घरां.।
ब्रम्हानंद गुरूसि, जीव सहजा देखे, परेच्या परा. ॥३॥

देवल:—सुख चांगलें शून्य. दुःख वाईट शून्य. दुःखाचें चिंतन दुःख. सुखप्राप्तीची आशा दुःख. गतगोष्टीचें चिंतन दुःख. अगामी आशा दुःख. हें सांडून बाकी हरिचिंतन सुखच सुख.

भीमसेन:—हें खरें आहे. मला जेव्हां पुन:पुन्हां कौरवांच्या स्मरणानें दुःख होतें, तेव्हां श्रीकृष्णाचें चिंतनांत सुखनिद्रा येते.

नकुल:—नारदा! आज आपण भजनांत केवढा महाप्रसाद दिला! कृपा—कटाक्षानें सर्व सभेस समाधि दिली, धन्यभाग्य आहे.

नारद:—अरे! प्रसादाची जोपासना अखंड पाहिजे.

## ६९ गुरुप्रसादाची जोपासना.

सद्गुरूनीं दोघा शिष्यास उपदेश व हरभऱ्याचा प्रसाद दिला.

शार्दूल० शिष्या देउनिया चणे, गुरु म्हणे:—"बीजा जपूनी ठिवा।
होतो श्रीहरिचा प्रसाद जितुकी चित्तांत आस्था जिवा" ॥

एकानें तो प्रसाद जपून पूजेंत ठेवला.

**ठेवी संपुटिं एक. लावित सणावारीं तुपाचा दिवा. ।**
**झाला भूसभुगा प्रसाद. परि तो नेणें कसा केधवा ! ॥१॥**

कैक वर्षांनीं श्रीगुरूनीं प्रसाद दाखविण्यास सांगितलें. पाहतात तों संपुटांत त्या प्रसादाची दुर्दशा झाली होती. दुसऱ्या शिष्यानें प्रसाद जपून ठेविला तो असाः—

**भूमी शुद्ध खणी दुजा. गुरुकृपा भाकी. करी पेरणी. ।**
**रोपा राक्षित कुंपणीं, अनुदिनों जागूनि जोपासनीं. ॥**
**आलें पीक न वेंचि. पेरित पुन्हा. लावी गुरू कारणीं. ।**
**वाढे भाग्य. म्हणे प्रसाद गुरुचा, तो धन्य दाता धणी! ॥२**

याप्रमाणें ज्या शिष्यानें असी प्रसादाची जोपासना व कदर केली तोच अध्यात्म ज्ञानाचा अधिकारी ओळखून त्याला अध्यात्मदृष्टी याच दृष्टांतानें सद्गुरूनीं दिली.

सहदेवः–हर–भरा! सर्व ठिकाणीं व्याप्त श्रीवासुदेव! त्याचे पूजन अल्पमती अल्पसामर्थ्य लेंकरानें कसें करावें ?

असितः–(आनंदयुक्त) सहदेवा! तूं वयानें लहान, पण केवढारे उत्तम तुझा प्रश्न! ऐने-महालात श्रीरामास माळयानें कसे पूजिलें,त्याची कथा ऐक.

## ६६ ऐने महालांत राम.

**ऐने महालीं रघुराज बैसे ।**
**अनेक ऐन्यांत समान भासे ॥**
**माला करीं घेउनि माळि आला, ।**
**कोणास घालूं न कळे तयाला. ॥१॥**

प्रत्येक ऐन्यामधिं राम शोभे. ।
सचित माळी तितुक्यांत ऊभे. ॥
भांबावुनी माळि करीत शोका; ।
तें दुःख त्याचें न कळेचि लोकां. ॥२॥
आला तिथें नारद शोकनाशी; ।
रामाविना देखुनि त्या उपासी; ॥
कारुण्यवेगें मग त्यासि बोधी; ।
सांगे तया युक्ति सुगम्य साधी. ॥ ॥३॥

---

"जेथें दिसे राम अणीक तूंही ।
न तूं खरा, रामहि तेथ नाहीं. ॥
नाहींसि तूं, रामचि एक राही, ।
तेथें खरा राम. तिथेंचि पाही. ॥४॥
सन्मूख रामा मग नीट जावें, ।
एका तयावीण नसोंचि ठावें. ॥
बालाग्र रामांतुनि ना हटावें, ।
तरीच श्रीराम-पदीं पटावें. ॥५॥
रामांत नाशे प्रतिबिंब तूझें, ।
तेथेंचि श्रीराम खरा विराजे. ॥
रामाविना अन्य नुरेल कांहीं, ।
आटे तुझें पौरुष[1] तेथ पाही." ॥६॥

---

माळी सुबोधा सरिसाचि धावला. ।
रामाचिया शीघ्र नमीत पावला. ॥
प्रेमें हरीला मग हार घातला. ।
श्रीराम पावूनि मनीं सुखावला. ॥७॥

---

१ देहधारित्व.

श्रीराम बोले मग त्यासि लीलाः- ।
“ अनंत रामासि अनंत माला, ॥
केशा तुवा अर्पियल्या सुवेळां, ।
पाहे सभोंती उघडूनि डोळा. ” ॥८॥
माळी वदेः-“ श्रीगुरुराज माउले! ।
तुझेचि मी वंदित नित्य पाउलें. ॥
तुला दिलें तें जगतासि पावलें. ।
तुझें पदीं चित्त वसों विसावलें.” ॥९॥

नारदः-सहदेवा ! विश्वव्यापी जगद्गुरु श्रीकृष्णाचें पूजेनें सर्व विश्वाचें पूजन होतें, हें पूर्वी राजसूय यज्ञांत तूंच प्रतिपादन केलें होतेस. द्रौपदीनें नुकतेंच शाकपत्र प्रभूस अर्पण केले त्यानें सर्व मुनिगण ढेंकरा देत निघून गेले. ही सद्यःप्रचीती आहे.

धौम्यमुनिः-नारदा ! परमात्मप्राप्तीचा उत्तम मार्ग कोणता ?

नारदः-गुरूपदिष्ट मार्ग उत्तम. सद्गुरु अधिकारानुरूप मार्ग दाखवितात. त्यांत एका मार्गानें जाणारानें दुसरे मार्गानें जाणारास कमी समजूं नये.

## ६७ विहंगम, कपि व पिपीलिका मार्ग.

शार्दूल० सद्धर्मी स्थिर जी मुळीं, पसरली वेदाचिया डाहळी, ।
शास्त्रें पालवि कोंवळीं, फुलवरा कर्माचिया पाकळी, ॥
सद्बोधामृत सौरसें लगटली ही दिव्य मुक्ताफळीं, ।
ऐसी कल्पलता जगीं विलसली श्री सद्गुरू माउली. ॥१॥
तेथें बोलाति कोकिळा कपिकुळाः-“कां घुर्वळा मांडिला? ।
लक्षा वेधुनि चाखिजे अवलिळां बोधामृताचें फळा.” ॥
बोले येरुः-“विहंगमा! चतुर तूं सर्वाहुनी आगळा. ।
चांचीचें फळ सांडिसी भुइवरी ऐसा कसा बावळा ?”॥२

बोले तेथ पिपीलिकाः—"सुजनहो! मी दीन पायातळीं.।
पं हा कल्पतरू करी मजवरी हो सीतळा साउली. ॥
वर्षे हा मकरंद पीयुष रसातें पाउला पाउलीं.।
केली थोर दया, मला न तुमची शक्ती प्रभूनें दिली. ॥३॥

देवलमुनिः—नारदा! क्रिया, भक्ति, आणि ज्ञान यांचे भासमान विरोधाचें समाधान कसें करावे?

नारदमुनिः—वस्तुतः एकाच धर्माचे हे कौटुंबिक, पण एका गुरु-प्रेमावीण परस्परांत विरोध होतो. गुरुप्रेमानेंच विरोधाचें निरसन होऊन या त्रयीची परिपूर्ती होते. ऐका.

## ६८ धरमचंद, भक्ति, क्रिया व ज्ञान.

भुजंग० धरमचंद होता धनी सावकार,।
तया माय ती भक्तिमाता उदार, ॥
सती पत्नि श्रद्धा पतीचा अधार,।
अपत्यें क्रिया-ज्ञान, कन्या-कुमार. ॥१॥

सदा भक्तिमाता वसे देव-द्वारीं.।
करी तेथ श्रद्धा पुजेची तयारी. ॥
ठिवीं ज्ञानजी चोकसीनें हुशारी.।
कुमारी क्रिया ती घरीं कारभारी. ॥२॥

असा थोर थाटांत संसार चाले;।
अल्या गेलियाचें समाधान झालें; ॥
यती, देवता, संत पाहूनि धाले;।
असें हें घराणें, जगीं बोलबाले. ॥३॥

---

जगाची नदी वाहतांना थकेना;।
तिथें पेरिलें धान ओघीं पिकेना. ॥

सुखाची घडी स्वस्थितीसी टिकेना, ।
कुणाचें भलें काळ देखों सकेना. ॥४॥
निजे तेथ श्रद्धा अवेळीं दुपारी, ।
गिळी मोह तो नाग तोतें विखारी. ॥
धरमचंद शोकानळें त्रस्त भारी, ।
करी सत्वरीं जोग घेण्यां तयारी. ॥५॥

---

कुटुंबांत वाटीत संपत्ति सारी; ।
निमी ठेवि मातेसि, पैत्राधिकारी; ॥
तृतीयांश कन्येसि, होती कुमारी; ।
सुतातें नवांशासि देऊनि वारी. ॥६॥
समाईक ठेवी घरा–धर्मशाला. ।
परी एक ती राहिली मुक्तमाला, ॥
असे दिव्य सत्राचि मोतीं जियेला, ।
विभागूं कसें तें कळेना कुणाला. ॥७॥
पडे घोर तंटा अजी नातवाला. ।
धरमचंद त्रासूनि वैकुंठिं गेला. ॥
घरीं मागुती थोर संग्राम झाला, ।
पटेनाचि कांहीं कुणाचे कुणाला. ॥८॥

---

क्रिया भांडते नित्यशा ज्ञानजीसी, ।
"बसोनी फुका हात मोडूनि खासी !" ॥
म्हणे ज्ञानजी "तूजला कर्कशेसी ।
जगीं त्रासले. बैस येथें सुखासी !" ॥९॥
घरीं भांडतां ओरडा जात आळीं; ।
बसे तेथ सेजारिया कानठाळी. ॥
करूं लागले लोक निंदा टवाळी, ।
"अहो धर्मचंद्रा घरीं आजि होळी !" ॥१०॥

गुरू पुत्रिका प्रेमळा माय आली. ।
म्हणे " भांडतांना घरा झालि होळी. ॥
स्वतांचें अतां रत्न मी एक घाली; ।
तुम्हां आठरा वाटिते मी निराळी. " ॥११॥

याप्रमाणें १७ मोत्यांत गुरुघरचें प्रेमरत्न मिसळून गुरूबालिकेनें या भांडणाऱ्या कुटुंबाचें समाधान केलें. तें असें:—.

"नऊ घे सती भक्ति, तूं पाळणारी. ।
सहा घे क्रिया, हावरी तूं कुमारी. ॥
अरे ज्ञानजी ! तूं विवेकी विचारी, ।
पुरे दोन हे. जिंकिसी पृथ्वि सारी ॥१२॥

उरे एक जें प्रेम, तें रत्न माझें. ।
अम्हां ठेव दीली गुरूमाय-राज. ॥
गुरू दृष्टिनें हें सदा होत ताजें; ।
गुरूचें पदीं ठेवणें यासि साजें. ॥१३॥

उगीं साक्षिला आपुलें रत्न आह्मीं ।
तुह्मां दावितां, जाहला पूर्ण तूह्मी. ॥
न ये प्रेम हें रत्न भागासि कामीं; ।
परी त्याविना सर्व जाग्या रिकामी. ॥१४॥

तुम्हां हातिं आला समाधान वाटा; ।
अतां जा कसें आपुलालेंनि वाटां. ॥
गुरू माउली साहजीं रत्नसाठा, ।
अह्मीं ठेवितों. नाहिं तूह्मासि तंटा." ॥१५॥

नारदः—केवल प्रेममूर्ती भगवान श्रीकृष्ण म्हणतात ।। तैसे मज एके विण । हे त्रयी धर्म अकारण । आतां मातें जाणूनि कांही नेण। तूं सुखिया होसी ॥

नारदः–द्रौपदी! तूं श्रीकृष्णाचा धावा करून आज पांडवास संकटांतून तारिलेस तुझी खरोखर धन्यता आहे. तूं बोल!

द्रौपदीः–मला दीन लेकराला आपणच सद्गुरुनीं श्रीकृष्णाचे ओटींत घातलें, तो मज दीनाकडे अखंड पाहतो. बालपणीं पाहिलेल्या एका गोष्टीचा अनुभव मी आज घेत आहे. द्रौपदी सांगते.

---

## ६९ मैना, माया आणि मंगु.

फार तर दोन तीन वर्षांची माझी बहीण मैना असेल. एकदां डोळे मिटून बसली. तांत्रिक, मांत्रिक, यांत्रिक उपचार सुरूं झाले. पांच दिवस झाले डोळे उघडेनात. सर्व राष्ट्रांत काळजी पडली.

**मैना लहानी नुघडीत डोळा. ॥**
**झाले बहु मांत्रिक वैद्य गोळा. ॥**
**केलें भलें त्यांनि कळेल तैसें; ॥**
**मैना परी नेत्र मिटूनि बैसे. ॥१॥**

सर्व उपाय थकले. कोणास कांहीं सुचेना. मायीनें मांजराचें पिलु आणून मैनेच्या ओटींत ठेविलें.

**ओटींत येतां पिलु मांजराचें, ॥**
**"मी येउं ?" तें बोलत दीन वाचें; ॥**
**करावया लालन लेकराचें, ॥**
**नेत्रासि मैना उघडीत साचे. ॥२॥**

मैना मंगूस कुरवाळून हंसते, व आतां डोळे उघडून सर्वांकडे पाहते. हें पाहून, ऐकून सर्व जगास आनंद झाला.

तात्पर्य **ऐसाचि श्रीबालमुकुंद हा ही, ॥**
**भल्या भल्या नेत्र मिटूनि राही. ॥**
**ज्या लेकरां माय ठिवील पायीं, ॥**
**कृपा दिठीं केवल त्यासि पाही. ॥३॥**

नारदः—सत्य आहे. ज्या दीन लेकरास सद्‌गुरु माउली श्रीबाल-कृष्णाचें चरणीं मंगूप्रमाणें ठेवील, केवल त्याचे करितां श्रीबालकृष्ण कृपेचा झोळा उघडतो. पण त्याचा आनंद सर्व जगास.

दुर्वासः—(सद्‌गदित) सहज बोलषें हित उपदेश ! मी या संत-संवादानें धन्य झालो. अंधारांत भटकत होतो. आज मला उजेडले. हे सती ! द्रौपदी ! इच्छित वर मग ! मी सर्वस्व देण्यास समर्थ आहे.

द्रौपदीः—(मुनीस वंदन करून) कुबेर प्रसन्न झाला तर रंकानें काय मागावे ? द्रौपदी सांगते.

---

### ७० समर्थास काय मागावे ?

घाली कुबेरा घरिं रंक फेरा. ।
रंकावरी येत दया कुबेरा. ॥
" तूं माग कांहीं, " म्हणतां कुबेरें, ।
म्हणेः—" मला त्वध्दन सर्व दे रे !" ॥१॥

दात्यास सर्वस्वी लुबाडण्यास आला, असा हा लोभी याचक. पण थोर ते थोरच, वचनास टाळीत नाहींत.

कुबेर बोलेः—" तरि नेइ कोठे" ।
रंकासि हें संकट घोर वाटे; ॥
" नेवूं कसा ? ठेविन यासि कोठें ? ।
भारा शिरीं वाहत जन्म लोटें. " ॥२॥
स्तवूनि बोले मग तो कुबेराः—।
" नेतां नयेसें दिधलें उदारा ! ॥
इथेंचि आतां ठिवितों पसारा; ।
माझा करी देह परीस सारा " ॥३॥

या मागणीस कुबेरानें मान्य केले, व म्हणाला "तथास्तु" व त्या रंकाची काया परीस झाली. पण अखेर तो फुकट मेला.

"तथास्तु"शब्देंचि परीस काया. ।
आकाश हर्षासि नुरें समाया. ॥
सोनेंचि विश्वीं, नचि अन्न खाया.
शोकानळें जात मरूनि वाया. ॥४॥

तात्पर्य गुरुत्व भारें कचरेल माथा. ।
संसिद्धि बाधे पडतांचि हातां ॥
जागा ! गुरूचे चरणासि लागा. ।
सेवेविना अन्य वृथा न मागा. ॥५॥

द्रौपदीः-मी पांडवांची दासी, मला त्यामुळें संतपदरज धूळीचा नित्य अभिषेक होत आहे. यावीण थोर काय आहे ?

नारदः-तपोनिधी ! तुमचा शाप भक्तावर चालत नाहीं. तुमचा अनुग्रह ते इच्छित नाहीत !

दुर्वासः— (नारदास वंदन करून) एकूण माझें तप अभक्ताचेंच. धिक्तप ! धिग्जन्म ! नारदा ! मी शरण आहे. श्रीहरिची दया होईल असा सन्मार्ग दाखवा. सेवा सांगा.

देवलः—तपोनिधी ! सेवेला आपली तपःसिद्धि आड येत आहे. देवल सांगतात:—

## ७१ भविष्यज्ञ कुक्कुट व सर्वभाषाभिज्ञ वाणी.

आर्या—या नारदासि एका वाणिजें हट्टाग्रहें पदीं धरिलें; ।
"पशु पक्षि बोलि शिकवा !" निरुपायें नारदेंहि पतकरिलें. १
नारद वदेः—"तुवा या सिद्धीचा दुरुपयोग न करावा. ।
दुर्वासनेंत पडतां शत्रु तुझा तूंचि होसि, न परावा." ॥२॥

नारद सर्व भूतभाषाविद्या सांगतात.

"शब्द परा, पश्यंती, मध्यें तुनि सर्वभूतिं संचरती; ।
नुमजति मनुजा, कारण बहुधा ते वैखरींत व्यवहरती. ॥३॥

**मध्यम-वाचा-संयम साधुनि जप नाम नित्य तूं प्रहर.।**

या साधनानें पशुपक्ष्यांचें इंगित समजण्यास तुझें अंतःकरण योग्य होईल.

**पशुपक्षि बोल जाणसि मग तूं लक्षूनि वासना पदर." ॥४॥**

---

**यापरि नारद आज्ञें पशुपक्षी बोल वाणियां कळले.।**
**दुर्वासना तयाची, त्याचें दुर्भाग्य शीघ्रसें फळलें. ॥५॥**

एके दिवशीं त्यानें पाळलेल्या कुत्र्यास व कोंबड्यास भाकर व दाणे टाकले. कोंबडा कुत्र्याचें मुखांतील भाकर घेऊन उंच उडून बसला.

**कुतरा बोलेः-" कुक्कुट दादा! ऐसा कठोर कां होसी?।**
**माझे मुखिंची भाकर, निज दाणे तूं त्यजूनि, कां खासी?" ॥६॥**
**कुक्कुट बोलेः-" भाऊ! रात्रींत मरेल अश्व या घरिंचा।**
**पडसी उद्यां सुकाळीं. घेसि वृथा छंद आजि भाकरिचा." ॥७॥**

वाण्यास समजलें. तत्काल घोडा नफ्यांत विकला. तो रात्रीं मेला. घेणार तळतळला. दुसरे दिवशींही पूर्ववत् कुक्कुटानें कुत्र्याचा घास हिसकला. वाणी आनंदानें उभयतांचा संवाद ऐकूं लागला.

**कुतरा बोलेः-"दुष्टा! काल मला ठेविलेसि उपवासी.।**
**आजहि घास मुखींचा हरिसी, तूं जासि घोर नरकासी!" ८**
**कुक्कुट बोलेः-"भाऊ! रात्रींत मरेल या घरीं उंठ.।**
**राही आज उपासी, ना तरि तूझें फुटेल कीं पोट!" ॥९॥**

वाण्यानें तत्काल उंठ नफ्यांत विकला. रात्रीं उंठ मेला. स्वताचें विद्येची वाण्यास धन्यता वाटली. घेणाराचा आत्मा तळतळला. तिसरे दिवशींही पूर्ववत् कोंबड्याची चेष्टा पाहून आनंदानें वाणी उभयतांचा संवाद ऐकूं लागला. उपासी कुत्रा रडूं लागला. त्याचें समाधान कोंबडा करितो.

**" घर धनी मरेल रात्रीं. खीर गव्हाची, शिरा, वडा, पोळी ।**
**जेवील गांव सारा ! चाटाया तुज अपार पत्राळी ! " ॥१०॥**
**श्वान वदेः-"तव होरा दाउनि लाभा अखेर दे तोटा. ।**
**माझे मुखिचा तुकडा हरिसी. आचार हा तुझा खोटा. ॥११॥**
**घर धनि या विद्येनें निज पापें येत मृत्युचे पाशीं ।**
**मज ठेविसी उपासी.—घार तुला देख ! नेत आकाशी."॥१२॥**

———

इतक्यांत एक घार त्या भविष्यज्ञ कोंबड्यास घेऊन आकाशांत गेली. व जबडा पसरून काळही वाण्यासमोर धावून आला.

वाणी घाबरून नारदमुनिचा धावा करितो.

**आर्या-"मृत्यु गिळी मज आतां, गुरुराया! वाचवा त्वरें ताता!"**

नारदः-(प्रगट होऊन) शेटजी ! मरणाऱ्या घोड्याउंटाचे टक्के केलेंत. आता आपल्या देहाचें टक्के करा. म्हणजे सुटलांत काळजीतून !

वाणीः-(हताश ) खायाला काळ, भुईला भार, अशा मला फुकट कोणी पतकरणार नाही. मी घोड्याउंठासरखा मारणार खास ! टक्के कोणी दिले तरी घेऊन काय करूं ? मला जीव दान द्या!

**"पापी मत्तनु. पतकरि कोण इला? द्रव्य कासया आतां!"॥१३॥**

———

दुर्वासः— मला कोण पतकरील! (रडूं लागतो.)

द्रौपदीः-(दुर्वासाची स्थिति पाहून गहिंवरून) देवलमुने! पुढें त्या वाण्याची कथा सांगा. तो मेला कीं वांचला?

देवलः— तो आधीं संसारास मेला. फसवून द्रव्य जमा केलें होतें, तें ज्याचे त्यास व्याजासहित परत केले. उरलेलें घरदार त्यानें तत्काल दान दिलें. ईषणा त्यागानें संन्यस्त झाला. गुरू माउलीच्या चिन्मय-उदरांत त्याचा पुनर्जन्म होऊन तो चिरंजीव झाला.



दुर्वासमुनीनेंही आपलें सर्व तप धर्मास आशीर्वादासह समर्पण केलें, सर्व संन्यस्त होऊन नारदाशेनें नामसंकीर्तन हाच जप, व हरिचिंतन हेंच तप, जवळ बाळगलें. व श्रीहरीचे दर्शनार्थ निघाले.

## ७२ श्रीकृष्णानें स्वतां दुर्वासास दर्शन दिलें.

उप० धरी मुनी श्रीहरिचाचि ध्यास, ।
जपीं तपीं धुंडित साधनास. ।
न भेटला नाथ, न सौख्य त्यास. ॥
निर्वाणिचा होत बहू उदास. ॥१॥
जातो मुनी तो जधिं द्वारकेला, ।
त्या सांगती नाथ पुरीसि गेला; ॥
पुरीसि येतां मुनि तो भुकेला, ।
कळे हरी कुंजवनांत ठेला. ॥२॥

याप्रमाणें हस्तिनापुरापासून द्वारकेपर्यंत पुष्कळ खेटे घातले. पुढें दुर्वासास चालवेना. दयाळू नारद भेटले. नारदांनीं कुंजवनांत राहून खडे कंटक झाडून मार्ग स्वच्छ ठेवण्याची संतसेवा दुर्वासास सांगितली. उगीच दारीं पडून राहे । दारीं पडल्यां होइल काय ! । येतां जातां लागती पाय । पाय लागतां काय सिद्धी? । हळूं हळूं पालटे देह बुद्धी ॥

---

उद्विग्न तो कुंजवनांत राही. ।
म्हणेः-" न मच्चिंतनिं सत्व कांहीं ॥
हरी दयाळू वदती-प्रथाही ।
दयाघना ! दर्शन तूंचि देई " ॥३॥

पांडवाचा वनवास संपून ते पुढील उद्योगास लागलेच होते.

द्वारावतीतूनि हरी निघाला ।
भेटावया धर्मधनंजयाला ॥

सोडूनि मार्गा हय-संध चालला, ।
कुंजीं मुनी सन्मुख शीघ्र थांबला. ॥४॥
हरीसि देखूनि मुनी सुखावे, ।
मागीलचें दुःख न होत ठावें. ॥
प्रत्यक्ष नाथा बघतां विसावे, ।
राहील कां दुःख मुळींच नांवें ? ॥५॥
हरी म्हणेः-" गा मुनिराज माउले ! ।
त्वद्भक्तिनें हे मज येथ आणिलें. ॥
पुढें न उद्विग्न कधींच होई; ।
द्वारावतीं ये, मज भेट देई. " ॥६॥
बोले मुनीः-" मी समुळींच आटे,
तेंव्हां तुझी सुंदर मूर्ति भेटे. ॥
धुळींत मी राहिन याचि थाटें. ।
तुवांचि यावें जरि तूज वाटे. ॥७॥
मी हा लुळा भग्नभुजा निरंगा; ।
ऐसी दया येत तुझे तुरंगा. ॥

मज दीनाची दया तुझे घोड्यास आली. हा तुझ्याच दयेचा प्रभाव.

सर्वज्ञ बीजा ! भुवनैक रंगा ! ।
येशी दयासागर तूं तरंगा. ॥८॥
जपीं तपीं टेक कधीं धरीना ।
प्रयत्न माझा मज उद्धरीना ॥
नाथा ! मला तूं स्मरशील दीना ।
तेंव्हां स्थिती येत मला सुलीना !" ॥९॥

याप्रमाणें सर्व साधनांचा अहंकार जिरला, तेंव्हां दुर्वासमुनीवर श्रीहरीची दया झाली.



श्रीहरिचे सहायानें दुर्योधनाचा पराभव झाला. परंतु धर्मास राज्यवैभवाचें सुख वाटलें नाहीं. कारण जीवित अशाश्वत आहे.

## ७३ धर्मराज व दूत.

शार्दूल०—धर्मा येउनि दूत सांगतिः-"नृपा ! ऐके सुवार्ता खरी; ।
काळें कौरव सर्व आजि वधिले. चिंता न कांही करी."॥
बोले धर्मः-"नसे नवी खबर ही. तो काळ मारेकरी ! ।
पैं काळें मज सोडिलें, कुशल हें सांगाल कोणीतरी ?"॥१॥

मृत्युलोकीं सुखाची कहाणी । ऐकिजेल कवणाचिये श्रवणीं । कैची सुखनिद्रा आंथरुणीं । इंगळांच्या ॥ जिये लोकींचा चंद्र क्षयरोगी । जेथ उदय होय अस्ता लागी । दुःख लेऊनि सुखाची आंगी । साळित जगातें ॥

लोकक्षयाचा धर्मराजास खेद झाला. नारद समाधान करितात.

## ७४ हत्या कुणावर ?

शार्दूल०—सर्पा नेत नभीं गरूड. धरणीं गोपी घटा घे शिरीं, ।
"घ्या हो ! दूध" म्हणे. अही स्वगरला सांडी घटा भीतरीं. ॥
नेलें तें पय ब्राम्हणें, द्विजवरां पाचारि श्राद्धा घरीं. ।
मेले खाउनि खीर विप्र. गरुडा हत्या दिसे अंबरीं. ॥१॥

भुजंग० पुसे पक्षि मादीसिः—" हत्या कुणाला ?" ।
वदे तीः—" उठाठेव कां आपणाला ?" ॥

हा दांपत्य कलह एका मुनीस सोसवेना. तो न विचारतां निर्णय देतोः—

तपस्वी वदेः—" पाप गोपी-शिरासी." ।
शिरे शीघ्र हत्या तयाचें उरासी ! ॥२॥

तपस्वी गुरूस शरण गेला. सद्गुरूनीं त्यास सांगितलें:—

आर्या०—कारण पंचक कर्मा. देह अधिष्ठान, हा अहंकर्ता, ।
इंद्रियकरणें, चेष्ठा, या चौघा दैव मेळवीत स्वतां. ॥३॥
दैवें निरहंकृतिनें सहज घडे कर्म यांत पाप कुठें ? ।
नाहीं तें अघ आत्म्या लावी, त्याचेचि तें करा चिकटे ॥४॥

जेणें चैतन्या ईश्वरा ब्रम्हा । देहचि केलें परमसीमा । तया आत्मा कर्ता हे प्रमा । अलोट उपजे ॥ म्हणूनि निर्मळे आत्मस्वरूपीं । जो प्रकृतीचें केलें अरोपी । तो कल्पकोडीच्या मापीं । मवीचि कर्मे ॥

धर्मराजः— मग या कर्मापासून सुटका कशी होणार ?

नारदः—जे मुक्तातें निर्धारिता । लाभे आपुलीच मुक्तता । जैसी दीपें दिसे पाहतां । आपुली वस्तू ॥ तैसे हारपले आपणपें पावे । तैं संतातें पाहतां गिवसावें । म्हणूनि वानावें ऐकावें । तेचि सदा ॥ मुक्त जनकानें प्रजेस मुक्तस्थितींत राहण्याचें वर्म शिकविलें.

## ७५ चोरांची चौकडी व जनकराजा.

दिंडी
जनक राजा रात्रींत गस्त फेरी. ॥
पथीं तस्कर चौकडी तया घेरी. ॥
राव बोलेः—"मी करूं निघे चोरी ॥
तुम्हा कोणाचा कवण गूण भारी ?" ॥१॥
एक बोलेः—मी पोखरी सुरंग." ।
दुजा सांगेः—"मी करी द्वारभंग." ॥
तिजा जाणे पशु पक्षि सर्व बोला. ।
वदे चौथाः—"मी स्मरे ओळखीला." ॥२॥
राव बोलेः—"मी हालवितां मान, ॥
सुळीं जाणारां देत जीव-दान." ।
चोर म्हणतीः—"हा गूण अम्हां तारी. ॥
फोडुं राजगृह, कोण कसा मारी ?" ॥३॥

चोर परतले. वाटेंत कुत्रें भुंकलें. भाषाभिज्ञ सांगतो.

म्हणे भाषाविदः—"येथ श्वान बोलेः ॥
चार चोरामधिं एक राव चाले." ॥
कोण राजा चौघां न होत ठावा. ॥
चोर शंकाकुल जाति नीज ठावां. ॥४॥

राजानें चोरांचे पत्ते प्रधानास सांगितलें.

प्रधानानें शोधिले चोर चारी. ।
चार सूळा चौहटां तो उभारी. ॥
चोर बोलतिः—"पांचवा कां फरारी ? ।
करा त्याच्या ही सुळाची तयारी." ॥५॥

राव आला ते वेळिं सुळा पासी. ।
स्मरे ओळख तो वदे चोर त्यासी :—॥
"चोरि माजीं आमुचा सखा होसी, ।
तुला सिंहासन, आणि आम्हां फासी? ॥६॥

आम्हि चौघानीं दावियले गूण ।
अतां दावी निजगूण, रक्षि प्राण" ॥
नृपें हासुनि मग हालविली मान. ।
मुक्त चौघांनां करी तैं प्रधान. ॥७॥

प्रधानानें प्रजाजनांस तात्पर्य सांगितलें.

" देव देहामाधिं सदा जागताहे, ।
तया संगें हें कर्म होत आहे; ॥
तया ओळखुनी अहो रात्र पाहे, ।
तोचि या जगतीं जीव मुक्त राहे. " ॥८॥

पांडव श्रीहरिचे भक्तींत एकरस झाले. चित्ताला एकदां झाडल्यानें निर्मळ राहत नाहीं. सदा झाडू फिरत राहावा लागतो. प्रभू स्वभक्तांचा अहंकार झाडीत असे.

## ७६ खरा भक्त.

श्रीकृष्णास अर्जुनानें प्रश्न केलाः—" आपला खरा भक्त. कोण ? अर्जुनास वाटले देव म्हणतील " तूंच आहेस !" पण देव म्हणतात:— " आहे एक, कधींतरी दाखवीन." एकदां उभयतां कृष्णार्जुन वनांत

गेले. तेथें एक वृद्ध ब्राम्हण डाव्या मुठीनें शुष्क तृण खात, व उजवे हातानें शस्त्र परजीत दिसला.

**शार्दूल०–भक्षी शुष्क तृणा मुठीं कवळुनीं. हिंडे वनी बावरा.।**
**फेरी शस्त्र करीं मुनी, वरि म्हणेः- "मारीन त्यांनां खरा."॥**

श्रीकृष्णः–वाळलें गवत कां खातां? कोणास मारणार ? मुनि म्हणतोः–

**"हिंसा वर्ज म्हणुनि शुष्क तृण हें चारा मला वैष्णवा.।**
**हें तों शस्त्र सुतीक्ष्ण सज्ज धारिलें मारावया पांडवा! ॥**

श्रीकृष्णः–" कां मारणार पांडवांना ?"

**आक्रंदोनी मुनी रडेः–"त्वरित मी काढीन त्याचे वडें.।**
**माझा कोमल नाथ! पांडव किती त्या घालिती सांकडें; ॥**
**केलें चाकर, दूत, सूत, हरिला, उष्टेंहि त्याचेकडे !।**
**झाला शांत मुनी जसा हरि म्हणे "हें तो मला आवडे." २**

श्रीकृष्णः–मुने! पांडव माझीं नेणतीं लेकरें आहेत.॥ ऐसे अनन्य गतिकें चित्तें। चिंतितसाते मातें । जे उपासिती तयातें। मीचि सेवी ॥ आपुली तहान भूक नेणे । तान्हया निके ते माउलिसि करणें । तैसें अनुसरले मज प्राणें । तयाचें सर्व मीचि करी ॥

मुनिः–(शस्त्र टाकतो) मग मी पांडवांचे दासांचा दास आहे.

श्रीकृष्णः–अर्जुना! हा पहा खरा भक्त !॥ जो यथा लाभे संतोखे। अलाभें न पारुखे। पाउसेंविण न सुके। समुद्र जैसा ॥ वायूसि एकेठायीं। विढार जैसे नाहीं । तैसा न धरीच कहीं । आश्रय जो ॥ हें विश्वाचि माझें घर । ऐसी मती जयाची स्थिर । किंबहुना चराचर । आपणाचि जाहला ॥ मग यावरी ही पार्था । माझें भजना आस्था । तयातें मी माथा । मुकुट करी ॥ तो पाहावा हे डोहळे । म्हणूनि अचक्षूसि मज डोळे । हातीचेनि लीळा कमळें । पूजूं तयातें ॥ दों वरी दोनी। भुजा आलो घेऊनि । आलिंगावया लागूनि। तयाचे आंग ॥

## ७७ संतासी मस्करीचा परिणाम.

भक्तवत्सल प्रभूस कुलबांधवापेक्षा संत अधिक प्रिय होते. एकदां मुनिगण सुधर्मेत बसले असतां, तेथें जांबवती–पुत्र सांबास गर्भवती-वेष देऊन यादव पुत्रांनीं संतांची मस्करी केली.

**शार्दूल०–"सांगा हो प्रसवेल काय मुनिहो! सर्वज्ञ तूम्ही तरी!"**

त्यांत एक मुनी म्हणाले:–

**"मूढानों! उपजेल जें मुसळ तें सर्वा कुळा संहरी." ॥**
**केली जी कुमरें, रुचे न प्रभुला संतासवें मस्करी.।**
**संता सत्य करी. कुला सहित हो! लोपे स्वतां श्रीहरी.॥१॥**

नारदांनीं यादवांचे नाशाची वार्ता धर्मराजास सांगितली.

धर्म:–श्रीहरि नाहीं. आतां जगांत राहू नये. सुटकेचा उपाय सांगा.

नारद:– सुटकेचा उपाय ऐक.

## ७८ पोपटाची सुटका

हरिद्वारचा मोकळा पोपट कामरूप देशांत पिंजऱ्यांत कैद झाला. पुर्वीचे सत्संगाचा विरह वाटून, त्यानें धनी व्यापारार्थ हरिद्वारास निघाला त्याबरोबर आपले मुक्त बांधवास निरोप पाठविला:—

**" मी इच्छितो सज्जन हो! सुसंगा.।**
**हा पिंजरा आडवितो ममांगा.॥**
**लंघूं कसा पर्वत सिंधु गंगा?।**
**मी मोकळा होइन केवि? सांगा." ॥१॥**

हा निरोप हरिद्वारच्या मोकळया राघूच्या थव्यास व्यापाऱ्यानें सांगितला. एका मोकळया राघूनें उत्तर दिलें तें असें:—

**राघू पडे मुक्त भुई धडाडी.।**
**श्वासा निरोधी. करि बंद नाडी.॥**

मेला जणूं. पंख पदासि खोडी. ।
व्यापारिया शोकसमुद्रिं पाडी. ॥२॥

व्यापाऱ्यानें बद्ध पोपटास ही सर्व हकीकत सांगितली.

मुक्तें असा सक्रिय बोध केला,।
तो पंजरस्था हृदयीं उदेला.
श्वासा निरोधूनि पडे भुईला. ।
बोले धनी. "हाय! गुणाढ्य मेला." ॥३॥
मेला असा ठेवुनि काय आतां?।
टाकी उकिर्डा, उपयोग खातां. ॥
जों फेकिला मुक्त धरीत पंथा, ।
पंची त्वरें आक्रमितो दिगंता. ॥४॥

आकाशांत उडून स्वस्थानीं येत पोपट म्हणतोः—

"मिठूमियां! जाय बहूत बोलों, ।
तों तों स्वतां बंधन-हेतु झालों. ॥
कानां मुखासी नयनासि मेलों, ।
तेव्हां स्वधामासि उडूनि आलों. ॥५॥

---

धर्मराज मूकव्रत स्वीकारून अंधबधिरासारखे श्रीहरीचे चिंतनांत नारायणाकडे निघून गेले. पाठोपाठ द्रौपदीसह बंधू गेले.

---

## ७९ परिक्षितिराजास बाल मुनिचा शाप.

उपजाति– हरी जयाला उदरांत रक्षी, ।
जो श्रीहरीला जगतीं परीक्षी, ॥
जो बंडुनी घोर कलीसि बाधी, ।
परिक्षिती तोहि पडे उपाधीं. ॥१॥
तृषार्त आला शमिकाश्रमांत. ।
ध्यानस्थ बैसे मुनि तो निवांत. ॥

नृपा गमे लावि समाधि खोटी, ।
टाकी मुनीच्या मृतसर्प ओटीं. ॥२॥
लक्षां चुके राव धनांधकारीं. ।
शापी मुनीपुत्र नृपा कहारीः ॥
तो रामबाणासम शाप भारी, ।
साता दिसामाजिं नृपासि मारी. ॥३॥

## ८० जन्मेजयास सरमेचा शाप.

संतांची अवहेलना तर काय, कुत्र्याचे पिलाची अवहेलना सुद्धां बाधते. जन्मजयाचे सर्पसत्रांत सरमेचे पिलास ऋत्विजानीं पिटाळले. सरमा शाप देते:-

उपजाति- " केलासि हा संभ्रम थोर राया; ।
केले परी व्याकुळ सारमेया. ॥
जाईल हें संभ्रमसत्र वाया; ।
उपाय सारे फळती अपाया. " ॥१॥

तात्पर्य- साधावया जों गुरुकार्य जावे, ।
तेथें न कोणा लघुसे गणावे. ॥
विश्वीं गुरू, हीन कुणा म्हणावे ? ।
डोळां धुळी लेवुनि कां शिणावें ? ॥२॥

व्यासानीं सर्व देशकालास हें अबाधित तत्व सांगितलें; आलोड्य सर्व शास्त्राणि विचार्यैव पुनःपुनः । इदमेकं सुनिष्पन्नं ध्येयो नारायणःसदा॥ गौळीदादांचा शोध अपूर्व आहे.

## ८१ गौळी व महाभारत.

शार्दूल० गौळी ठाकत ओणवा, हनुवटी ठेवूनि काठीवरी. ।
ऐके भारत. अर्थमात्र नुमजे. एकाग्र दृष्टी खरी. ॥
तेणे एक उनाड पोर बसलें येऊनि पाठीवरी; ।
"होता भारत-भार चार मण !" हें जाऊनि सांगे घरीं. ॥१।

**तात्पर्य. चाले साधक श्रीहरीसि भजण्यां होऊनिया सोवळा, ।**
**प्रेमावाचुनि वित्त-वैभव, क्रियापांडित्य मांडी कळा. ॥**
**आली गुप्त घमेंड. नेणत कशी धामीण वेष्टी गळा. ।**
**सारें वर्म चुकें. परी म्हणतसेः-"सर्वांत मी आगळा." ॥२॥**

---

अतिवाहिक सूक्ष्म तनुधारी यक्ष गंधर्व किन्नरादिक सुद्धां ईशपद प्राप्त्यर्थ तळमळतात. ईश-प्राप्तीचा उपाय विचारावा म्हणून विमानारूढ चित्ररथगंधर्व नारदास हुडकूं लागला.

## ८२ चित्ररथ व नारद.

**शार्दूल० धुंडाया मुनि लागि चित्ररथ तो संचारतो अंबरीं. ।**
**जातां नारद गोकुळीं, पुसतसे नेऊनि दोलें वरी. ॥**
**"सांगा केवि मिळे हरी?" मुनि म्हणेः-"तूं खेचिलें त्यापरी।**
**सत्संगीं भजतां नरां निजपदीं ओढी दयाळू हरी" ॥१॥**

नारदः-ईश-प्राप्तीचा मुख्य उपाय भक्ति, व तिचीं साधनें विषय-त्याग, संग-त्याग, अव्यावृत भजन, भगवद्गुण-श्रवणकीर्तन आहेत. परंतु-मुख्यतस्तु महत्कृपयैव भगवत्कृपालेशाद्वा। मुख्यतः संतांची कृपाच पाहिजे. हिचेकरिता मी भूतळीं संत दर्शनोत्सुक हिंडतों. स्वर्गांत अव्याहत अतींद्रिय सुखभोग आहे. तेंही पुण्य सरेपर्यंत. व स्वर्गीय पुरुषांचें स्वर्गांत जगणें सुद्धा मृत्युलोकींच्या सज्जनाचें स्मृतीवर अवलंबून आहे. इंद्रद्युम्नाच्या स्वर्गवासाची कथा ऐक.

## ८३ इंद्रद्युम्नाचा स्वर्गवास (भारत वनपर्व)

**आर्या-सहस्र हय-मख केले इंद्रद्युम्नें. परंतु पुण्य सरे. ।**
**निजनाम कोण आठवि, हें शोधायासि भूतळीं विचरे ॥१॥**

तो दीर्घायू मार्कंडेयापाशीं गेला.

**मार्कंडेय वदेः-"मी इंद्रद्युम्नासि ऐकिलें नाहीं.।**
**मजहुनि वृद्ध उलूका भेट, विचारूनिया तरी पाहीं." ॥२॥**

**बोले उलूकः-"मजहुनि बक नाडीजंघ फार म्हातरा ।**
**जाणे तरी पहा." बक बोलेः-"जा भेट तूं अकूपारा." ॥३॥**

अकूपार नामक कच्छपास इंद्रद्युम्नासंबंधी माहिती विचारिली. त्यानें मात्र कृतज्ञतेनें इंद्रद्युम्नास ओळखलें.

**कच्छप इंद्रद्युम्ना स्मरुनि वदेः-"धर्मशील तो नृपती, ।**
**याग सहस्रा करुनी तोषविले सर्व विप्र या जगतीं." ॥४॥**
**ही गद्गदोक्ति गेली, कूर्मे उच्चारितां, चिदाकाशीं. ।**
**उतरे विमान, चढला नृपही निज पूर्व स्वर्गलोकासी. ॥५॥**
**शब्द शुभाशुभ कृतिचा घुमत नभीं येथ वर्णितां वाचें. ।**
**जोंवरि नाम जगामाधिं तोंवरि पुरुषत्व राहि जीवाचें. ॥६॥**
**जों वरि कुणा नराचें घेति कुणी नाम देउनी शापा, ।**
**तोंवरि भोगि नराधम तो नरकीं आप केलिया पापा. ॥७॥**
**यास्तव जगीं नरानीं विस्तारावें अखंड सत्कर्मा. ।**
**सांडुनि राजस, तामस, आचरिजे सत्वशील सद्धर्मा, ॥८॥**

चित्ररथ:–परोपकारी सत्कर्मे ईश प्राप्तीचीं साधनें नव्हेत काय ?

नारद:–स्ववर्णाश्रमोचित शास्त्रविहित कर्मानें निरहंकारी जीवाची सत्संगास आवश्यक असलेली चित्तशुद्धी होते. इहपर लोकीचें सुखाची कामना ईश प्राप्तीस प्रतिबंधक, म्हणून कामनायुक्त कर्म पाप आहे. श्रीकृष्णप्रभु म्हणतात:– तैसे शतक्रतु यजुनि मातें । कीं ईप्सिताति स्वर्गसुखातें । आतां पुण्य कीं हें निरुतें । पाप नोहे ॥ मज येता पैं सुभटा । या द्विविधा गा अव्हाटा । स्वर्ग नरक या वाटा । चोराचिया ॥ स्वर्गी पुण्यात्मकें पापें जाइजे । पापात्मकें पापें नरका जाइजे । मग मातें जेणें पाविजे । तें शुद्ध पुण्य ॥ ज्ञाने० ९ ॥

चित्ररथ:–शुद्ध पुण्य कोणास कसें लाभते ?

नारद:–शुद्ध पुण्यासाठीं कैवल्यकामपुरुष विरक्त होऊन गुरू-पदिष्ट मार्गानें अधिकारानुरूप अभ्यास, ज्ञान, अथवा भक्तियोगाचा

आश्रय करितो. अभ्यासयोगाचीं साधनें यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा, समाधी; ज्ञानयोगाचीं श्रवण, मनन, निदिध्यासन; आणि नवविधा भक्ति योग, हे सर्व सत्संगानेंच साधतात.

चित्ररथः—साधनांची माहिती मिळाल्यानंतर, परिपूर्ति परलोकांत होते किंवा नाहीं ?

नारदः—साधन परिपूर्तिकरितां योगच्युतांना पुन्हः मृत्युलोकांतच जन्म घ्यावा लागतो. प्रभू श्रीकृष्ण म्हणतातः—ऐकें कवतिक हें कैसें। जे शतमखा लोक सायासें। ते तो पावे अनायासें कैवल्यकाम ॥ मग तेथिचें जे अमोघ। अलौकिक भोग। भोगितांही सांग। कंटाळे मन ॥ हा अंतराय अवचिता। कां ओढवला श्रीभगवंता। दिविभोग भोगितां। अनुतापी नित्य ॥ पाठीं जन्मे संसारीं। परी सकल धर्माचिया माहेरीं। लांबा उगवे आगरीं। विभव श्रियेचा ॥ जयाते नीतिपंथें चालिजे। सत्यधूत बोलिजे। देखावें तें देखिजे। शास्त्र—दृष्टी ॥ वेद तो जागेश्वरू। जया व्यवसाय निजाचारू। सारासार विचारू। मंत्री जया ॥ जयाच्या कुळीं चिंता। झाली ईश्वराची पतिव्रता ॥ज्ञा०॥ अथवा ज्ञानाग्निहोत्री। जे परब्रम्ह श्रोत्री। महासुख क्षेत्रीं। आदिवंत ॥ जे विवेकद्रुमाचे मुळीं। बैसले आहाति नित्यफळीं। तयां योगियांचिया कुळीं। जन्म पावे ॥ अमरीं भाट होइजे। मृत्युलोकाते वानिजे। ऐसे जन्म पार्था गा जें। तें तो पावे ॥ ज्ञा० ६ ॥

चित्ररथः—मुक्तास सत्संगाची काय आवश्यकता आहे ?

नारदः—वैकुंठवासी चतुर्भुज, शंख, चक्र, पीतांबरधारी जयविजयांनीं पांच सहा वर्षांच्या नग्न फिरणाऱ्या सनत्कुमारांचा अनादर केला म्हणून तीनदां दैत्य जन्मास येऊन प्रत्यक्ष भगवंताचे विरोधी झाले.

———<>०<>———

## ८४ जयविजय व सनत्कुमार.

शार्दूल० येतां संत सनत्कुमार हरिला निःशंक देखावया, ।
द्वारीं आडविती चतुर्भुज गडी, कल्पूनि अल्पावया. ॥
रोषें बोलति संतः-"भेव बघतां वैकुंठिं! पावा भया. ।
"जा जा जा असुरांत फार अवधा यथें पुन्हा यावया." ॥१॥

श्रीमहाविष्णू सनत्कुमाराचें दर्शनास आले, व म्हणतातः-

बोले नाथः-"जया! धरुनि विजया वैकुंठिच्या दूर जा!।
संतांचा चरणांक हा मज रुचे तैसी न ती पद्मजा. ॥
संतां अंतरवी रमा तरि तिला निशंक देतो रजा. ।
संतांनां प्रतिकूळ होति तरि या खांडीन माझ्या भुजा" ॥२॥

नारदः—सत्संग प्रत्यक्ष हरीस आवडतो. मला प्रभूनें आपला खास पत्ता दिला आहे. ॥ नाहं वसामि वैकुंठे योगिनां हृदये रवौ । मद्भक्ता यत्र गायंति तत्र तिष्ठामि नारद !

---

## ८५ पंडितास पैठणकरांचें जयपत्र.

आजही जिव्हाळ्याची जागा संत हरिनें ठेविले आहेत. म्हणून जग जगत आहे. संताविरुद्ध दिग्विजयी पंडित उद्भवतात. संत त्यांनाही तारितात.

एक पंडित दिग्विजय करीत पैठणास आले. एकनाथास जिंकून जयपत्र घ्यावे म्हणून आव्हान केलें.

नाथा पंडित बोलवी :-"मजपुढे वेदांतवादास या ? " ।
जोडी नाथ करा. नमूनि विनवीः-"जी! वाद तो कासया? ॥
माता धन्य! पिताहि धन्य! तुम्हि ही हे धन्य! जन्मूनिया,
तैसा श्रीगुरु धन्य! बोल सरलां. आतां करावी दया." ॥१॥

पंडित निरुत्तर नाथास शरण गेला. नाथास त्याची दया आली.

---

## ८६ संतांची भूतदया.

आमराईंत मुलें पाड पाडीत व तेथेंच तुकाराम महाराज भजन करीत होते. एक धोंडा अकस्मात तुकारामास लागला.

**शार्दूल०-पोरे पाडिति पाड फत्तर तुकारामासी लागे शिरीं. ।**
**आक्रंदूनि तुका रडे. गडबडा लोळे धरित्री वरी ॥**

इतक्यांत शिवछत्रपति तुकारामाचें दर्शनास आले. परिस्थिती पाहून मुलांस शासन करणार, तोंच तुकाराम म्हणतातः-

**"धोंडे साहुनि या मुलां तरु फला देतो." दया ही खरी. ।**
**"मीं कांहि न दिलेचि निष्फल तनू, हा घाव माझें उरीं " ॥**

शिवछत्रपतीस उजेड पडला. आमराई मुलांकरितां इनाम दिली. ती आतां नाहीं. तुकारामाची दया अजरामर अमृतफल आहे.



## गुरुकरुणामृतावर सद्गुरु ब्रम्हानंद माउलीचा आशीर्वाद

उमरच्या हृदयातलें चिद्रत्न जगरूपी जमीनींत गुप्त होते. त्याला दिव्य अंजन व पायाळूची जरूर होती. ह्या दोन्ही गोष्टी ग्रंथकर्त्याजवळ होत्या म्हणून त्यानें गुप्तधन बाहेर काढून अनाथ जीवांच्या कल्याणार्थ पुस्तकरूपानें प्रगट केलें, आणि आम्हांस उमरचा प्रसाद मिळाला. ... उमर प्रत्यक्ष नसून त्याच्या रुबायाशी तादात्म्य करून व त्यातील रहस्य स्वानुभावानें प्रतिपादन करणें, ही सामान्य लोकांची गोष्ट नाहीं. त्याला प्रति उमर खय्यामच पाहिजे. ग्रंथकारानें गुरुकरुणामृतांत एके ठिकाणी असें प्रतिपादन केले आहे की कालांतरानें एका सत्पुरुषाचें रहस्य दुसरे सत्पुरुष सांगू शकतात. वृक्षाच्या मूळास जें पाणी घालावे तेंच पाणी पानोपानीं शाखा पल्लवात नांदते. परंतु याला दोन गोष्टींची जरूरी आहे; सद्गुरूची पूर्ण दया, व समूळ नाहींसा झाला तो सच्छिष्य.

— —

उमर खैय्यामचें जीवन चरित्र अपूर्व आहे. अंतकालीं जमिनीवर डोकें ठेवून तो म्हणतोः—"प्रभो ! माझे अपराध क्षमा कर. जिथपर्यंत शक्य तिथपर्यंत तुला मी जाण्याचा प्रयत्नकेला." हें उमरचें अंतकालचे शब्द सामान्य लोकांसही घयाळ करितील, मग विशेष अधिकाऱ्यांची गोष्ट काय सांगणें. उमरच्या काव्यांत मुख्य विषय प्रेम आहे. त्या बरोबरच ज्ञानवैराग्याचा समावेश प्रत्येक श्लोकांत भक्तिरूपानें नटला आहे. एकंदरींत उमर खैय्यामच्या जीवन—चरित्राचा विचार केला तर तो अपूर्व विभूती आहे असे सिद्ध होते. त्यासंबंधीं दीर्घ प्रयत्नानें माहिती मिळवन. मार्मिक विषयांचे प्रतिपादनासह गुरुकरुणामृत पाजून अमर करण्याचें श्रेय ग्रंथकर्त्यानें घेतलें. शक्य

तितकें सोपें लिहिलें तरी सर्वेषां समजणे कठिण. " तुका म्हणे येथें पाहिजे जातीचे ". कारण महानुभवी सत्पुरुष उमरनें आपल्या स्वानुभवाच्या बैठकींत बसून रुबाया गाइल्या. दातारसाहेबानीं उमर हा स्वच्छ आरसा पुढें ठेऊन आपलें हृदयातलें सौख्य भरपूर हृदयांत मावेना म्हणून श्लोकरूपानें गाइले. कमळ कळिका झालेपणें । हृद–यींच्या मकरंदातें राखों नेणें। दे रायारंका पारणें । आमोदाचें ॥ज्ञा०॥

उमरच्या समाधीवर वर्षांतून दोन वेळां पुष्पें गळत होतीं, पण ग्रंथकारानें पुस्तकरूपें सर्व हिंदुस्थानभर अखंड पुष्पवृष्टी केली.

उमर खैय्यामनें आपले मातुश्रीचे स्वप्नांत सांगितलें कीं त्याला या रुबाईमुळें परमात्मानें क्षमा केली.

उरीं पोळला भाजला राख झाला । स्वतां पेटसी कुंभिपाकांत ज्वाळा ॥
कराया दया सागसी तूं दयाळा । असा कोण पंतोजि तूंरे धसाळा ? ॥

त्याच न्यायानें मुमुक्षूनें एकाच श्लोकावर विश्वास ठेविला तर परमात्मा त्याला क्षमा करील. तुका म्हणे ज्ञानेश्वरी । एक ओवी अनुभवावी

उमरचें व त्याचें यश गाणाराचे चरणावर साष्टांग नमस्कार. जेथ वाणी विसावे ते साधुकथा.



## गुरुवर्य महादेव हरी मोडक बी. ए.

आपला अमृतचषक हातीं लागल्यानें मधुपान मत्त भृंगाप्रमाणें आपल्याच गुंगीत हा जीव आहे. "मत्तोभवति स्तब्धो भवति" अशी स्थिती झाली आहे. उमरचें मूळ व त्यावरील आपली खुलावट म्हणजे आधीं सोनियाचे वरी जडावाचे अशी बहार झाली आहे. चोराची पाउलें चोरानेंच ओळखावीं. आडगर्तेत पडलेल्या गजराजाला बाहेर काढून घेण्यास सजातीयच पाहिजे......उमरचे काव्याचें अनेक पंडितानीं आज वर अर्थप्रकाशन केले, तथापि नुसत्या बहिर्दृष्टी शाब्दिकांचा तो विषयच नसल्यानें "गूढात्मा न प्रकाशते दृश्यते त्वग्रया बुध्या

केवलैः सूक्ष्मदर्शीभिः" अशी स्थिती झाली. पण वाचकाचे सुदैवानें आपले सारखे सद्गुरु पुत्रानें गुर्वाज्ञेनें हें कार्य हातीं घेतल्यानें उमरचे गूढ काव्यांतर्हित चित्प्रकाश चमकूं लागला....आपली कृति हृदयाचे उद्गार किंवा उच्छ्वास आहेत. वाणीचे पल्लव नव्हत. आणि अंतर्गत अर्थ मूळ लेखकाची खूण पटवीत आहे. "छाया नमूर्च्छति मलोपहत प्रसादे। शुद्धेतु दर्पणतले सुलभावकाशा"॥ या न्यायानें उमरचें रहस्य यथातथ्य आपले कृतींत प्रतिबिंबित झाले आहे......आपली प्रस्तावना म्हणजे सर्वेषां शास्त्रानां एकायतनं अशा तऱ्हेचीं आहे. तीं परपद मार्गस्थाचें भरपूर पाथेयच आहे. अध्यात्म वादानुबंधि सर्व वादाचा आपण उलगडा केला आहे याहूनहि अधिक कौतुकाची कामागिरी म्हणजे नारद-भक्ति-सूत्राशी उमराचे सहजोक्तिचा बेमालुम बसवून दिलेला मेळ.

---

**ज्ञानप्रकाश-शुक्रवार तारीख २१ माहे जुलै सन १९३३ इसवी**

प्रस्तुत प्रयत्नाचें वैशिष्ट्य म्हणजे उमर खय्याम याच्या रुबाया या ऐहिक विलासास उत्तेजन देणाऱ्या नसून परमार्थपर आहेत, या भूमिकेवरच हा भावार्थ देण्यांत आला आहे. मुसलमानातील सुफी पंथ हा आपल्या इकडील भक्तिपंथाशीं संवादी व सदृश आहे. या पंथाचे लोक या रुबायाची परमार्थपर भूमिका आहे असेंच मानतात, व रुबायातील मदिरेचा अर्थ भक्ति असाच समजतात, वगैरे विवेचन पुस्तककर्त्यांनीं प्रस्तावनेंत केलें आहे तें निःसंशय विचारार्ह आहे. उमर खय्यामचें त्यांनीं आरंभीं जें चरित्र दिलें आहे त्यावरूनही रुबायातील रहस्य आध्यात्मिक असलें पाहिजे असें स्वाभाविक अनुमान निघतें...रोजतुलकूलूब (हृदयाराम) हा जो त्याचा ग्रंथ आहे त्यावरून त्याची धर्मतत्वासंबंधींची मतें समजण्यासारखी आहेत. यांत परमात्म्याची ओळख करून घेण्याचे जे त्यानें चार मार्ग सांगितलें आहेत त्यांत सुफी संप्रदायच आपल्याला विशेष श्रेयस्कर वाटत असल्याचे

म्हटलें आहे. त्यानें आपला आयुष्यक्रम वैराग्यशील मनुष्यास साजेल अशा रीतीनेंच घालविला. सर्व संदर्भ लक्ष्यांत ठेवून रुबायांचा विचार करावयाचा म्हणजे त्यांचें आध्यात्मिक स्वरूपच मान्य करणें कसें अवश्य होतें. याचा उहापोह पुस्तककर्त्यांनीं प्रस्तावनेंत चांगल्या प्रकारें केला आहे आपल्या १५० पानाच्या प्रस्तावनेंत त्यांनीं कविचें चरित्र रुबाईचें वृत्त, रुबायाची संख्या, त्याची परिभाषा व अर्थपद्धति, रुबायांचे अलंकार, रुबायांतील रहस्य, वगैरेसंबंधानें ग्रंथकर्त्यांनीं सविस्तर विवरण केलें आहे. यातील रुबायांतील रहस्य हाच भाग सर्वांत मोठा आहे. शेवटच्या 'विनंति' या भागांत उत्तरच्या रुबायांतील कित्येक विचार संस्कृत सुभाषितांशी कसे जमतात हेंही त्यांनीं दाखविलें आहे श्लोकाची ठेवण मनाच्या श्लोकासारखी आहे. उमर खय्याम याच्या रुबायांचें रहस्य समजवून देण्याचा हा उपक्रम वाचकांना आवडेल असाच आहे.

---

"पुरुषार्थ" आक्टोबर १९३३.

उमर खय्यामचे रुबायांचा भावार्थ या पुस्तकांत आहे. याशिवाय याची प्रस्तावना व इतर माहिती फारच बहारीची आहे. 'मद्य' या शब्दाचा दारू असा अर्थ नसून भक्तियुक्त 'प्रेम' असा अर्थ आहे. ही गोष्ट यांनी या पुस्तकांत दाखविली आहे; यामुळें वाचकांना नवीनच दृष्टिकोण प्राप्त होणें शक्य आहे.

१ गुरुकरुणामृतः-उमर खय्यामच्या रुबायाचा भावार्थ.

२ सत्संगसरिता.

मिळण्याचें ठिकाण.

व्यंकटेश माधव दातार बी. ए. ३११३ गोळीगुडा, हैद्राबाद (दक्षिण.)